दादा भगवान प्ररूपित

# आप्तवाणी

## श्रेणी - ३

मूल गुजराती संकलन : डॉ. नीरूबहन अमीन

मराठी अनुवाद : महात्मागण

## त्रिमंत्र







नमो अरिहंताणं

नमो सिद्धाणं

नमो आयरियाणं

नमो उवज्झायाणं

नमो लोए सव्वसाहूणं

एसो पंच नमुक्कारो

सव्व पावप्पणासणो

मंगलाणं च सव्वेसिं

पढमं हवइ मंगलं ॥ १ ॥

ॐ नमो भगवते वासुदेवाय ॥ २ ॥

ॐ नमः शिवाय ॥ ३ ॥

जय सच्चिदानंद



## दादा भगवान कोण?

जून १९५८ संध्याकाळची अंदाजे सहाची वेळ, सुरत स्टेशनवर अलोट गर्दी होती. रेल्वेच्या प्लेटफॉर्म नंबर तीनच्या बाकावर बसलेल्या श्री अंबालाल मूळजीभाई पटेल रूपी देहमंदिरात नैसर्गिक स्वरूपात कित्येक जन्मांपासून व्यक्त होण्यासाठी आतूर असलेले 'दादा भगवान' संपूर्णपणे प्रकट झाले आणि निसर्गाने सर्जन केले अध्यात्माचे अद्‌भुत आश्चर्य! एका तासात विश्वदर्शन लाभले! मी कोण? भगवंत कोण? जग कोण चालवत आहे? कर्म म्हणजे काय? मुक्ती कशाला म्हणतात? इत्यादी जगातील सर्व आध्यात्मिक प्रश्नांची रहस्ये संपूर्णपणे प्रकट झाली. अशाप्रकारे निसर्गाने विश्वाला प्रदान केले एक अद्वितीय, संपूर्ण दर्शन आणि ह्याचे माध्यम बनले अंबालाल मूळजीभाई पटेल, जे होते गुजरातच्या चरोतर जिल्ह्यातील भादरण गावचे पाटील, कॉन्ट्रॅक्टचा व्यवसाय करणारे आणि तरीही पूर्ण वीतराग पुरुष.

त्यांना प्राप्ती झाली तशी ते फक्त दोन तासात इतर मुमुक्षूनां सुद्धा आत्मज्ञानाची प्राप्ती करवित असत, त्यांच्या सिद्ध झालेल्या अद्‌भुत ज्ञान प्रयोगाद्वारे. त्याला अक्रम (क्रमविरहीत) मार्ग म्हटले जाते. अक्रम म्हणजे क्रमाशिवायचा आणि क्रम म्हणजे पायरी पायरीने, क्रमाक्रमाने वर चढणे! अक्रम म्हणजे लिफ्ट मार्ग! शॉर्ट कट!

ते स्वत: प्रत्येकाला 'दादा भगवान कोण?' याबद्दलची फोड करून देताना म्हणायचे की, ''हे दिसतात ते 'दादा भगवान' नाहीत. हे तर 'ए.एम. पटेल' आहेत. आम्ही ज्ञानी पुरुष आहोत आणि आत प्रकट झाले ते दादा भगवान आहेत. दादा भगवान तर 'चौदालोक'चे नाथ आहेत, ते तुमच्यात पण आहेत, सर्वांमध्ये आहेत! तुमच्यात अव्यक्त रुपात आहेत आणि 'येथे' माझ्या आत संपूर्णपणे व्यक्त झालेले आहेत! माझ्या आत प्रकट झालेले 'दादा भगवान' यांना मी पण नमस्कार करतो.''

व्यापारात धर्म असावा परंतु धर्मात व्यापार नसावा. या सिद्धांताने त्यांनी आपले संपूर्ण जीवन व्यतीत केले. संपूर्ण जीवनात त्यांनी कधीही, कोणाकडूनही पैसे घेतले नाहीत, उलट स्वत:च्या व्यवसायातून झालेल्या फायद्यातून भक्तांना यात्रा करवित असत.

## निवेदन

ज्ञानी पुरुष संपूज्य दादा भगवान यांच्या श्रीमुखातून अध्यात्म आणि व्यवहारज्ञानासंबंधित जी वाणी निघाली, तिला रेकॉर्ड करून संकलन व संपादन करून पुस्तकाच्या रूपाने प्रकाशित केले जात आहे. विभिन्न विषयांवर निघालेल्या सरस्वतीचे अद्‌भुत संकलन ह्या पुस्तकात झाले आहे, जे नवीन वाचकांसाठी वरदान रूप सिद्ध होईल.

प्रस्तुत अनुवादामध्ये असे विशेष ध्यान ठेवलेले आहे की प्रत्येक वाचकाला दादाश्रींची प्रत्यक्ष वाणीच ऐकली जात आहे असा अनुभव व्हावा. याच कारणाने कदाचित काही ठिकाणी अनुवादाची वाक्य रचना मराठी व्याकरणानुसार त्रुटीपूर्ण जाणवेल, परंतु तिथे जर आशय समजून वाचण्यात आले तर अधिक लाभदायी होईल.

प्रस्तुत पुस्तकात काही ठिकाणी कंसात दर्शविलेले शब्द किंवा वाक्य दादाश्रींद्वारा बोलल्या गेलेल्या वाक्यांना अधिक स्पष्टतापूर्वक समजावण्यासाठी लिहिले गेले आहेत. तसेच काही ठिकाणी इंग्रजी शब्दांना मराठी अर्थाच्या रूपात ठेवले गेले आहेत. दादाश्रींच्या श्रीमुखातून निघालेले काही शब्द जसेच्या तसेच *इटालिक्स* मध्ये ठेवलेले आहेत, कारण त्या शब्दांसाठी मराठी भाषेत असे शब्द नाहीत की जे त्याचा पूर्ण अर्थ देऊ शकतील. तरी पण त्या शब्दांचे समानर्थी शब्द कंसात तसेच पुस्तकाच्या शेवटी पण दिले गेले आहेत.

ज्ञानींच्या वाणीला मराठी भाषेत यथार्थ रूपाने अनुवादित करण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु दादाश्रींच्या आत्मज्ञानाचा आशय जसा आहे तसा तर आपल्याला गुजराती भाषेतच अवगत होईल. ज्यांना ज्ञानाचा गहन अर्थ समजून घ्यायचा असेल, ज्ञानाचे खरे मर्म समजायचे असेल त्यांनी ह्या हेतूने गुजराती भाषा शिकावी असा आमचा अनुरोध आहे. अनुवादासंबंधी उणीवांबद्दल आपले क्षमा प्रार्थी आहोत.



# संपादकीय

अवर्णनीय, अवक्तव्य, नि:शब्द आत्मतत्वाचे वर्णन कशा प्रकारे होऊ शकते? कोणाजवळ एवढी क्षमता आहे? जे निरंतर आत्मरमणतेत स्थित असतात, सदैव आत्म्यातच स्थिर असतात असे 'ज्ञानी पुरुष'च आपल्या ज्ञानसिद्ध संज्ञेने मुमुक्षूंना आत्मदर्शन घडवून देतात. प्रस्तुत ग्रंथात परमपूज्य 'दादा भगवान' यांच्या श्रीमुखातून संज्ञाभाषेने निघालेल्या वाणीचे संकलन केले आहे. प्रत्यक्षरूपात ऐकणाऱ्याला तर त्याचक्षणी आत्मदर्शन होत असते. येथे तर ते परोक्षरूपात आहे, तरीही या भावनेने हे ग्रंथ प्रकाशित करण्यात येत आहे की कित्येक काळापासून तत्वज्ञानासंबंधी जी स्पष्टीकरणे अप्रकट होती ती आता प्रत्यक्ष 'ज्ञानी पुरुष' परमपूज्य 'दादा भगवान' यांच्या योगाने प्रकट होत आहेत, तर त्याचा लाभ मुमुक्षूंना अवश्य होईल, ज्ञानींच्या प्रत्यक्ष उपस्थितीत तर संपूर्ण आत्मजागृती उपलब्ध होत असते. परमपूज्य 'दादा भगवान' यांच्या सान्निध्यात कल्पनाही करता येणार नाही अशी आत्मजागृती फक्त एका तासात लाभली असे शेकडो आत्मज्ञानप्राप्त झालेल्या व्यक्ती स्वानुभवाने सांगतात!

केवलज्ञान स्वरूपी मूळ आत्म्याविषयी, 'ॲबसोल्यूट' आत्मज्ञाना विषयी, अचूक समज तर 'केवल'पर्यंत पोहोचलेले 'ॲबसोल्यूट' आत्मविज्ञानीच देऊ शकतात. प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या भागात आत्मविज्ञान आणि दुसऱ्या भागात व्यवहारज्ञान यांचे संकलन दिले आहे. आत्यंतिक मुक्ती तेव्हाच शक्य आहे जेव्हा आत्मज्ञान आणि संपूर्ण आदर्श व्यवहारज्ञान या दोनही पंखांनी उडता येईल. एका पंखाने उडणे अपूर्ण आहे. शुद्ध व्यवहारज्ञान नसलेले आत्मज्ञान, त्याला शुष्क ज्ञान म्हटले जाते. शुद्ध व्यवहारज्ञान म्हणजे 'आपल्या वाणीने, विचाराने आणि वर्तनाने जगातील कोणत्याही जीवाला किंचितदेखील दु:ख न होणे.' जिथे यथार्थ आत्मज्ञान आहे तिथे त्याच्या परिणामी शुद्ध व्यवहार असतोच. मग तो व्यवहार त्यागीपणाचा असो की गृहस्थीपणाचा असो, तो चालू ठेवत ठेवत मुक्तीची शिडी चढताना कसलीही अडचण येत नाही. त्यासाठी केवळ शुद्ध व्यवहाराची गरज आहे. फक्त आत्म्यासंबंधी गृह्य गोष्टी होत असतील पण प्रत्यक्ष रोजच्या व्यवहारात जर क्रोध, मान, माया, लोभ यांचे साम्राज्य

असेल तर हे ज्ञान वांझोटे आहे असे म्हणावे लागेल. परमपूज्य 'दादा भगवान' यांची ज्ञानवाणी प्रपंचातील प्रत्येक अडचणींसाठी अतिशय साधे आणि सोपे उपाय सांगते की जी स्वयं क्रियाकारी होऊन झालेला गुंता सोडवते. घरात, नोकरी धंद्यात किंवा अन्य कोणत्याही बाबतीत जेव्हा कुलूप लागते, (सर्व मार्ग खुंटले असे वाटते) तेव्हा त्या कुलूपाची एखादी चावी सहज समोर सापडते आणि कुलूप उघडते! या ग्रंथात शक्य तितक्या सर्व किल्ल्यांचे संकलन करण्याचा प्रयत्न केला आहे. जिज्ञासूंनी त्या सर्व किल्ल्या कार्यकारी होण्यासाठी, शुद्ध भावाने स्वत:मध्ये विराजमान असलेल्या परमात्म्याला प्रार्थना करून या ग्रंथाचे वाचन मनन करावे की ज्यामुळे सर्व ज्ञानकला आणि बोधकला स्वत:ला उपलब्ध होतील, त्या कला (प्रसंगी) निश्चित फळ देतील.

सर्वसामान्यपणे 'ज्ञानी पुरुषां'ना काही शास्त्रांबद्दल विशेष ज्ञान असते असे समजले जाते. खरे म्हणजे अशा व्यक्तींना शास्त्रज्ञानी म्हटले जाते. आत्मज्ञानी आणि शास्त्रज्ञानी यात आकाशपाताळा एवढा फरक आहे. शास्त्रज्ञानींना 'मार्गाचे' शोधक म्हणतात याउलट आत्मज्ञानी स्वत: तर आत्ममंजिलपर्यंत पोहोचलेले असतातच आणि अनेकांनाही तिथे पोहोचवितात! संपूर्ण निरंहकारी पद प्राप्त करणाऱ्या आत्मानुभवी पुरुषांनाच 'ज्ञानी पुरुष' म्हणतात. असे 'ज्ञानी पुरुष' हजारो वर्षात एखादेच उत्पन्न होतात. तेव्हा त्या काळात ते जगात अद्वितीय असतात. अशांनाच अवतारी पुरुष म्हणतात. भयंकर कर्म करणाऱ्या कलियुगी माणसांच्या महापुण्याच्या भव्य उदयामुळे या काळात असे 'ज्ञानी पुरुष' परमपूज्य 'दादा भगवान' आपल्याला लाभले आहेत! धन्य आहे त्या महापुण्याचीसुद्धा!

प्रकट परमात्म्याला स्पर्श करून प्रकट झालेल्या या साक्षात् सरस्वतीला परोक्षपणे ग्रंथाच्या रूपात ठेवण्यात, आणि तेसुद्धा काळ, निमित्त आणि संयोगांच्या आधीन निघालेली वाणी सर्वांसाठी हृदयर्स्पशी होवो यासाठी संकलन करण्याच्या प्रयत्नात ज्या काही उणींवा असतील तर त्या संकलन शक्तीच्या मर्यादेमुळेच संभवित झाल्या असणे शक्य आहे, त्याबद्दल क्षमा प्रार्थना!

**डॉ. नीरूबहन अमीन जय सच्चिदानंद**

# उपोद्घात

## [ खंड : 1 ]

## आत्मविज्ञान

अनंत काळापासून अनंत लक्ष्ये वेधली परंतु 'मी कोण आहे?' हेच लक्ष्य मात्र साध्य करू शकलो नाही. खरा मार्ग 'मी कोण आहे?' याचा शोध घेणे हाच आहे किंवा तो मार्ग दाखविणाऱ्यांना पण खऱ्या मार्गाने चालणारे असे आपण म्हणू शकतो. कागदावर काढलेले दिव्याचे चित्र प्रकाश देऊ शकत नाही, तो फक्त दिव्याची रूपरेखाच देऊ शकतो. प्रकाश मात्र, प्रत्यक्ष दिवाच देतो! म्हणजेच आत्मज्ञानाची प्राप्ती प्रकट प्रत्यक्ष 'ज्ञानी पुरुषां'च्या माध्यमातूनच शक्य आहे.

सर्व शास्त्रे एकाच आवाजात बोलू लागली, 'आत्मज्ञान जाणा.' अहो! पण ते शास्त्रात सामावलेले नाही, ते तर ज्ञानींच्या हृदयात सामावले आहे.

अनंत प्राकृत अवस्थांमध्ये अडकलेला आपणहून त्यातून बाहेर निघून आत्मस्वरूप कसा होऊ शकेल? जप, तप, ध्यान, योग सामायिक अशा वेगवेळ्या क्रिया करून स्थिरता प्राप्त करण्याचा जो प्रयत्न करतो, तो तर स्वभावत:च चंचल आहे, तो स्थिर कसा होईल? 'दरअसल आत्मा' (मूळ आत्मा) स्वभावातच अचल आहे एवढीच समज दृढ करावयाची आहे!

ज्ञानींच्या आज्ञेखेरीज आत्म्याची आराधना अशक्य आहे! 'ज्ञानी' तर संज्ञेने समजावून देण्यास समर्थ असतात! जो शब्द-स्वरूप नाही, जो फक्त स्वभाव-स्वरूप आहे, जिथे शब्दांची गरज नाही, जिथे कुठलेही माध्यम नाही, जो फक्त स्वभाव स्वरूप आहे जो फक्त केवळज्ञानस्वरूप आहे अशा आत्म्याचे लक्ष्य अनंत भेदांने, आत्मविज्ञानी अशा 'ज्ञानी पुरुषां'खेरीज कोणी बसवू शकेल असे नाही.

मरणाच्या भीतीने कोणी स्वत: औषधांचे मिश्रण बनवून पीत नाही, आणि आत्म्याच्या बाबतीत मात्र स्वत:च (औषधाचे) मिश्रण बनवून

पिणे म्हणजे अनंत जन्मांच्या मरणाला आमंत्रण देणे आहे. हाच स्वच्छंद आहे? आणखी काय?

आत्मा ज्ञानस्वरूप नाही, विज्ञानस्वरूप आहे. ज्याला आत्मविज्ञान समजेल तोच 'ॲबसोल्यूट' आत्माप्राप्त करू शकेल. भौतिक विज्ञानांत वर्षानुवर्षे घालविली तरी (मोक्षाचे) काम होत नाही, आणि आत्मविज्ञान तर अंत:मुहूर्तात देखील 'ॲबसोल्यूट' बनवून टाकते.

धातूंच्या मिश्रणाचे विभाजन, त्या त्या धातूंच्या गुणधर्मांच्या ज्ञानाच्या आधारे होऊ शकते. त्याच प्रकारे आत्मा-अनात्मा यांच्या मिश्रणाचे विभाजन जो या दोन्हींचे गुणधर्म जाणत असेल तोच पुरुष वैज्ञानिक प्रयोगाद्वारे करू शकतो.

अनादि काळापासून विनाशी वस्तूंकडे वळलेली दृष्टी 'ज्ञानी पुरुष' स्वत:च्या अविनाशी स्वरूपाकडे वळवितात. ती दृष्टी नंतर परत तिथून हटत नाही! दृष्टीपालटामुळेच संसार उभा आहे. 'ज्ञानी पुरुषां'ची ही दिव्यातिदिव्य अशी देणगी आहे. जिच्यामुळे ते अंत:मुहूर्तात आत्मदृष्टी करवून देतात, दिव्य दृष्टी देतात, ती स्व आणि पर यांच्या आत्म-स्वरूपालाच पाहते. ते दृष्टी दृष्ट्यात स्थिर करून देतात. मग स्वत:ला 'मी शुद्धात्मा आहे' अशी खात्री होते! दृष्टी पण 'मी शुद्धात्मा आहे' असे म्हणू लागते! (दृष्टी आणि दृष्टा) यांचा भेद नष्ट होतो आणि ते अभेद होतात!

जिथे दृष्टी दृष्ट्यात पडते, तिथे संपूर्ण दर्शन प्रकट होते. दृष्टी दृष्ट्यात पडली स्वभावसन्मुख झाली की स्वत:च्या दरअसल (मूळ) शुद्ध स्वरूपाची प्रतीती होते. प्रतीती होते, मग दृष्टी आणि दृष्टा यांचा ऐक्यभाव होतो! जिथे आत्मदृष्टी असते, तिथे निराकूलता असते, आत्मदृष्टीने मोक्षद्वार उघडते! देहदृष्टी आणि मनोदृष्टीने संसार उत्पन्न होतो.

शुद्ध ज्ञान जे निरंतर विनाशी-अविनाशी वस्तूंचे भेदांकन करून यथार्थ दाखविते, आणि तोच परमात्मा आहे!

संसार व्यवहार क्रियात्मक आणि आत्मव्यवहार हा ज्ञानात्मक

असल्यामुळे दोन्ही सदैव भिन्न रूपानेच वर्ततात. एकाची क्रिया आहे आणि दुसऱ्याचे जाणणे आहे. 'करतो तो अहंकार' आणि 'जाणतो तो शुद्धात्मा' एवढा फरक ज्याला समजला त्याचा संसार अस्त झाला. ज्याला हे भेदांकन प्राप्त करायचे असेल आणि जर त्याला 'ज्ञानी पुरुष' भेटले नसतील तर त्याने 'हे भगवंता! ज्ञान तुमचे आणि क्रिया माझी.' ही प्रार्थना आतमधील भगवंताला सतत करत राहावी, तरीही एक न एक दिवस त्याला भगवंत भेटल्याशिवाय राहणार नाही!

स्वत: आत्मा झाल्याशिवाय त्याला ज्ञाता-दृष्टा असे कसे म्हणता येईल? जोपर्यंत निजस्वरूपाचे भान होत नाही, तोपर्यंत ज्ञाता-दृष्टापणा इंद्रिय ज्ञानाच्या आधारावर आहे. खरे तर अतींद्रिय ज्ञानाच्या आधारावरच यथार्थ ज्ञाता-दृष्टा पदात येता येते.

ज्ञान आणि आत्मा हे अभेदस्वरूपाने आहेत. मिथ्यादृष्टी गेली आणि सम्यक् दृष्टी प्राप्त झाली की यथार्थ ज्ञानाचे स्वरूप समजू लागते, नंतर 'ज्ञानी पुरुषां'च्या सत्संगाद्वारा ते 'फिट' होत होत, ज्ञान-दर्शन वाढत वाढत प्रवर्तनात (आचरणात) येते आणि जेव्हा केवळ आत्मप्रवर्तनात येते, ज्ञान-दर्शनाशिवाय अन्य कुठलेही प्रवर्तन नसते, तेच केवलज्ञान होय.

जगात जे ज्ञान चालू आहे, मंत्र, जप, शास्त्रज्ञान, ध्यान, योग, कुंडलिनी ते सर्व इंद्रियज्ञान आहे, भ्रांती ज्ञान आहे. यामुळे संसारात शांती मिळते. पण मोक्ष हा अतींद्रिय ज्ञानानेच होतो.

शास्त्रज्ञान म्हणजे श्रुतज्ञान किंवा स्मृतिज्ञान, ते आत्मज्ञान नाही. पुस्तकात किंवा शब्दात 'चेतन' नाही. होय, जिथे परमात्मा स्वयं प्रकट झाले आहेत अशा ज्ञानींची किंवा तीर्थंकरांची वाणी परमात्म्याला स्पर्श करून बाहेर पडलेली असते, त्यामुळे ती आपल्या सुप्त असलेल्या चेतनाला जागे करते!

'सर्वधर्मान् परित्यज्य, मामेकं शरणं व्रज.' - देहाचे धर्म, मनाचे धर्म, वाणीचे धर्म की जे परधर्म आहेत, भयावह आहेत, त्या सर्वांचा त्याग करून फक्त माझ्या, म्हणजेच आत्म्याच्या धर्मात ये. माझ्या म्हणजे

जो मुरलीवाला दिसतो त्याच्या नाही, तर आत बसलेल्या परमात्म स्वरूपाला शरण यायला सांगितले आहे!!!

निजस्वरूपाचे अज्ञान तीच भ्रांती आणि तीच माया. 'स्वत: जे नाही' त्याची कल्पना होणे म्हणजेच भ्रांती! जो शब्दप्रयोग नाही पण अनुभव प्रयोग आहे अशा निजस्वरूपाला जाणायचे आहे. मुख्य म्हणजे हे सर्व समजून घेण्याची गरज आहे. समजण्यानेच मोक्ष आहे.

संयोगांच्या दबावामुळे भ्रांती उत्पन्न झाली. खरे म्हणजे आत्म्याला भ्रांती होतच नाही, आत्मा गुन्हेगार नाही. अज्ञानतेमुळे गुन्हेगार आहे असे भासू लागते.

संपूर्ण 'ज्ञानी पुरुष' लपून राहू शकत नाहीत. त्यांना स्वत:ला जे सुख प्राप्त झाले आहे ते जगाला वाटण्यासाठी ते जगाबरोबरच राहतात. मुमुक्षूंना तर 'ज्ञानी पुरुषां'चे नेत्र बघूनच त्यांची ओळख पटते.

कोणी खिसा कापो, शिव्या देवो, हात-कापो, कान कापो तरीही ज्याला राग-द्वेष होत नाही, ज्याच्यात अहंकार आणि ममता नाही त्याला चैतन्य सत्तेचा अनुभव आहे, असे समजावे.

पॅरॅलिसिस झाला असला तरी पण आत्मसुख जात नाही, दु:खांचे रूपांतर सुखात करतो तोच आत्मानुभव. जेव्हा 'मी कोण आहे' याचे भान येते तेव्हा आत्मानुभव होतो.

थिऑरिटिकल म्हणजे समज, आणि अनुभव तर 'प्रॅक्टिकल' वस्तू आहे. अक्रम मार्गाने आत्मानुभव एका तासातच होतो!!! नाही तर कोटी जन्मांपर्यंत कितीही साधना केली तरी देखील काहीही निष्पन्न होत नाही!

आत्म्याचे लक्ष्य निरंतर राहते म्हणजेच आत्मसाक्षात्कार. आनंद आणि शोक कुठल्याही प्रकारच्या परिस्थितीमध्ये हजर राहून स्वत:ला सुरक्षित ठेवते तेच ज्ञान.

खडे ओळखेल त्याला गहू कोणते ते समजेल.

'असत्' काय ते जाणील तोच 'सत्' काय ते जाणील.

अज्ञानाला जो ओळखील तोच ज्ञानाला ओळखील.

आत्मानुभव कोणाला होतो?

पूर्वी ज्याला 'मी चंदुलाल आहे' असे भान होते, त्यालाच आता 'मी शुद्धात्मा आहे' याचे भान होते, त्यालाच आत्मानुभव होतो.

विचारांच्या द्वारा उत्पन्न झालेले ज्ञान म्हणजे शुद्ध आत्मज्ञान नाही, विचार स्वयं आवरणकारी असतात. आत्मा निर्विचार स्वरूप आहे. विचार आणि आत्मा अगदीच भिन्न आहेत. आत्म्याचे स्वरूप मन, बुद्धी, चित्त, अहंकार, शब्द आणि विचार यांच्या स्वरूपाहून वेगळे आहे. ज्ञान, दर्शन, चारित्र्य असे ज्याचे स्वरूप आहे आणि परमानंद ज्याचा स्वभाव आहे, अशा आत्म्याला ओळखायचे आहे.

'चंदुलाल' प्रयोग आहे आणि 'शुद्धात्मा' स्वतः प्रयोगी आहे. प्रयोगालाच प्रयोगी मानण्याचा परिणाम म्हणजे चिंता, उपाधी!

अज्ञाशक्तीमुळे जगाची अधिकरण क्रिया चालू राहते आणि प्रज्ञाशक्तीने ती संपते. स्वरूपज्ञानाची प्राप्ती झाली की प्रज्ञा प्रकट होते आणि अज्ञा निरोप घेते. अज्ञा संसारात भटकवत ठेवते, प्रज्ञा मोक्षाच्या किनाऱ्यापर्यंत नेऊन पोहोचविते! प्रकट झालेली प्रज्ञा सतत आत्महितच दाखविते, सतत सावध करत राहते आणि संसारातून मुक्त करते! केवळ प्रकाश स्वरूप आत्मा संसाराच्या बाहेर निघणार तरी कसा? ते काम तर आत्म्याचेच एक अंग स्वरूप असलेली प्रज्ञा करते! आत्म्याच्या मूळ कल्पशक्तीतून अज्ञा उत्पन्न होते, त्यात मग अहंकार मिसळतो आणि मग त्यामुळे संसारचक्र निवांतपणे चालू राहते! संयोगांच्या जबरदस्त दबावामुळे स्वाभाविक ज्ञान-दर्शन विभाविक बनले आहे. सिद्धगतीत संयोग नसतात, संयोगांचा दबाव नसतो म्हणून तिथे विकल्पही नसतात.

कर्तेपणाबद्दल निःशंकता म्हणजेच अज्ञदशा. कर्तेपणाबद्दल शंका येणे म्हणजे स्थिप्रज्ञदशा आणि कर्तेपण संपूर्ण नष्ट झाले की प्रज्ञा उत्पन्न होते.

चित्त आणि प्रज्ञा यात फरक किती? तर चित्त फक्त (पूर्वी)

पाहिलेलेच पाहू शकते, याउलट प्रज्ञा सर्व नवीनच पाहते, विशेष जाणते. स्वत:चे दोष पण दाखविते ती प्रज्ञा. चित्त इतर सर्व गोष्टी बघू शकते पण प्रज्ञेला पाहू शकत नाही. मात्र आत्मा प्रज्ञेलाही पाहू शकतो! प्रज्ञा केवलज्ञान प्राप्त होईपर्यंतच शुद्धात्माच्या सेवेत राहते.

आत्म्याने एक विकल्प केला आणि लगेच पुद्‌गलाने करामत करून संसार उत्पन्न केला! यात कोणीही स्वतंत्र कर्ता नाही. संयोगाच्या दबावामुळे ही परिस्थिती निर्माण झाली. या पुद्‌गलाचे निरंतर परिवर्तन होतच असते, वेगवेगळ्या अवस्थांच्या रूपात! तत्त्व स्वरूपात पुद्‌गल परमाणू स्वरूप आहे जे अविनाशी आहे. पुर+गल म्हणजे पुद्‌गल. पूरण आणि गलन होतच राहणे म्हणजेच पुद्‌गल. रूप, रस, गंध आणि स्पर्श हे पुद्‌गलाचे मुख्य चार गुण आहेत. पुद्‌गलात ज्ञान-दर्शन नाही, संवेदनेचा अनुभवही नाही, आणि क्षायकभाव पण नाही! जगात फक्त पुद्‌गल तत्त्वाचीच सक्रियता असते. इतर तत्त्वांचा स्वभाव अक्रिय आहे. पुद्‌गलाच्या सक्रीयतेमुळे जगात तऱ्हेतऱ्हेची रूपे दिसतात.

थोडेसे विष देखील 'चेतना'ला 'ऑन दी मोमेंट' (तत्क्षणी) घर (शरीर) सोडून जायला लावते. पुद्‌गलाची केवढी ही प्रचंड ताकद!!!

परमाणूंची शुद्ध अवस्था म्हणजे विश्रसा. संयोगांच्या दबावामुळे 'मी चंदुलाल आहे आणि मी हे केले' असे अज्ञान जेव्हा उत्पन्न होते तेव्हा परमाणू चार्ज होण्याचा प्रयोग होतो म्हणून त्यांना प्रयोगसा म्हणतात. 'प्रयोगसा' झाल्यावर कारण शरीर बनते, आणि तेच पुढील जन्मात मिश्रसा बनते, आणि ते थेट कडू-गोड फळे देईपर्यंत मिश्रसा रूपात राहते. फळ देत असताना 'बेहोश' अवस्थेमुळे पुन्हा नवीन 'चार्ज' करतो आणि हे चक्र चालतच राहते. लोक ज्याला कर्म भोगले असे म्हणतात, म्हणजेच सुख-दु:ख परिणाम असे म्हणतात त्याला 'ज्ञान' परमाणूंच्या बदललेल्या अवस्था स्वरूपात 'पाहत आणि जाणत' राहते. त्यामुळे नंतर नवीन 'प्रयोग' होत नाही आणि हे चक्र तुटते.

शरीर अनंत प्रकारच्या परमाणूंनी गच्च भरलेले आहे. उग्र परमाणूंच्या उदयात तन्मयाकार झाल्याने क्रोधाचा जन्म होतो, एखादी वस्तू पाहताच

आसक्तीचे परमाणू उभे होतात, त्यांच्याशी तन्मयाकार झाल्याने लोभाचा जन्म होतो. 'मान' मिळताच तन्मयाकार होऊन खुश होतो आणि त्याच्यात 'स्वत:' एकाकार होतो तिथे अहंकाराचा जन्म होतो. या सर्व अवस्थांमध्ये 'स्वत:' तन्मयाकार झाला नाही तर क्रोध, मान, माया, लोभ या गोष्टी उद्‌भवणारच नाहीत. फक्त परमाणूंचा परिणाम शिल्लक राहील, आणि त्यांची *'निर्जरा'* होऊन जाईल!!

क्रोधात 'प्रतिष्ठित आत्मा', 'बिलीफ आत्मा' एकाकार होतो, मूळ आत्मा एकाकार होतच नाही.

*पूरण-गलन* या विज्ञानाला ज्ञानी आणखी सूक्ष्मपणे समजावतात की जेवण केले याला लौकिक भाषेत *पूरण* केले असे म्हणतात, पण हे *पूरण* हे 'फर्स्ट' (पहिले) गलन आहे आणि शौचास जाणे हे 'सेकंड' (दुसरे) *गलन* आहे. प्रत्यक्षात जे *पूरण* असते ती अत्यंत सूक्ष्म गोष्ट आहे, आणि ती फक्त 'ज्ञानी पुरुष'च पाहू शकतात, जाणू शकतात!

ज्याला पुद्‌गलात 'पारिणामिक दृष्टी' प्राप्त होते त्याला विषयसुखे फिकी वाटतात. जिलबी खाल्ली त्याची दुसऱ्या दिवशी काय दशा होईल? खीर खाल्ली त्याची ओकारी झाली तर ती कशी दिसेल? अशी पारिणामिक दृष्टी असली पाहिजे.

शरीराचे परमाणू, मनाचे परमाणू क्षणोक्षणी बदलत असतात. परमाणू सतत बदलत राहतात पण ते कमी-जास्त होत नाहीत.

ज्याप्रमाणे प्रत्येक आत्म्याचा एकच स्वभाव असतो, त्याप्रमाणे प्रत्येक परमाणूचा पण एकच स्वभाव असतो. पण क्षेत्र बदलल्यामुळे भाव बदलतात आणि भाव बदलल्यामुळे प्रत्येकात होणारा बदल वेगवेगळ्या प्रकारचा असतो. त्या आधारावरच जगाचे आस्तित्व टिकून आहे. परमाणू जड तत्त्वाचेच असतात. परमाणू जड आहेत पण चेतनभाव प्राप्त केल्यामुळे ते चेतनवाले बनतात, त्यांना मिश्रचेतन म्हणतात. जोपर्यंत परमाणू शरीराच्या बाहेर असतात तोपर्यंत ते विश्रसा असतात, शरीरात प्रवेश केला की ते प्रयोगसा होतात आणि फळ देतेवेळी ते मिश्रसा होतात.

फक्त आत्महेतूसाठी ग्रहण केलेले परमाणू सर्वश्रेष्ठ असतात. ते मोक्षाला जाईपर्यंत चक्रवती सम्राटासारख्या सुखसोयी देतात.

जोपर्यंत प्रयोगसा अवस्था असते तोपर्यंत परिवर्तन शक्य असते. मिश्रसा झाल्यावर कोणाची सत्ता चालत नाही. (शरीरा) बाहेर शुद्ध स्वरूपात असलेले परमाणू स्वाभाविक विश्रसा असतात. आत्म्याबरोबर संयोग झाल्यावर विभाविक, प्रयोगसा बनतात. विभाविक पुद्‌गल विनाशी असते, स्वाभाविक पुद्‌गल अविनाशी असते. विभाविक पुद्‌गल स्वतंत्र नसते ते 'व्यवस्थित'च्या आधीन असते.

मूळ स्वरूपात परमाणू फक्त केवलज्ञानातच दिसतात.

ज्याप्रमाणे आत्मा अनंत शक्तीवाला आहे त्याचप्रकारे पुद्‌गलही अनंत शक्तीवाले आहे. आत्मा या पुद्‌गलाची शक्ती जाणण्यासाठी गेला आणि स्वत:च त्यात कैद होऊन बसला आहे! पुद्‌गलाच्या धक्क्यामुळे आत्म्यामध्ये नैमित्तिक कर्तेपणा उत्पन्न झाला आहे.

दोन सनातन तत्त्वे एकत्र आली की विशेष परिणाम उत्पन्न होतो.

'मी करतो' हा कर्ताभाव आहे, आणि कर्ताभाव हेच कर्म आहे. जिथे कर्ताभाव नाही, तिथे कर्म नाही आणि म्हणून तिथे पापही नाही आणि पुण्यही नाही!

देह परमाणूंचे बनलेले आहे. क्रोध आणि मानाचे परमाणूंचे प्रमाण जास्त असले की पुरुष देह मिळतो आणि माया व लोभ यांचे परमाणू जास्त झाले तर स्त्रीदेह मिळतो. परमाणूंच्या प्रमाणात बदल झाले तर दुसऱ्या जन्मात लिंग बदल होऊ शकतो, पण आत्म्यात मात्र भेद नाही.

चांगले-वाईट विकल्पामुळे दिसते. निर्विकल्पी व्यक्तीला चांगले-वाईट असे काही नसतेच.

जे डोळ्यांनी दिसतात, दुर्बिणीने दिसतात ते सर्व स्थूल परमाणू आहेत. मिश्रसा हे सूक्ष्म परमाणू आहेत, प्रयोगसा हे सूक्ष्मतर परमाणू आहेत आणि विश्रसा हे सूक्ष्मतम परमाणू आहेत!

पुद्‌गल हे पण सत् म्हणजे अविनाशी आहे. पुद्‌गलाचे पण पर्याय

आहेत, ते 'स्वत:'च्या प्रदेशात राहून बदलतात आणि ते विनाशी आहेत. पुद्गल *पूरण-गलन* स्वभावाचे आहे!

आत्मा सोडून इतर सर्व भाव पुद्गल भाव आहेत. मन, बुद्धी, चित्त, अहंकार, क्रोध, मान, माया, लोभ हे सर्व पुद्गल भाव आहेत. त्यांना फक्त पहात राहायचे आहे. त्यात तन्मयाकार झाले तर जोखीमदारी येईल आणि तन्मयाकार झाला नाहीत तर सुटाल! पुद्गलभावाला जो पहातो आणि जाणतो तो आत्मभाव आहे. तोंड बिघडले (वाकडे झाले), मनोभाव बिघडले, असा सर्व परिणाम झाला तर त्याला पुद्गल भावाशी तन्मयाकार झाले असे म्हणतात.

जोपर्यंत स्व-सत्तेला जाणले नाही तोपर्यंत स्वत: परसत्तेत आहे. परसत्तेला स्वसत्ता मानतो तोच अहंकार आहे.

सत्तेचा थोडा जरी दुरुपयोग झाला तर सत्ता निघून जाते.

सर्व प्रकारच्या क्रिया आणि क्रियावाले ज्ञान, हे सर्व परसत्ता आहे. जी अक्रिय आहे, ज्ञाता-दृष्टा, परमानंदी आहे, जी क्रियेच्या ज्ञानाला ओळखते, तीच 'स्वत:'ची स्वसत्ता असते. जितका शुद्ध उपयोग राहील, तितकी स्वसत्ता प्रकट होईल. अत्यंत घोर अपमान झाला असतानाही परसत्ता स्वत:वर कुरघोडी करत नाही तेव्हा त्याला आत्मज्ञान प्राप्त झाले आहे असे म्हणता येईल! एक तास स्वभावात राहून प्रतिक्रमण केले तर स्वसत्तेचा अनुभव येईल.

करतो कोणीतरी दुसरा आणि 'मी करत आहे' असे मानतो ती परपरिणती आहे. 'व्यवस्थित शक्ती' जे जे करवून घेते, त्याला वीतरागभावाने पहात राहणे, ही स्वपरिणती आहे. एक क्षणदेखील जे परपरिणतीत प्रवेश करत नाहीत ते ज्ञानी! तेच देहधारी परमात्मा! जो स्वपरिणतीत असतो त्याला परपरिणती स्पर्शही करत नाही.

''जेव्हा ज्ञान उपयोगात येते तेव्हा तो स्वपरिणतीत येतो.''

ज्ञानींची आज्ञा, ज्ञानींचे दर्शन स्वपरिणतीत आणणारे आहेत. जोपर्यंत किंचितदेखील कोणाचे अवलंबन आहे तोपर्यंत परपरिणती असते.

'डिस्चार्ज' भावांना स्वत:चे भाव मानतो त्यामुळे परपरिणतीत जातो. 'डिस्चार्ज' भावांना जो स्वत:चे भाव मानत नाही तो स्वपरिणतीत आहे. एक पण 'डिस्चार्ज' भाव स्वत:चा मानत नाहीत ते 'ज्ञानी पुरुष'!

स्वपरिणाम आणि परपरिणाम जीवमात्रांना असतातच. परपरिणामांना स्वपरिणाम मानणे आणि करणारा पण मीच आहे आणि जाणणारा पण मीच आहे असे समजणे म्हणजेच अज्ञान.

पुद्‌गल आणि आत्मा दोन्ही परिणामी स्वभावाचे आहेत, म्हणून क्षणोक्षणी परिणाम बदलत असतात तरीही 'स्वत:चा' स्वभाव कधीही कोणीही सोडत नाही. पुद्‌गलाच्या पारिणामिक भावांमुळे सांसारिक ज्ञान हजर होते, उदा. बटाटे खाल्ले तर वात होईल. याउलट शुद्धात्म्याचे पारिणामिक भाव म्हणजे 'ज्ञाता-दृष्टा'! क्रोध, मान, माया, लोभ हे सर्व पण पुद्‌गलाचे पारिणामिक भाव आहेत. पारिणामिक भावात कधीच बदल होऊ शकत नाही. आता जग ज्याला सोडा असे म्हणते त्याला वीतराग 'परीक्षा देणे' असे म्हणतात, मग 'परिणाम' आपोआपच येईल.

आत्म्याचा स्वभाव असा आहे की तो जशी कल्पना करतो तसा तो ताबडतोब होतो. आत्म्याचा प्रकाश बाहेर गेला म्हणून अहंकार निर्माण झाला. मूळ आत्मा चिंतवन करत नाही, परंतु 'अहंकारा'चे आरोपण करून चिंतवन करतो तेव्हा त्याच रूपाचा विकल्प बनून जातो! चिंतवन म्हणजे विचार करतो ते नाही, पण स्वत: मनात जो आशय निश्चित करतो, त्याला चिंतवन म्हणतात.

'मी दु:खी आहे' असे चिंतवन केले की (माणूस) दु:खी होतो आणि 'सुखी आहे' असे म्हटल्याबरोबर सुखी होतो. एखाद्या वेड्या माणसाने 'मी शहाणा आहे' असे चिंतवन केले तर तो शहाणा होईल.

जोपर्यंत 'मी स्त्री आहे, मी पुरुष आहे' अशी मान्यता आहे तोपर्यंत मोक्ष नाही. 'मी (स्वत:) आत्मा आहे' असे मान्यतेत आले तर मोक्ष आहे!

पुद्‌गल अधोगामी स्वभावाचे आहे, आत्मा उर्ध्वगामी स्वभावाचा आहे. बुद्धीशालींच्या टचमध्ये (संपर्कात) आल्यामुळे स्वत: अधोगामी

होतो. परमाणूंची आवरणे जितकी अधिक, तितकी अधिक खालची गती. आत्मा जेव्हा निरावरण होतो, तेव्हाच मोक्षात जातो.

जो गुणधर्मासह आत्म्याला जाणील आणि तद्रूप परिणाम प्राप्त करील, त्यालाच आत्मज्ञान होते. आत्म्याचे अनंत गुण आहेत – अनंतज्ञान, अनंतदर्शन, अनंतशक्ती, अनंतसुख, अव्याबाध, अरूपी, असंग, अविनाशी...

अनंतकाळापासून अनंत ज्ञेयांना जाणतो-पाहतो तरी पण आत्म्याचे शुद्धत्व नष्ट होत नाही!

अक्रमज्ञानींचे हे अद्भुत वाक्य ज्याला पूर्णपणे समजेल, त्याला ते पद प्राप्त होईल.

''अनंत ज्ञेयांना जाणण्यात परिणमीत झालेल्या अनंत अवस्थांमध्ये मी संपूर्ण शुद्ध आहे, सर्वांग शुद्ध आहे.'' – **दादा भगवान**

जसेजसे पुद्गल पर्याय बदलतात तसेतसे ज्ञानपर्याय बदलतात. पर्याय सतत बदलत असतांनासुद्धा ज्ञान संपूर्ण शुद्ध, सर्वांग शुद्ध राहते!

ज्ञानात भेद नसतो. केवलज्ञान स्वरूपी आत्म्यात तर ज्ञान आणि दर्शन याचाही भेद नसतो. गुण आणि वस्तू अभिन्न भावाने अभेद भावानेच असतात. मात्र शब्दात वर्णन करताना भेद भासू लागतो!

अवस्थेचे ज्ञान विनाशी असते, मूळ स्वाभाविक ज्ञान सनातन असते! ज्ञेय समोर आल्यावर ज्ञान ज्ञेयाच्या आकारासारखे होऊन जाते तरी पण स्वत:ची शुद्धता गमावत नाही, कुठल्याच काळात!

आत्मा आणि पुद्गल दोन्हीही द्रव्य, गुण आणि पर्याय सहित आहेत. आत्म्याचे गुण अन्वय-सहचारी असतात आणि पर्याय परिवर्तनशील असतात. वस्तूच्या सूक्ष्म अवस्थांना पर्याय म्हणतात.

ज्ञेयांना जाणतेवेळी राग-द्वेष झाले तर बंधन आहे आणि वीतराग राहिले तर मुक्तच आहे!

दर्शन सामान्य भावाने असते आणि ज्ञान विशेष भावाने ज्ञान असते, त्यामुळे ज्ञेये वेगवेगळी दिसतात आणि त्यामुळेच ज्ञान-पर्याय ज्ञेयाकार

होतात पण दृश्याकार होत नाहीत. आत्मा स्वभावाने आकाशासारखा, ह्या ट्युब लाइटसारखा आहे. ह्या लाइटला डब्यात बंद केले तरी त्याला काही चिकटत नाही, आत्म्याचे द्रव्य ह्या लाइटसारखे आहे. प्रकाशमान (प्रकाशित) करण्याची शक्ती म्हणजे ज्ञान-दर्शन आहे, गुण आहे, आणि त्या प्रकाशात ज्या ज्या वस्तू दिसतात त्या साऱ्या ज्ञेय आहेत.

चेतनाचे चेतन पर्याय असतात आणि अचेतनाचे अचेतन पर्याय असतात.

यथार्थ आत्मा प्राप्त झाल्यानंतरच आत्म्याचा आनंद उत्पन्न होतो. स्थिती कशीही असो तरी निरंतर परमानंद असेल तर त्यालाच मोक्ष म्हणतात. दुसऱ्या कोणत्याही गोष्टीवर अवलंबून नसलेल्या, सहज उत्पन्न होणाऱ्या आनंदालाच आत्मानंद म्हणतात. आनंद हा आत्म्याचा अन्वय गुण आहे. सिद्धगतीत पण सोबत राहणारा गुण आहे! आत्मा जाणल्यानंतरच आत्म्याचा शुद्ध आनंद उत्पन्न होतो आणि तो क्रमशः वाढत वाढत शेवटी संपूर्णते पर्यंत पोहोचतो.

जीवमात्रांच्या आत अनंत शक्ती आहेत, पण त्यांच्यावर आवरणे आहेत. अहंकार आणि ममता निघून गेल्यावर त्या शक्ती प्रकट होतात! 'भगवंतां'कडून मागण्यायोग्य शक्ती फक्त ज्ञान शक्ती आणि स्थिरताशक्ती याच आहेत, पुद्‌गल शक्ती मागणे योग्य नाही! आत्मशक्ती म्हणजेच आत्मवीर्य. अहंकारामुळे आत्मवीर्यावर आवरण येते. जेव्हा आत्मवीर्य कमी होत आहे असे वाटते तेव्हा 'मी अनंत शक्तीवाला आहे' असे मोठ्याने 25-50 वेळा म्हटल्याने आत्मवीर्य प्रकट होते! 'मोक्ष प्राप्त होईपर्यंत त्या मार्गात येणाऱ्या संकटांच्या पुढे मी अनंत शक्तीवाला आहे' असे म्हणण्याची गरज आहे, मोक्ष मिळाल्यावर त्याची गरज नाही. 'ज्ञाता-दृष्टा' राहिल्यामुळे सर्व संकटे नष्ट होतात आणि आत्म्याच्या शक्ती प्रकट होतात. विनाशी वस्तूंच्या मूर्च्छेमुळे आत्म्याची चैतन्यशक्ती झाकली जाते.

सहाही तत्त्वे शुद्ध स्वरूपात अगुरु-लघु स्वभावाची आहेत. आत्मा टंकोत्कीर्ण आहे त्याचे कारण तो अगुरु-लघु स्वभावाचा आहे.

'क्रोध, मान, माया, लोभ' हे आत्म्याचेही गुण नाहीत, तसेच

जडाचेही गुण नाहीत. ते अन्वय गुण पण नाहीत पण आत्म्याच्या उपस्थितीमुळे उत्पन्न होणारे पुद्गलाचे गुण–व्यतिरेक गुण आहेत. जसे सूर्याच्या उपस्थितीमुळे दगडात उष्णतेचा गुण उत्पन्न होतो त्याप्रमाणे.

आत्मा अरूपी आहे. अरूपीला रूपी चिकटला हेच आश्चर्य आहे! भ्रांतीमुळे चिकटल्यासारखा वाटतो. पण वास्तवात तसे नाही.

टंकोत्कीर्ण म्हणजे आत्मा आणि पुद्गल यांचे मिक्स्चर स्वरूप झाले आहे. कंपाउंड (संयुग) नाही! दोन तत्त्वे सोबत आहेत पण ती एक–दुसऱ्यांशी कधीही एकाकार होत नाहीत, त्याचे कारण आत्मा टंकोत्कीर्ण स्वभावाचा आहे! मिक्स्चरच्या स्वरूपात असतो, कंपाउंडच्या स्वरूपात नाही. तेल आणि पाण्याला कितीही एकत्र करा तरीही त्या दोघांचे परमाणू कधीच एकमेकात मिसळून एकाकार होत नाहीत. दोन्ही वेगवेगळेच राहतात. याप्रमाणेच आत्मा आणि अनात्म्याबद्दल म्हणता येईल! सहाही तत्त्वे मूळ स्वरूपात टंकोत्कीर्ण स्वभावाची आहेत! टंकोत्कीर्णचा यथार्थ अर्थ फक्त ज्ञानीच सांगू शकतात! वीतरागांचा हा एकदम विलक्षण शब्द आहे!

अव्याबाध स्वरूप म्हणजे आत्म्याचा असा गुण आहे की तो कधीही कोणत्याही जीवाला किंचितमात्रही दु:ख देऊ शकत नाही! त्याचप्रमाणे त्याला स्वत:लाही कधीच दु:ख होऊ शकत नाही!!! स्वत:कडून समोरील व्यक्तीला दु:ख होत आहे अशी थोडी शंका जरी आली तर त्या व्यक्तीसाठी प्रतिक्रमण करण्याची गरज आहे. दु:ख, त्रास 'मानलेल्या आत्म्या'ला होतो, मूळ आत्म्याला नाही. मूळ आत्मा अव्याबाध स्वरूप आहे.

आत्मा अव्यय आहे. परंतु भाजनाच्या प्रमाणे त्याचा विस्तार किंवा आकुंचन होते, असे असते. आत्मा निरंतर निराकार आहे. तरीही देहाकारी असतो, त्याचा स्वत:चा स्वाभाविक आकार असतो.

जोपर्यंत स्वत:च्या निराकार परमात्म्याची प्राप्ती होत नाही, तोपर्यंत ज्या देहात परमात्मा प्रकट झाले आहेत अशा प्रत्यक्ष 'ज्ञानी पुरुषां'ची भजना केल्यामुळे स्वत:चा परमात्मापणा प्रकट होतो.

आत्मा अमूर्त आहे आणि मूर्तीच्या आत आहे ‘ज्ञानी पुरुष’ ज्यांच्यात अमूर्त भगवंत व्यक्त झाले आहेत त्यांना ‘मूर्तामूर्त’ भगवंत म्हणतात.

आत्मा परम ज्योती स्वरूप आहे, आतील बाहेरील सर्व वस्तूंना जाणतो, वस्तूला वस्तूच्या रूपात जाणतो आणि अवस्थेला अवस्थेच्या रूपात जाणतो. आत्मा स्व–पर प्रकाशक आहे, म्हणजे स्वत: स्वत:ला प्रकाशित करतो आणि इतर तत्त्वांनाही जाणतो.

आत्म्याला सुगंध किंवा दुर्गंध स्पर्श करत नाही. ज्या प्रकारे प्रकाशाला सुगंध किंवा खाडीचा दुर्गंध स्पर्श करत नाही त्याप्रमाणे!

अंतिम देहातून आत्मा जेव्हा मोक्षाला जाण्यासाठी मुक्त होतो, तेव्हा त्याचा प्रकाश संपूर्ण ब्रह्मांडात व्यापतो (पसरतो). ज्ञानभावाने व्यापतो त्या दृष्टीने त्याला सर्व व्यापक असे म्हटले आहे.

सर्व आत्म्यांचा स्वभाव एकच असतो पण प्रत्येक आत्म्याचे स्वतंत्र अस्तित्त्व असते. संसाराच्या कोणत्याही वस्तूचा आत्मा कर्ता नाही. मात्र तो ज्ञानक्रिया आणि दर्शनक्रिया यांचा कर्ता आहे. इतर कोणत्याही बाबतीत त्याची सक्रियता नसते. मात्र, आत्म्याच्या उपस्थितीमुळे दुसऱ्या तत्त्वात सक्रियता उत्पन्न होते.

ज्ञान + दर्शन म्हणजेच चैतन्य. आत्म्यात अनंत दर्शन आणि अनंतज्ञान असल्यामुळे त्याला चैतन्यघन असे म्हटले आहे.

अनंत प्रदेशी असलेल्या आत्म्याच्या प्रत्येक प्रदेशात ज्ञायक शक्ती आहे. मात्र ज्ञेयालाच ज्ञाता मानल्यामुळे आत्म्याचे प्रदेश कर्म–मळाच्या आवरणाने झाकले जातात. आत्मा अकर्ता आहे. संसाराच्या कोणत्याही क्रियेचा आत्मा कर्ता नाही. (फक्त) स्वत:च्या स्वाभाविक ज्ञानक्रियेचा आणि दर्शनक्रियेचा कर्ता आहे. या व्यतिरिक्त तो कुठेही सक्रीय नाही.

ज्ञानावरण, दर्शनावरण अशा आठ प्रकारच्या कर्मरूपी आवरणांमुळे आत्मप्रकाश आच्छादित आहे. आत्मज्ञान झाल्यावर ही सर्व आवरणे तुटत जातात, परिणामी आनंद प्रकट होतो. प्रत्येक जीव आवरणासहित असतो.

ज्याचे जेवढ्या प्रदेशांचे आवरण तुटलेले असते, त्या प्रमाणात त्याचा प्रकाश बाहेर येतो.

''स्वत:कडे स्वत:ची संपूर्ण ब्रह्मांडाला प्रकाशमान करण्याची जी स्वसंवेदनशक्ती आहे, त्याला केवलज्ञान असे म्हणतात.''

- **दादा भगवान.**

अज्ञानी दु:ख वेदतो.

स्वरूपज्ञानी म्हणजे आत्म्याचे अस्पष्ट वेदनवाले दु:खाचे ज्ञाता-दृष्टा रहाण्याच्या प्रयत्नात असतात. ते दु:ख भोगत नाहीत, पण त्यांना दु:खाचे ओझे जाणवते. आणि आत्म्याचे स्पष्ट वेदन असलेले 'ज्ञानी पुरुष' दु:ख वेदत नाहीत तर फक्त जाणतात.

कोण भोगत असतो? तर अहंकार, आत्मा नाही.

आत्म्याचे चार उपयोग आहेत : अशुद्ध, अशुभ, शुभ आणि शुद्ध उपयोग. शुद्ध उपयोगीला मोक्ष मिळतो. 'स्वत: शुद्धात्मा आहे' अशी निरंतर जाणीव असेल, पूर्ण जग निर्दोष दिसत असेल, सगळ्यांच्यात शुद्धात्मा दिसत असेल, तर तो शुद्ध उपयोग आहे. मनात, वाणीत आणि वर्तनात तन्मयाकार परिणाम होत नसतील तर तो शुद्ध उपयोग आहे. ज्ञानींचा संपूर्ण शुद्ध उपयोग असतो. ज्ञानींना उपयोगात उपयोग राहतो.

''शुद्ध उपयोग त्याला ज्ञान स्वरूप म्हणतात आणि उपयोगात उपयोग, त्याला विज्ञान स्वरूप म्हणतात.'' - **दादा भगवान.**

केवलज्ञान म्हणजे केवल आत्मप्रवर्तन. 'ॲबसोल्यूट' ज्ञान म्हणजेच केवलज्ञान. आणि फक्त तेच आनंद देऊ शकते. निरंतर निज परिणती, जिथे पुद्‌गल-परिणती नाहीच, तेच केवलज्ञान.

''निज परिणती तीच आत्मभावना आहे, 'मी शुद्धात्मा आहे' ही आत्मभावना नाही. - **दादा भगवान.**

केवलज्ञान होईपर्यंत पिंडांचे ज्ञेय पाहायचे आणि केवलज्ञान झाल्यावर ब्रह्मांडाचेच ज्ञेय झळकतात.

केवलज्ञान हे आकाशासारखे सूक्ष्म आहे उलट अग्नि स्थूल आहे. स्थूल सूक्ष्माला जाळू शकत नाही. मारा, कापा, जाळा तरीही स्वत:च्या केवलज्ञान स्वरूपावर काहीही परिणाम होऊ शकत नाही असे असते.

– **दादा भगवान.**

उपयोगात उपयोग वर्तत असतो ते केवलज्ञान आहे. स्वत: शुद्ध आहे हेही पाहतो, आणि समोरचाही शुद्ध आहे असे पाहतो, याला शुद्ध उपयोग म्हणतात आणि त्या शुद्ध उपयोगावर उपयोग राहतो त्याला उपयोगावर उपयोग असे म्हणतात.

''केवलज्ञान स्वरूप कसे दिसते? संपूर्ण शरीरात आकाशाचा जो भाग आहे तो स्वत:चा दिसतो, आकाशच दिसतो, इतर काहीच दिसत नाही. कोणतीही मूर्त वस्तू त्यात दिसत नसते.'' – **दादा भगवान.**

''या जगात जे जे काही केले जाते ते जगाला परवडो किंवा न परवडो, तरीही 'मी काहीच करत नाही' असे सतत लक्षात असणे म्हणजेच केवलदर्शन. अशी समज राहणे म्हणजेच केवलज्ञान!''

–**दादा भगवान.**

मन, वचन, काया यांच्या सर्व संगी क्रियांपासून शुद्ध चेतन पूर्णत: असंगच आहे. – **दादा भगवान.**

''मन, वचन, काया, यांचे जे लेपायमान भाव येतात त्यापासून 'शुद्ध चेतन' संपूर्ण निर्लेपच आहे.'' – **दादा भगवान.**

मनात जे भाव, विचार येतात ते, वाणी आणि काया ही सर्व अज्ञानदशेची स्पंदने आहेत, ज्ञानदशेत कोणतीही स्पंदने होत नाहीत.

स्वरूपज्ञान झाल्यावर मनात जे भाव येतात ते लेपायमान करण्याचा प्रयत्न करतात, पण तेव्हा जर अशी जागृती राहिली की 'हे माझे स्वरूप नाही, यापासून मी मुक्तच आहे' तरच निर्लेप राहता येईल.

''मन, वचन, काया यांच्या सर्व सवयी आणि त्यांचे स्वभाव 'शुद्ध

चेतन' जाणतो आणि स्वत:च्या स्व-स्वभावाला पण तो जाणतो कारण तो स्व-पर प्रकाशक आहे.'' – **दादा भगवान.**

मनाच्या, वाणीच्या, कायेच्या सवयींना स्वत: जाणतो आणि सवयींच्या स्वभावाला पण स्वत: जाणतो. सवयींचा स्वभाव म्हणजे ही सवय जाड (पक्की) आहे, ही पातळ आहे, ही चिकट आहे, ही खोल आहे, ही उथळ आहे, असे सगळे स्वत: जाणतो. सवयी मृत्यूपर्यंत जात नाहीत, पण सवयींचा स्वभाव आत्मज्ञानानंतर हळूहळू जातो.

''स्थूल संयोग, सूक्ष्म संयोग, वाणीचे संयोग पर आहेत आणि पराधीन आहेत, आणि शुद्ध चेतन यांचा ज्ञाता-दृष्टा आहे''

– **दादा भगवान.**

आतील मनाचे, बुद्धीचे, चित्ताचे आणि अहंकाराचे संयोग हे सर्व सूक्ष्म संयोग आहेत. वाणीचे संयोग सूक्ष्म-स्थूल आहेत आणि व्यवहाराचे संयोग हे स्थूल आहेत. हे सर्व संयोग 'पर' आहेत आणि 'पराधीन' आहेत.

''प्रकृतीचा एकही गुण 'शुद्ध चेतना'त नाही आणि 'शुद्ध चेतना'चा एकही गुण प्रकृतीत नाही. गुणांच्या बाबतीत हे दोघे संपूर्ण भिन्न आहेत.''

– **दादा भगवान.**

प्रथम अज्ञानातून मुक्ती आणि नंतर अज्ञानामुळे उत्पन्न होणारे 'इफेक्टस्' (परिणाम) यातून मुक्ती मिळवायची आहे.

आत्मद्रव्य कधी बदलत नाही, परंतु 'व्यवहार आत्म्याला' संसारी भावामुळे स्पर्श झालेले द्रव्य, क्षेत्र, काळ, या भाव ते सर्व एक दुसऱ्यांच्या आधाराने बदलत राहतात.

राग-द्वेष हे 'रॉंग बिलीफ'मुळे उत्पन्न होत असतात. तो काही आत्म्याचा स्वभाव की गुण नाही.

'रिलेटिव्ह'मध्ये आत्मा आणि 'रियल'मध्ये परमात्मा. 'रिलेटिव्ह'ची भजना केली तर 'स्वत:' विनाशी आहे आणि 'रियल'ची भजना करील तर 'तो' 'परमात्मा' आहे!

जीवमात्रात चेतन एकाच स्वभावाचे आहे. परंतु आवरणात फरक आहे.

अविनाशीचे 'चिंतवन' केले तर माणूस अंतर्मुखी होत जातो आणि विनाशीचे चिंतवन केले तर बहिर्मुखी होत जातो.

मोक्षाला जाणारा सरळ रस्ता म्हणजे मोक्षमार्गाच्या मार्गदर्शकाच्या मागे-मागे चालत राहणे.

जोपर्यंत मन, वचन, काया यांची ममता आहे तोपर्यंत समता कशी येईल ?

बाहेरील कोणत्याही निमित्ताने, पंचेद्रिंयांद्वारे, मानपान, लक्ष्मी, विषय अशा कोणत्याही गोष्टीपासून सुख येत नसेल तरी पण आतमध्ये जे सुख वर्तत असते ते आत्म्याचे सुख आहे. जोपर्यंत विषयांचे सेवन चालू आहे तोपर्यंत आत्म्याच्या स्पष्ट सुखाचे वेदन (अनुभव) होत नाही.

ज्या प्रकारे लिफ्टमधून जाणारी व्यक्ती आणि लिफ्ट दोन्ही वेगळे आहेत त्याप्रमाणे आत्मा आणि शरीर पूर्णपणे वेगळेच आहेत. लिफ्टच सर्व काम करते, स्वतःला फक्त बटणच दाबावे लागते. त्याचप्रकारे ज्याला भौतिक इच्छा आहेत त्याला अहंकाराचे बटण दाबले पाहिजे आणि ज्याला मोक्षाला जाण्याची इच्छा आहे त्याने आत्मभावाने बटण दाबले पाहिजे.

जो स्वसत्तेत येतो, पुरुष बनून पुरुषार्थात येतो तो भगवंत, जो प्रकृतीच्या सत्तेत खेळत राहतो तो जीव.

आत्म्याने देह स्वरूप धारण केलेलेच नाही. फक्त 'बिलीफ'च (मान्यातच) चुकीची झाली आहे.

मोक्ष देहाचाही होत नाही आणि आत्म्याचाही होत नाही. मोक्ष अहंकाराचा होतो - अहंकाराची दृष्टी बदलल्यामुळे 'जे नाही त्यालाच तो मी आहे' अशी मान्यता धरून चालतो.

'मी आहे' असे म्हणतो त्या कारणाने 'स्वतः' आत्म्यापासून वेगळा

पडतो. ते अज्ञान जेव्हा जाईल तेव्हा तो अभेदस्वरूप होईल. स्वतःच्या जितक्या चुका दिसू लागतात, तितका अहंकार कमी होतो.

सर्व जीवमात्रात सूझ (समज, दर्शन) असते. सूझ ही नैसर्गिक देणगी आहे. आवरण येते तेव्हा सूझ पडत नाही, आवरण दूर झाले की सूझ येते. एकाग्रता झाली की लगेच सूझ येते (सुचते). भ्रांतीमुळे सूझ म्हणजे पुरुषार्थ असे जग समजते. प्रत्येकाच्या सूझवरून तो समसरण मार्गाच्या कोणत्या मैलावर आहे त्याची माहिती कळते! माणसात फक्त सूझ एवढी एकच गोष्ट 'डिस्चार्ज' नाही, बाकी सर्व 'डिस्चार्ज' आहे. सूझ हिलाच दर्शन म्हणतात. समसरण मार्गात सूझ वाढत जाऊन अखेरीस 'मी शुद्धात्मा आहे' अशी सूझ आली, की दर्शन निरावरण होऊन जाते.

अहंकारामुळे लोक सूझेचा फायदा घेऊ शकत नाहीत. नाही तर सूझ ही प्रत्येकाला असतेच. जसा, जसा अहंकार कमी होत जातो, तशी तशी सूझ वाढत जाते.

आत्मज्ञानानंतर सर्व प्रथम सर्व बाजूंनी उदासीनता येते आणि मग वीतरागता प्राप्त होते. उदासीनता ही तर वीतरागतेची जननी आहे. उदासीनता म्हणजे रुचीही नाही आणि अरुचीही नाही. वीतरागता म्हणजे राग-द्वेषाच्या पलीकडील स्थिती.

''प्रतिष्ठित आत्मा हेच जगाचे अधिष्ठान आहे.'' - **दादा भगवान.**

'मी चंदुलाल आहे, हे माझे शरीर आहे, हे माझे मन आहे' अशी प्रतिष्ठा केल्यामुळे नवा प्रतिष्ठित आत्मा उत्पन्न होतो. याचे मूळ कारण अज्ञान हे आहे. 'प्रतिष्ठित आत्मा' म्हणजे खरे तर आहे पुद्गल, पण त्याला चेतनभाव प्राप्त झाला आहे, म्हणजे मिश्रचेतन आहे. क्रोध, मान, माया, लोभ यांची प्रतिष्ठा प्रतिष्ठित आत्म्यात झाली आहे, ती फळ देत राहते.

जो शुभ-अशुभ भाव करतो, त्याला व्यवहार आत्मा असे म्हणतात. स्वरूप ज्ञानापूर्वी तर प्रतिष्ठित आत्मा असे म्हणताच येत नाही, स्वरूप ज्ञानानंतर जो शिल्लक राहतो तो प्रतिष्ठित आत्मा आहे.

मूळ आत्म्याला भाव-अभाव नसतात. त्याच्या उपस्थितीमुळे भाव-अभाव उत्पन्न होतात.

जो अचल आत्मा आहे तोच 'दादा भगवान' आहे. जो चंचल आहे तो सर्व 'मेकॅनिकल' भाग आहे. जे ज्ञानाची वाक्ये बोलतात ते व्यवहारात ज्ञानी आणि जे आत प्रकट झाले आहेत ते 'दादा भगवान' आहेत. 'ज्ञानी पुरुष' स्वतःही आतमधील 'दादा भगवानां'ना नमस्कार करतात. काही काळ 'दादा भगवान' यांच्याशी अभेद राहतात, तन्मयाकार राहतात, आणि वाणी बोलत असताना 'आतमध्ये' भगवान वेगळे होतात आणि स्वतः वेगळे होतात. ज्ञानी पुरुषांची दशा अशी अद्‌भुत असते!

## [ खंड : 2 ]

## व्यवहार ज्ञान

जगाचा कोणीही स्वतंत्र कर्ता नाही. कोणीही बाप देखील *उपरी* (वरिष्ठ) नाही, भगवंत पण नाही. जी शक्ती जग चालवते ती 'मेकॅनिकल ॲडजस्टमेंट' आहे, कंप्युटरसारखी आहे आणि 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियम एव्हिडेन्सेस्'नुसार आहे. परंतु अज्ञानामुळे मी चालवतो किंवा ईश्वर चालवतो असे मानले जाते. स्वरूपाचे भान झाल्यावर मग स्वतः या सर्वांमधून मुक्त होतो. मोक्षाच्या मार्गावर प्रयाण करता करता जीवन जगण्याच्या कलेचे कौशल्य प्राप्त करणे हेही अनिवार्य असते. फक्त 'अक्रम विज्ञान'च असे आहे की ज्याद्वारे संसाराच्या सर्व जवाबदाऱ्या संपूर्ण, आदर्श पद्धतीने पार पाडत पाडत सहज प्रकारे मोक्ष गाठला जाऊ शकतो. अक्रम ज्ञानात त्यागाचे नाही तर 'समभावाने निकाल' करण्याचे जीवनसूत्र स्वीकारावे लागते. त्यासाठी सर्व प्रकारच्या बोधकला आणि ज्ञानकला 'अक्रम विज्ञानी' श्री दादा भगवान यांच्या श्रीमुखातून प्रकट झाल्या आहेत. संसारातील क्लेश समाप्त करणारी ही वाणी आत्मजागृती घडवून आणणाऱ्या वाणी इतकीच क्रियाकारी सिद्ध झाली आहे. कारण अखेरीस व्यवहारच शुद्ध करायचा आहे ना! संसारात पती-पत्नीमध्ये, आई-वडील आणि मुले यांच्यामध्ये, गुरु-शिष्यामध्ये शेजारी-पाजारी, नोकर-शेठजी, व्यापारी-गिऱ्हाईक अशा सर्व प्रकारच्या संबंधामध्ये होणारे

सर्व प्रकारचे संघर्ष संपविण्याची चावी दादाश्री हसत-हसवत सांगतात, या अद्‌भुत अनुभवपूर्वकच्या व्यवहार-दर्शनाचा लाभ घेऊन, पृथ्वीवर स्वर्ग मिळवता येणे शक्य आहे!

जीवन जगण्याचा उद्देश काय आहे? नाव कमावणे? नाव तर तिरडी निघते, तेव्हा परत घेतले जाते. मग सोबत काय येईल? मोक्षासाठी धर्म नंतर करावा पण प्रथम जीवन जगण्याचे कौशल्य प्राप्त करणे गरजेचे आहे. इंजिन चालत असेल पण त्यातून काहीच उत्पादन घडत नसेल तर अशा इंजिनाचा काय उपयोग? मोक्षप्राप्ती हे तर मनुष्य जीवनाचे मुख्य सार आहे. वकील झाला, डॉक्टर झाला म्हणजे काय जीवन जगण्याची कला शिकला? नाही, त्याचे कलाधर भेटले तरच ती कला शिकता येते. जीवन जगण्याची कला शिकला तरच आयुष्य सहज सरळपणे जगता येईल. ज्याला जीवन जगण्याचे कौशल्य मिळाले त्याचा सगळा व्यवहार धर्म त्यात सामावला. 'अक्रम विज्ञान' व्यवहार धर्म आणि निश्चय धर्म दोन्हीही पूर्णपणे देतो.

वास्तवात दु:ख कशाला म्हणतात? जीवनावश्यक गोष्टी म्हणजे रोटी, कपडा, मकान आणि पत्नी एवढे मिळाले नाही तरीही त्याला दु:ख म्हटले जात नाही, अडचण म्हटले जाते. खरे दु:ख हे केवळ अज्ञानामुळे आहे.

आपल्याजवळ किती संपत्ती आहे? कोट्यावधी रुपये खर्च केले तरी असे डोळे मिळू शकतात का? याशिवाय दात, नाक, हात, पाय या सगळ्यांची किती किमत असेल?

ज्ञानी अनावश्यक वस्तूत कधीच अडकून राहत नाहीत. त्यांच्याकडून कोणत्याही रेडिओ किंवा घड्याळ यांच्या कंपन्यांना काही फायदा झाला नाही. अनावश्यक वस्तूंची खरेदी करणे आणि आवश्यक वस्तूंच्या बाबतीत काटकसर करणे अशी आजकालच्या लोकांची पद्धत झाली आहे! या जगात फुकट मिळणाऱ्या गोष्टीच सर्वात महाग पडतात! फुकट वस्तू मिळवण्याची सवय झाल्यावर ती मिळाली नाही तर किती त्रास होईल?!

जो सुखाचे दुकान उघडतो, त्याला सुखच मिळते आणि जो दु:खाचे दुकान उघडतो त्याला दु:ख मिळते. 'ज्ञानी'च्या दुकानाबद्दल तर काय बोलावे? समोरच्या व्यक्तीने शिव्या दिल्या, तरी ज्ञानी त्याला आशीर्वादच देतात! एक आठवडा जर कोणाला दु:खच दिले नाही आणि कोणाकडून दिलेले दु:ख स्वीकारले नाही, असे केले तरीही खूप प्रगती होईल. 'माझ्याकडून या जगातील कोणत्याही जीवाला किंचितमात्रही दु:ख न होवो, न होवो, न होवो.' अशी भावना रोज होऊ लागली तर तीच सर्वश्रेष्ठ कमाई आहे.

संसार म्हणजे समोरासमोर हिशोब फेडण्याची जागा. यात कुठेच कुणाशीही वैर बांधले जाऊ नये एवढेच पाहायचे आहे. 'समभावाने निकाल' करणे हीच सर्वात मोठी किल्ली आहे, निर्वैर स्वरूपात मुक्त होण्यासाठी!

जेवणाच्या ताटात जे आले ते 'व्यवस्थित शक्ती'च्या नियमानुसारच आपल्याला मिळाले आहे. या प्रकारे जो सहज जीवन जगतो, त्याला कसलाही त्रास होत नाही.

समुद्रात असंख्य प्राणी असतात पण 'मला हे दु:ख आहे' अशी कोणी तक्रार करतो का? फक्त हा माणूसच रात्रं-दिवस 'मला हे दु:ख आहे, मला ते दु:ख आहे' अशी तक्रार करत राहतो! कोण्या पक्ष्यांचे दवाखाने पाहिले आहेत का? कोणा प्राण्याला झोपेची गोळी खावी लागते का? फक्त या माणसाचीच झोप एवढी बिघडली आहे की झोपेच्या गोळ्या खाव्या लागतात!

मनुष्य जन्मच मोक्ष प्राप्तीसाठी आहे आणि तो जर मिळाला नाही तर या मन, वचन, कायेचा उपयोग दुसऱ्यांसाठी करावयाचा आहे, ज्याचे जीवन 'योग-उपयोग परोपकाराय' अशा प्रकारे परोपकारात व्यतीत झाले, त्याला कशाचीच कमतरता पडत नाही. स्वत:चे सुख जो दुसऱ्याला देतो त्याला निसर्ग काहीच कमी पडू देत नाही असा नियमच आहे.

सर्व दु:खांचे मूळ कारण अज्ञानता हे आहे. 'स्वत:' नाव धारण करून बसला आहे त्यामुळे दु:खांची परंपरा निर्माण झाली आहे. स्वत:

आत्मरूप आहे त्याला काहीच दु:ख नाही. वास्तवात दु:ख आहे की नाही याचा बुद्धीने विचार केला तरीही समजून येईल की दु:ख असे काही नाहीच.

इतरांचे सुख पाहून स्वत: जवळ ते नाही असा विचार करून जे दु:ख ओढवून घेतात त्याच्याइतका असमंजसपणा दुसरा कोणताच नाही. जेवण मिळाले नाही, पाणी मिळाले नाही, संडासाला-लघवीला जाता आले नाही तर त्याला दु:ख म्हणणे ठीक होईल. जीवन जगण्याची किल्लीच जणू हरवली आहे अशा तऱ्हेने लोक जीवन जगतात.

भारतातील 'फॅमिली ऑर्गनायजेशन'

(कुटुंब-संस्था) हे एक मोठे ज्ञान आहे. घरात, घराबाहेर, इतर अनेक ठिकाणी क्लेश का होतात हे समजून घेणे आवश्यक आहे. मुलांना कोणत्या गोष्टीत 'उत्तेजन' द्यायचे आणि कोणत्या गोष्टीत नाही, हे समजून घेणे ही आई-वडिलांची गरज नाही का? मुलगा वडिलांची मिशी ओढतो आणि वडील खुश होऊन त्याचे चार चौघात कौतुक करतात, हे योग्य आहे का? आई-वडील होण्यापूर्वी आई-वडील बनण्याचे योग्यता-पत्र मिळविणे आवश्यक व्हायला हवे. लग्न करण्यापूर्वी पती किंवा पत्नी बनण्याच्या योग्यतेचे सर्टीफिकेट मिळविणे आवश्यक असायला हवे, कारण आई-वडील होणे ही खूप मोठी 'रिस्पॉन्सबिलिटी' (जवाबदारी) आहे, अगदी पंतप्रधान होण्यापेक्षाही जास्त!

आजकालच्या काळात मुलांना जाब विचारला तर ते आपल्यालाच विरोध करतील असे आहे.

शिक्षक आणि आई-वडील अलीकडच्या मॉर्डन जमान्यातील मुलांची मानसिकता ओळखून वागतील तर मुले विरोध करणार नाहीत. स्वत: सुधारला तरच तो दुसऱ्याला सुधारू शकेल.

घरात, बाहेर सगळीकडे सगळा व्यवहार करावा, चालणे-बोलणे सर्वच करावे पण कषाय रहितपणे करावे. आणि हेच कौशल्य 'ज्ञानी पुरुषां'कडून शिकण्यासारखे आहे!

सुधारण्यासाठी कटकट केली तर उलट सर्व बिघडते, त्यापेक्षा कटकट करणे बंद केले की लगेच समोरची व्यक्ती सुधारू लागेल.

कोणाबरोबर भांडण झाले तर त्याच्या मनात गाठ बसते. तेव्हा 'मौन' राहून त्याला विश्वासात घेणे हाच सर्वश्रेष्ठ उपाय आहे. मुलांना जर सुधारायचे असेल तर घरात 6-12 महिने 'मौन' धरावे. मुले जेवढे विचारतील, तेवढीच उत्तरे त्यांना द्यावीत. आणि मनात त्यांच्यासाठी खूप-खूप प्रतिक्रमणे करावीत. त्यांना सुधारण्याचा प्रयत्न करण्याऐवजी चांगली भावना मनात सतत बाळगायला हवी. खरे तर, 'ज्ञानी पुरुष' सोडून दुसरा कोणी कोणाला सुधारू शकत नाही.

न विचारता जो सल्ला देतो, त्याला मूर्ख मानले जाते. कोणी मागितला तर सल्ला देऊ शकतो.

ही सगळी 'रिलेटिव्ह' नाती आहेत. त्यांना 'रियल' (खरी) मानून घेतली तर दु:ख भोगण्याची वेळ येईल. मुलांवर योग्य प्रकारे प्रेम करायला हवे, त्यांना जबरदस्तीने छातीशी कवटाळता कामा नये! त्यामुळे मुलगा उलट गुदमरून चावेल! पैसे नळातील पाण्यासारखे खर्च करता येतात, असे मुलांना कधी वाटता कामा नये.

मुलांचा अहंकार एकदा जागृत झाला की मग आई-वडिलांनी त्याला काही सांगता कामा नये. मग तो जीवनात ठोकर खाऊन शिकेल तेच ठीक. अनिवार्य अशा या प्रपंचात ज्यांना आपले मानले त्याचीच खूप प्रतिक्रमणे करून मुक्त होणे योग्य आहे. जिथे राग आहे, तिथे द्वेषही असतोच.

घरात मुलांशी ग्लास विथ केअर (काचेची वस्तू आहे काळजीपूर्वक हाताळा) ही सूचना वाचली पाहिजे. त्यांना हातोडे मारत राहिलात तर काय होईल? प्रेमानेच समोरचा सुधारतो. समोरचा कितीही चुकीचे वागो, पण तरीही ते चुकीचे वाटू न देणे म्हणजेच खरे प्रेम!

आई-वडील म्हणजे मुलांचे ट्रस्टी.

घराला बागेच्या स्वरूपात पाहायला हवे. शेतीच्या रूपात नाही.

ज्या प्रकारे बागेत एखादा मोगरा, एखादा गुलाब आणि क्वचित धोतरा पण असतो, तसेच घरात देखील वेगवेगळी प्राकृत फुले असतात. वडील मोगरा असतात आणि त्यांचा आग्रह असतो की सगळी मुले मोगऱ्यासारखी असावीत तर कसे चालेल? मग हे तर शेत झाले! यात बागेची गंमत कशी येईल? गार्डनर (माळी) बनायचे आहे.

ज्याच्यात मन, वचन, कायेची एकता असेल तोच समोरच्याला सुधारू शकतो.

एका डोळ्यात प्रेम आणि एका डोळ्यात सक्ती या प्रकारे व्यवहार सांभाळला तर तो आदर्श व्यवहार होईल.

मुलांना सुधारण्यासाठी त्यांच्याबरोबर मैत्री केली पाहिजे. मुलांना प्रेम हवे असते. ती प्रेमानेच सुधारतात. प्रेमानेच सर्व जग वश होते.

मुलांना दररोज सूर्याची पूजा करणे आणि 'मला आणि सर्व जगाला सद्‌बुद्धी द्या, आणि सर्व जगाचे कल्याण करा' अशी प्रार्थना करायला शिकवले पाहिजे.

पती-पत्नीनी एकमेकांना समोरासमोर समाधान देण्याचे प्रयत्न केले तर मतभेद होणार नाहीत. मनात हे निश्चित केले पाहिजे की समोरच्याला समाधान द्यायचे आहे आणि 'समभावाने निकाल' करावयाचा आहे. एवढे निश्चित केल्यानंतर जे घडेल त्याला 'घडला तो न्याय' असे म्हटले पाहिजे.

'संघर्ष टाळा' हे सूत्र प्रत्येक जागी ज्याचे जीवनसूत्र बनेल त्याचा भवसागर पार होईल. सहन करायचे नाही, सहन केले तर केव्हातरी स्प्रिंग प्रमाणे उसळी मारेल. सहन करायचे नसते 'सोल्यूशन' शोधायचे असते.

जेव्हा अपमान होतो, तेव्हा 'न्याय' शोधत बसणे हा मूर्खपणा होईल, तेव्हा तर 'तप' हाच एक उपाय आहे. संपूर्ण स्वतंत्र जगात कोणीच कोणाबरोबर ढवळाढवळ करत नाही, तिथे मग कोणाला दोष देण्याचा प्रश्नच येत नाही ना?

संघर्षाच्या वेळी मौन बाळगणेच उत्तम. परंतु बाहेर मौन आणि आतमध्ये 'तुंबळ युद्ध' असे दोन्ही जर बरोबरीने चालत असेल तर ते उपयोगाचे नाही. प्रथम मनाचे मौन व्हायला हवे.

'ज्ञानीं'च्या 'ॲडजस्ट एव्हरीव्हेर' एवढ्या एकच आज्ञेचे पालन करील त्याची सुटका होईल.

जे बायकोवर हुकूम गाजवित ते 'खोटे नाणे' झाले आहेत.त्याऐवजी अगोदरच 'खोटे नाणे' झाला असता तर पूजेत तरी बसता आले असते.

समोरच्याला समजावून सांगण्याची सूट आहे, रागावण्याची नाही.

मनुष्य स्वभाव आपल्या हाताखालच्या माणसांना तुडविण्याचा आणि वरिष्ठ व्यक्तींसाठी साहेब, साहेब करण्याचा आहे. (उलट) 'अंडरहॅन्ड' (हाताखालच्या माणसा)चे रक्षण करणे हे ध्येय असले पाहिजे.

भिंतीवर डोके आपटते, तेव्हा आपण काय करतो? 'चूक कोणाची आहे?' हे शोधून काढायचे असेल तर कोण भोगत आहे? ते शोधा, आणि मग 'जो भोगतो त्याचीच चूक' हा नियम लावा.

घरात एका जरी व्यक्तीबरोबर एकता जमली तरी खूप झाले! एकता म्हणजे त्या व्यक्तीबरोबर कधीच मतभेद न होणे.

जिथे मतभेद आहेत, तिथे चिंता, दुःख आणि भांडणे. जिथे मनभेद तिथे डायवोर्स (घटस्फोट) आणि जिथे तनभेद तिथे तिरडी.

मुलांसमोर आई–वडिलांनी कधीही भांडू नये.

मियाँभाई बायकोला खूप सांभाळून वागवतात. बाहेर भांडून आले तरी घरात प्रेमाने वागतात. घरातच भांडू लागले तर चांगले–चांगले जेवण कोण देईल? म्हणून ते बायकोला झोपाळ्यावर बसवून झोका देतात. 'बायको डोक्यावर बसेल' या भितीने नवरा बायकोवर वचक ठेवायचा प्रयत्न करतो आणि शेवटी क्लेश करतो! बायको अशी कशी काय डोक्यावर बसेल?! स्त्रियांना काय मिशा येतात? कितीही प्रयत्न केले

तरी ते शक्य आहे का? नाही, बायकोची मागणी पूर्ण करता आली नाही आणि मग बायको चिडू लागली तर, 'यार, मेरी हालत मैं जानता हूँ, तू क्या जाने?' (माझी ओढाताण मलाच माहिती, तुला कसे सांगू?) असे काहीतरी बोलून तो बायकोची समजूत घालतो! आणि आपले लोक तर 'तू माझ्या समोर का बोलतेस?' असे म्हणून भांडण्याचा स्फोट घडवून आणतात! काहीही करून असे करा की स्फोट होणार नाही.

तुमच्यात जर कलुषित भाव राहिला नाही तर समोरच्याचा कलुषित भाव देखील निघून जाईल. तुम्ही शांत राहिलात तर समोरचाही शांत राहील! जिथे क्लेश आहे, तिथे देव राहत नाही आणि मग लक्ष्मी पण तिथे जात नाही. आजकाल तर चांगल्या चांगल्या संस्कारी घरातसुद्धा सकाळच्या न्याहारीपासून क्लेश सुरू होतात. जिथे क्लेश आहेत, तिथे धर्मच नाही. धर्माची सुरुवात क्लेश रहित जीवनापासून होते.

पत्नीबरोबरचे संभाषण अविभक्त असले पाहिजे. त्यात 'तुझे, माझे असता कामा नये.' 'आपले' असले पाहिजे.

घरातील लोक चुकीचे वागले तरीदेखील स्वतः सरळ वागेल, तर ती समकितची निशाणी आहे.

लग्न करण्यात हरकत नाही. संसार म्हणजे 'टेस्ट एक्झॅमिनेशन' आहे. त्यात 'टेस्टेड' (पास व्हाल) तरच मोक्षाला जाता येईल. भरत च्रकवर्तीला तर तेराशे राण्या होत्या तरी ते मोक्षाला गेले.

मतभेद होतात याचे कारण घोर अज्ञान!

जेव्हा पुरुषाचा प्रभाव नसतो, तेव्हा स्त्री पुरुषाचे ऐकत नाही. प्रथम पुरुषाचा प्रभाव पडला पाहिजे. स्त्रियांच्या कित्येक चुका त्याने समजून घेऊन त्याचे समाधान केले तर त्याचा 'स्त्री'वर प्रभाव पडेल. इथे तर वरणात थोडेसे मीठ कमी पडले तरी पती अकांडतांडव करतो, मग प्रभाव कसा पडेल?

स्त्रीची प्रकृती सर्व तऱ्हेने नीट समजून ओळखून, मगच तिच्याबरोबर व्यवहार करावा. स्त्रीचा मानभंग झाला तर ती मरेपर्यंत विसरत नाहीत

आणि मनात डूक ठेवते. मात्र त्याचबरोबर स्त्रिया देवी पण असतात. स्त्री नसलेल्या पुरुषांचा संसार सुशोभित नसतो.

स्त्री-पुरुषांनी एक दुसऱ्यांच्या 'डिपार्टमेंट'मध्ये (खात्यात) थोडीशी देखील लुडबुड करू नये. 'घरात ही वस्तू का कमी आहे, जास्त का वापरली?' असे पुरुषाने स्त्रीला विचारू नये. आणि स्त्रियांनी पुरुषांना 'धंद्यात एवढा तोटा का झाला', असे विचारू नये आणि एक-दुसऱ्यांच्या चुका मोठ्या मनाने निभावून घेतल्या पाहिजेत.

स्त्रीला कधीही मारता कामा नये, त्यामुळे अनंत जन्म भटकावे लागेल. आपल्या आश्रयाला आलेल्या व्यक्तीला आपण तुडवू कसे शकतो?

घरातील लोकांना जो किंचितही दु:ख देत नाही, तोच खरा समंजस आहे.

लग्न करण्यासाठी योग्य निवड करण्यासाठी आजकालचे तरुण-तरुणी जी चिरफाड करतात, (वारंवार पसंत-नापसंत करतात, एकमेकांचे दोष काढतात) त्याला काय लग्न करायची पद्धत म्हणायचे काय? प्रत्याक्षात तर मुलगा आणि मुलगी यांना एकमेकांना बघताच आकर्षण वाटले तर निश्चितच पक्के ऋणानुबंध आहेत आणि आकर्षण होत नसेल तर ती गोष्ट तात्काळ बंद करावी. मग त्यात उंच, ठेंगणी, जाड, बारीक, काळी, गोरी अशा गोष्टींचा काय संबंध?

पूज्य दादाश्री कॉमनसेन्सची व्याख्या सांगतात की 'एव्हरीव्हेअर ॲप्लिकेबल, थिऑरिटिकली ॲज वेल ॲज प्रॅक्टिकली!'

कुलुपाला कितीही गंज का लागलेला असेना, तरी पण किल्ली लावताच उघडता येणे म्हणजेच 'कॉमनसेन्स.' 'कॉमनसेन्स'वाले कधीही घरात किंवा घराबाहेर मतभेद होऊ देत नाहीत. पण असा माणूस तर क्वचितच कोणी असतो.

संपूर्ण आयुष्य बायकोला सरळ करण्यात घालविले आणि जेव्हा मरणाच्या वेळी सरळ झाली, तेव्हा दुसऱ्या जन्मात दुसऱ्या कोणाच्या

वाट्याला जाते! (दोघांची) कर्मे वेगळी आहेत त्यामुळे वियोग तर होणारच ना! हे कायमचे संबंध थोडेच आहेत? एका जन्मापुरतेच आहेत ना! त्यामुळे जे मिळाले त्याच्याशी 'ॲडस्जट' करून घ्यायचे. जितक्या 'ॲडस्जटमेंट' कराल तितक्या जास्त शक्ती विकसित होतील. समोरच्या व्यक्तीच्या जरी शंभर चुका झाल्या तरी त्यात न्याय किंवा आणि कायदा शोधू नये. समाधान कसे मिळेल तेच पाहायचे आहे. निसर्गाच्या न्यायाबाहेर तर काहीच होणार नाही!

प्रत्येकांच्या विचारांची 'स्पीड' (गती) अलग असते. ज्याची 'रिव्होल्यूशन' कमी असतात त्यांना जास्त रिव्होल्यूशन असलेल्याची गोष्ट समजत नाही. म्हणून जास्त 'रिव्होल्यूशन'वाल्यांनी मध्ये 'काउंटरपुली' घालायचे शिकून घ्यावे. मग संघर्ष होणार नाही.

कटकट केल्यामुळे दोघांचेही बिघडते. सम्यक् रीत्या बोलता येत नसेल तर गप्प राहणे योग्य. रागावता पण असे यायला हवे की समोरच्याला दु:ख होणार नाही. नाही तर रागावणे बंद करावे. संघर्ष झाला तर त्या रागावण्याऐवजी प्रतिक्रमण करणे हाच उत्तम उपाय आहे.

अबोला धरून प्रश्न सुटत नाही. समभावाने निकाल केला तरच उत्तर निघते.

सरळ माणसाबरोबर सरळ कोणीही राहू शकतो, परंतु संपूर्ण वाकड्या माणसाबरोबर सरळ वागता आले तर जग जिंकता येईल!

कोणी लाल झेंडा दाखवीत असेल, तर त्याचा दोष न बघता आपले काय चुकले याचा शोध घेतला तर नवीन दोष निर्माण होणे थांबेल आणि जुना दोषही निघून जाईल. खरे म्हणजे आपल्याच चुकांमुळे समोरचा लाल वावटा दाखवतो.

घरात भांडण करूच नये, आणि समोरचा जरी कितीही भांडायला आला तरी आपण इतके 'भांडणप्रूफ' बनायला हवे की आपल्याला काही त्रासच होणार नाही. ज्याच्याबरोबर भांडण झाले आहे, त्याच्याबरोबर दोन तासांनी बोलल्याखेरीज जमणार नसेल, तर भांडण करण्यात काय अर्थ आहे?

समोरासमोर शंका करत राहिल्यामुळे स्फोट होतो.

'माझी-माझी' म्हणत ममतेचे वेढे फिरवले त्याला 'माझी नाही, माझी नाही' असे म्हणत राहिलात तर ते वेढे उलगडतील!

संसारात सर्वांबरोबर 'लटकता सलाम' (दुरून नमस्कार) करत करत मोक्षाला निघून जाण्यासारखे आहे. 'ज्ञानी' सर्व व्यवहार करतात पण 'आत्म्यात' राहून.

आपल्या भारतातील स्त्रियांचे संस्कार तरी पाहा. आयुष्यभर म्हातारा-म्हातारी भांडतात, मारामारी करतात, आणि ८० व्या वर्षी म्हातारा मरतो तेव्हा म्हातारी तेराव्या दिवशी श्राद्ध करते, दानधर्म करते आणि 'तुझ्या काकांना हे आवडायचे, ते आवडायचे' असे करत त्या गोष्टी खाटेवर मांडते आणि परत 'जन्मोजन्मी असा पती मिळो' असे म्हणते!

जे संसार निभावून नेतात ते आदर्श पती-पत्नी! इथे तर केवळ विषयासक्तिमुळे संसार चालवितात. प्रेमाने नाही. जिथे प्रेम असते, तिथे समोरच्या व्यक्तीने काहीही केले, शिव्या दिल्या, मारले तरी प्रेम कमी होत नाही. प्रेमात समर्पण असते, बलिदान असते, *'पोतापणुं'* (मी आहे आणि माझे आहे असे आरोपण, माझेपण) नसते.

पती-पत्नी मध्ये चांगला मेळ जपण्यासाठी मनात रोज शेकडो प्रतिक्रमण करत राहिले तर हा जन्म आणि पुढील जन्म दोन्हीही सुधारतील.

धंद्यातील कमाई खर्च करणारे किती? आणि धंद्याची चिंता-काळजी करणारे किती? स्वतः एकटाच!!! सुखात सर्व वाटेकरी आणि दुःखात... ?

ज्या धंद्यात नुकसान झाले, त्या धंद्यातच ते नुकसान भरून पण निघते.

कर्जदाराने मनात सतत एकच भावना ठेवली पाहिजे की लवकरात लवकर रुपये दुधात धुवून परत करायचे आहेत. अशा व्यक्तींकडून कर्ज

निश्चितच फेडले जाईल. ज्याची नीयत खराब असते त्याचे मात्र बिघडते. (फेडले जात नाही).

'व्यवस्थित शक्ती' गिऱ्हाईकांना पाठवित असते. गिऱ्हाईकांची काळजी करत बसायचे नाही, तसेच अधिक कमावण्याच्या लोभात दुकान लवकर उघडण्यातही काही फायदा नाही. गिऱ्हाईकांची वाट पाहणे, आतून चिडचिड करणे, कोणाचे तरी हिरावून घेण्याची भावना ठेवणे, याला आर्तध्यान आणि रौद्रध्यान म्हणतात.

प्रामाणिकपणामुळे एका प्रकारचे संकट येत असेल तर अप्रामाणिकपणामुळे दोन प्रकारची संकटे येतात. प्रामाणिकपणामुळे येणाऱ्या संकटातून सुटता येते पण अप्रामाणिकपणामुळे येणाऱ्या संकटातून सुटणे अवघड असते. प्रामाणिक माणूस तर मोठा धर्मनिष्ठ म्हटला जातो.

व्यापारात मनोभाव बिघडविला तरीही तेवढाच फायदा होतो आणि मनोभाव शुद्ध ठेवला तरीही तेवढाच फायदा होतो.

''व्यापारात धर्म पाळावा, नाही तर अधर्म घुसेल.''

''व्यापारात धर्म असावा पण धर्मात व्यापार नसावा.''

''नोबल काटकसर असावी.'' – **दादा भगवान.**

घरात काटकसर इतकी असावी की बाहेर वाईट दिसू नये.

काटकसर उदार असावी. स्वयंपाकात काटकसर असताच कामा नये. इतरत्र सर्व ठिकाणी काटकसर करू शकता!

प्रत्येक जीव निसर्गाचा पाहुणा असतो. पाहुण्याला कसली चिंता–उपाधी करायची असते का? जिथे जन्मापूर्वीच डॉक्टर, दाई आणि दुधाची व्यवस्था झालेली असते तिथे कशाला हळहळत बसायचे? पाहुण्याने पाहुण्यासारखे अदबीनेच वागायला हवे. जेवण जसे मिळेल, जेव्हा मिळेल, त्यात जे जे पदार्थ असतील त्याला नावे न ठेवता खाल्ले पाहिजे. झोपायला सांगितले तर झोपले पाहिजे, उठायला सांगितले तर उठले पाहिजे.

शुभ मार्गावर जा किंवा अशुभ मार्गावर जा, त्या दोन्ही मार्गासाठी निसर्ग म्हणतो, 'आय विल हेल्प यू' (मी तुम्हाला मदत करीन).

जिथे सिन्सियारिटी आणि मोरालिटी असतात, तिथे सर्व धर्मांचे सार असते. मोरालिटी म्हणजे स्वतःच्या हक्काचे आणि सहज मिळणारे सर्व काही उपभोगण्याची सूट. जो दुसऱ्यांबरोबर सिन्सियर राहू शकतो तो स्वतःशी पण सिन्सियर राहू शकतो. 'ज्ञानी पुरुषां'चा *राजीपा* (कृपा) आणि सिन्सियारिटी, बस या दोन गोष्टी असतील त्याचे काम निश्चित होतेच. साऱ्या जगाशी अन्‌सिन्सियर पण फक्त ज्ञानींबरोबर सिन्सियर राहिला तरीही तो मुक्त होईल.

व्यवहार आदर्श असेल तरच मोक्ष मिळू शकेल. आदर्श व्यवहार म्हणजे आपल्याकडून कोणत्याही जीवाला किंचित पण दुःख न होणे. ज्ञानींचा व्यवहार आदर्श असतो. सद्‌व्यवहार अहंकार सहित असतो. शुद्ध व्यवहार अहंकाररहित असतो. गच्छमत संप्रदाय, शुद्ध व्यवहारात मोडत नाहीत. शुद्ध व्यवहाराद्वारेच मोक्ष मिळतो. ज्ञानींकडून हे सर्व योग्य प्रकारे समजून, 'स्वरूप ज्ञान' प्राप्त करून, शुद्ध व्यवहार करून संसाराच्या जंजाळातून सुटण्यासारखे आहे.

वीतरागधर्मच सर्व दुःखांपासून सोडवतो.

**जय सच्चिदानंद.**

# अनुक्रमणिका

## [ खंड : 1 ] आत्मविज्ञानी

### [ 1 ] 'मी' कोण आहे ?



### [ 2 ] अज्ञाशक्ती : प्रज्ञाशक्ती



### [ 3 ] पुद्गल, तत्त्व स्वरूपात



### [ 4 ] स्वसत्ता - परसत्ता



### [ 5 ] स्वपरिणाम - परपरिणाम

## [ 6 ] आत्मा, तत्त्वस्वरूपाने



## [ 7 ] आत्म्यासंबंधी प्रश्नावली

## [ 8 ] सूझ, उदासीनता



## [ 9 ] प्रतिष्ठित आत्मा : शुद्धात्मा



## [ 10 ] जगसंचालकाची वस्तुस्थिती



# [ खंड : 2 ] व्यवहार ज्ञान

## [ 1 ] जीवन जगण्याची कला



## [ 2 ] योग उपयोग परोपकारासाठी



## [ 3 ] वास्तवात दु:ख आहे?



## [ 4 ] फॅमिली ऑर्गनायजेशन

**[ 5 ] समजदारीने शोभेल गृहसंसार**

## [ 6 ] व्यापार, धर्मासकट



## [ 7 ] वरिष्ठांचा व्यवहार



## [ 8 ] आपण सर्व निसर्गाचे 'गेस्ट'



## [ 9 ] मनुष्यपणाची किंमत



## [ 10 ] आदर्श व्यवहार





# आप्तवाणी
# श्रेणी - 3

## [ खंड : 1 ]

## आत्मविज्ञानी

## [ 1 ]
## 'मी' कोण आहे?

### जगात जाणण्यायोग्य, मात्र...

जीवनाचे लक्ष्य काय आहे?

'मी स्वत: कोण आहे' याचा शोध घेणे हेच जीवनाचे लक्ष्य असले पाहिजे. दुसरे कोणतेही लक्ष्य असता कामा नये.

जर 'मी कोण आहे' याचा शोध घेत असाल तर तो योग्य मार्ग आहे. किंवा जे लोक याच शोधात गुंतले आहेत, आणि दुसऱ्यांना पण 'याचाच' शोध घ्यायला शिकवत आहेत तर त्यांचे विचार योग्य दिशेने चालले आहेत असे म्हटले जाईल. बाकी, इतर सर्व गोष्टी तर जाणलेल्या आहेतच ना? आणि जाणून घेतल्यानंतरही त्या सोडायच्याच आहेत ना? कित्येक जन्म माहिती करून घेण्यातच घालविले आहेत, पण जे 'जाणणे' आवश्यक आहे, तेच फक्त जाणले नाही.

सगळी शास्त्रे एकाच सुरात सांगतात - 'आत्मज्ञान जाणा.' पण आत्मज्ञान पुस्तकात नसते. आत्मज्ञान हेच एकमेव असे ज्ञान आहे की जे कोणत्याच पुस्तकात सामावू शकत नाही. आत्मा अवर्णनीय, अवक्तव्य,

नि:शब्द आहे! तो शास्त्रात कसा काय सामावू शकेल? आत्मा म्हणजे चारही वेद आणि जैनांचे चारही अनुयोग यांच्या पुढील गोष्ट आहे. चारी वेद पूर्ण झाल्यानंतरही शेवटी ते काय म्हणतात, दिस इज नॉट दॅट, दिस इज नॉट दॅट. गो टु ज्ञानी. (ते हे नव्हे, ते हे नव्हे. ज्ञानींकडे जा.) जैन शास्त्रसुद्धा 'ज्ञान 'ज्ञानींच्या' हृदयात आहे' असे सांगतात. शास्त्रज्ञानाने मुक्ती मिळत नाही, अनुभवज्ञानाने मुक्ती मिळते.

आत्मा ही सहजपणे जाणता येईल, अशी गोष्ट नाही. ह्या जगातील सर्वात गुह्यतम गोष्ट म्हणजे आत्मा आहे. जिथे आत्मा आहे असे जग मानते तिथे आत्म्याची सावलीसुद्धा नाही. 'स्वत:' अनंत प्राकृत अवस्थांमधून बाहेर निघतच नाही, मग त्याला 'आत्मा' कसा काय प्राप्त होईल? 'आत्मा' प्राप्त होणे ही इतकी सोपी गोष्ट नाही. जग ज्याला आत्मा असे समजत आहे तो 'मेकॅनिकल' (यांत्रिक) आत्मा आहे, जग ज्या ज्ञानाच्या मागे लागले आहे ते सगळे ज्ञान 'मेकॅनिकल' आत्म्यासंबंधी आहे. 'मूळ आत्म्याची' तर काहीच जाणीव नाही. जप करून, तप करून, त्याग करून, ध्यान करून ज्याला स्थिर करण्याचा प्रयत्न चालू आहे म्हणजे जे चंचल आहे त्यालाच स्थिर करण्याचा प्रयत्न चालू आहे. आणि 'आत्मा' तर स्वभावत:च अचल आहे. स्वभावानेच अचल, यालाच आत्म्याची अचलता म्हणतात. पण अज्ञानतेमुळे लोक याला आपापल्या भाषेत वेगवेगळे समजतात, त्यामुळे अस्वाभाविक अचलता प्राप्त होते.

## आत्म्याला कशा प्रकारे जाणावे?

**प्रश्नकर्ता :** आत्म्याची आराधना कशी करावी?

**दादाश्री :** 'ज्ञानी पुरुषां'कडून मागावे की माझ्याकडून आत्म्याची आराधना व्हावी असे काहीतरी करा, म्हणजे 'ज्ञानी पुरुष' तसे करतील. 'ज्ञानी पुरुष' हवे त्याप्रमाणे करू शकतात. कारण 'ज्ञानी पुरुष' स्वत: कुठल्याच गोष्टीचे कर्ता नसतात. 'भगवंत' देखील ज्यांना वश असतात, अशा 'ज्ञानी पुरुषां'ना अशक्य काय आहे? तरीही ते संपूर्णपणे 'निर्‌अंहकारी' पदात असतात, 'निमित्त' पदातच असतात.

शब्दांनी समजू शकेल अशी आत्मा ही गोष्ट नाही, संज्ञेने समजता येते. 'ज्ञानी पुरुष' तुमचा आत्मा 'संज्ञे'द्वारा जागृत करतात. दोन मुकी माणसे असतील तर त्यांची भाषा वेगळी असते, एक असा हात दाखवतो आणि दुसरा तसा हात दाखवतो आणि दोघेही स्टेशनवर पोहोचतात! ते दोघेही त्यांच्या संज्ञेद्वारा समजून जातात. आपल्याला ते कळत नाही. त्याचप्रमाणे ज्ञानींच्या 'संज्ञे'ला ज्ञानीच समजू शकतात. जेव्हा 'ज्ञानीं'ची कृपा होते आणि ते संज्ञेद्वारा समजावतात तेव्हाच तुमचा आत्मा जागृत होऊ शकतो. आत्मा हा शब्द-स्वरूप नसून, स्वभाव-स्वरूप आहे. आत्मा अनंत भेदाने (रूपाने) आहे, अनंत गुणांचे धाम आहे, अनंत ज्ञानवाला आहे, अनंत दर्शनवाला आहे, अनंत सुखधाम आहे आणि अनंत प्रदेशी आहे. पण सध्या तुमच्यामध्ये या सर्व गोष्टी आवरणामुळे झाकलेल्या आहेत. 'ज्ञानी पुरुष' ही आवरणे तोडून टाकतात. त्यांचा एकेक शब्द संपूर्ण शास्त्र रचू शकतो!

आत्मा हा ज्ञान-स्वरूप नसून, विज्ञान-स्वरूप आहे. म्हणून विज्ञान समजून घ्या. वीतराग-विज्ञान अवघड नाही. पण त्याचे ज्ञाता आणि दाता नसतात. क्वचितच असे 'ज्ञानी पुरुष' प्रकट होतात जे ह्या गोष्टींचे स्पष्टीकरण देऊ शकतात. नाही तर खरे म्हणजे सगळ्यात सोपी गोष्ट कुठली असेल तर ती म्हणजे वीतराग विज्ञान; इतर सर्व विज्ञान प्रकार अवघड आहेत. इतर विज्ञानांसाठी तर 'रिसर्च सेंटर्स' (संशोधन-संस्था) उभारावी लागतात, आणि बायको-मुलांना वर्षभर विसरले तरच संशोधन होऊ शकते! याउलट हे वीतराग विज्ञान तर 'ज्ञानी पुरुषां'कडे गेल्यावर लगेचच प्राप्त होऊ शकते.

**प्रश्नकर्ता :** 'मी आत्मा आहे' हे ज्ञान कशा प्रकारे होते? त्याचा अनुभव कसा घेता येतो?

**दादाश्री :** तो अनुभव घडवून देण्यासाठीच तर 'आम्ही' येथे बसलो आहोत. येथे जेव्हा आम्ही तुम्हाला 'ज्ञान' देतो तेव्हा तुमचा 'आत्मा' आणि 'अनात्मा' या दोघांना वेगळे करतो आणि मगच तुम्हाला घरी पाठवितो.

## ज्ञान प्राप्ती, 'ज्ञानीं'द्वारेच

आपले आपल्यालाच करता येईल अशी ही गोष्टच नाही. तसे असते तर हे सगळे साधू, संन्यासी यांनी केव्हाच आत्मज्ञान प्राप्त करून घेतले असते. पण यात तर फक्त 'ज्ञानी पुरुषां'चेच काम आहे. 'ज्ञानी पुरुष' त्यासाठी निमित्त असतात.

उदा. औषधांसाठी डॉक्टरची आवश्यकता असते की नाही? की तुम्ही स्वत:च घरी औषध बनवून घेता? तेव्हा तर तुम्ही किती जागृत असता की काही चूक झाली तर मृत्यू येईल! पण 'आत्मा' प्राप्त करण्यासाठी मात्र स्वत:च औषध तयार करून घेता. शास्त्रे स्वत:च्या बुद्धीनेच, गुरुंकडून समजून न घेताच वाचली आणि औषध तयार करून प्यायले. याला भगवंतांनी स्वच्छंदीपणा म्हटले आहे. या स्वच्छंदीपणामुळेच अनंत जन्माचे मरण प्राप्त झाले. योग्य औषधाने तर एकाच जन्माचे मरण मिळते.

लोक 'टेम्पररी' आत्म्यालाच 'आत्मा' समजतात. पितळेला सोने समजून सांभाळतात आणि विकायला जातात तेव्हा चार आणे पण मिळत नाहीत. 'हे सोने नाही, बफिंग केलेले पितळ आहे' याला फेकून दे, असे तर 'ज्ञानी पुरुष'च सांगू शकतात. सोने केव्हा म्हणता येईल? तर सोने त्याच्या गुणधर्मासहित असेल तेव्हाच.

सोने आणि तांबे यांचे जर 'मिश्रण' झाले असेल तर त्यातून शुद्ध सोने काढण्यासाठी त्याचे विभाजन करावे लागते. सोने आणि तांबे यांचे गुणधर्म माहीत असतील तरच त्यांचे विभाजन करता येईल. त्याचप्रमाणे आत्मा आणि अनात्मा यांचे गुणधर्म माहीत असतील तरच त्यांचे विभाजन करता येईल. यांचे गुणधर्म कोण जाणू शकतो? जगातील 'सर्वात श्रेष्ठ सायंटिस्ट' म्हणजेच – 'ज्ञानी पुरुष'च हे गुणधर्म जाणू शकतात आणि तेच त्यांचे विभाजन करू शकतात. ते आत्मा आणि अनात्मा यांना वेगळे करू शकतात, एवढेच नाही तर तुमच्या पापांना जाळून भस्मसात करतात, आणि दिव्यचक्षू देतात. शिवाय 'हे जग काय आहे? ते कसे चालते?

कोण चालविते ?' हे सगळे नीट स्पष्ट करतात, तेव्हा आपले काम पूर्ण होते. (ध्येय सिद्धीस जाते.)

आत्मज्ञान ही देता येईल किंवा घेता येईल अशी गोष्ट नाही. पण हे तर 'अक्रम विज्ञान' आहे. हे एक आश्चर्य आहे, त्यामुळे ही गोष्ट शक्य झाली आहे. आमच्या माध्यमाद्वारा आत्मा प्राप्त होऊ शकतो. भगवंतांची ओळख झाल्याशिवाय चालेल का ?

कोटी जन्मांचे पुण्य फळाला येते तेव्हाच 'ज्ञानीं'चे दर्शन होते. नाही तर हे दर्शनच कसे मिळेल ? 'ज्ञान' प्राप्तीसाठी तू ज्ञानींना ओळख, एवढाच मार्ग आहे, दुसरा मार्गच नाही. आणि शोधणाऱ्याला तो मिळतोच !

## दृष्टी बदलेल, तरच काम होईल

**प्रश्नकर्ता :** आत्म-स्वभाव कसा प्राप्त करावा, हीच आराधना करू इच्छितो.

**दादाश्री :** 'स्वभाव' प्राप्त करणे यालाच सम्यक् दर्शन म्हणतात. एकदा हे 'समकित' प्राप्त झाले की दृष्टी बदलते. 'जगातील विनाशी गोष्टीत सुख आहे' असे भाव दाखविते ती मिथ्यादृष्टी आहे. दृष्टी 'या बाजूला' वळली की आत्म्याचाच स्वभाव दिसू लागतो. याला स्वभाव-दृष्टी म्हणतात. स्वभाव-दृष्टी अविनाशी पदच दाखवत राहते ! दृष्टी बदलामुळे हे जग उभे राहिले आहे. 'ज्ञानी पुरुषां'शिवाय इतर कोणीही दृष्टी बदलू शकत नाही. 'ज्ञानी पुरुष' दिव्यचक्षू देतात, 'प्रज्ञा' जागृत करतात तेव्हा दृष्टी बदलते. त्यानंतर स्वतःला स्वतःचा आत्मा तर दिसतोच, पण दुसऱ्यांचे आत्मेही दिसतात, 'आत्मवत् सर्व भूतेषु' घडते.

**प्रश्नकर्ता :** दृष्टी, दृश्य आणि दृष्टा याबद्दल सविस्तर सांगा.

**दादाश्री :** दृश्य आणि दृष्टा हे दोन्ही नेहमी वेगळेच असतात. दृश्य कधी दृष्ट्याला चिकटत नाही. आपण 'होळी' पाहिली तर आपले डोळे भाजतात का ? जगात काय-काय आहे ? तर 'दृश्य' आणि ज्ञेय,

तसेच दृष्टा आणि ज्ञाता. या पाच इंद्रियांनी जे जे काही दिसते ते सर्व ज्ञेय आहेत, दृश्य आहेत. पण यात 'दृष्टा' कोण आहे?

ज्या दिशेने तुमचे मुखारविंद असेल त्याच बाजूचे (म्हणजेच बाह्य) दर्शन होते. त्यामुळे दुसऱ्या बाजूचे (आत्म्याकडचे) काहीच दिसत नाही. ज्या दिशेकडे दृष्टी असते त्याच दिशेने ज्ञान, दर्शन, मन, बुद्धी, चित्त, अहंकार सर्व प्रवृत झालेले असतात. ज्या बाजूला दृष्टी आहे त्या बाजूचे ज्ञान प्रवर्तनात येते. याला दर्शन, ज्ञान आणि चारित्र्य असे म्हणतात. तर आता ही जी देहदृष्टी, मनोदृष्टी आणि संसारदृष्टी आहे, तिला जर कोणी आत्म्याच्या दिशेने वळविली तर आत्मदृष्टी उत्पन्न होईल. मग त्या दिशेचे दर्शन सुरू होईल, मग ज्ञान सुरू होईल आणि शेवटी चारित्र्य सुरू होईल.

'ज्ञानी पुरुष' फक्त एवढेच करतात की जी दृष्टी इतरत्र बाहेर पडलेली असते त्या दृष्टीला दृष्ट्यात बसवतात. म्हणजेच दृष्टी आपल्या मूळ जागी 'फिट' होते (बसते), आणि तेव्हाच मुक्ती मिळते. आणि जी व्यक्ती पूर्वी फक्त काही मर्यादेपर्यंतची दृश्ये पाहू शकत असे, तीच व्यक्ती आता सर्व दृश्ये संपूर्णपणे पाहू शकते आणि जाणू पण शकते. 'ज्ञानी पुरुष' 'दृष्टी'ला दृष्ट्यामध्ये बसवतात, म्हणून 'स्वत:ला' खात्री पटते की 'मी शुद्धात्मा आहे.' दृष्टी पण म्हणू लागते 'मी शुद्धात्मा आहे.' दोघात आता वेगळेपण राहत नाही, ऐक्यभाव निर्माण होतो. पूर्वी दृष्टी शुद्धात्म्याला, स्वत:च्या स्वरूपाला शोधत होती, पण शुद्धात्मा सापडत नव्हता. आता ती दृष्टी स्वभाव सन्मुख झाली त्यामुळे त्याला निराकूलता उत्पन्न होते. नाही तर तोपर्यंत आकूल-व्याकूल होत असतो.

देहदृष्टी आणि मनोदृष्टी यामुळे संसार (प्रपंच) मिळतो आणि आत्मदृष्टीमुळे मोक्ष मिळतो. आत्मदृष्टी पुढे सगळेच मार्ग एक होतात, तिथून पुढे मग एकच मार्ग आहे. आत्मदृष्टी म्हणजे मोक्षाचा पहिला दरवाजा आहे.

जिथे लोकदृष्टी आहे, तिथे परमात्मा नाही आणि जिथे परमात्मा आहे तिथे लोकदृष्टी नाही.

## संसार व्यवहार कसा...

'शुद्ध ज्ञान' म्हणजेच परमात्मा. 'जसे आहे तसे' यथार्थ दाखविते ते शुद्ध ज्ञान. यथार्थ दाखविते म्हणजे काय? तर सर्व अविनाशी आणि सर्व विनाशी गोष्टी हे शुद्ध ज्ञान दाखविते. आणि विपरीत ज्ञान फक्त विनाशी गोष्टीच दाखविते. जगातील लोक तर जन्म झाल्यापासूनच 'तू चंदुलाल आहेस' असे अज्ञान प्रदान करतात. त्यामुळे त्याच्यावर ह्या रॉंग बिलीफचा (चुकीच्या मान्यतेचा) परिणाम असा होतो की, 'मी चंदुलालच आहे.' हे विपरीत ज्ञान आहे. नियम असा आहे की जशी बिलीफ असते तसेच ज्ञान मिळते आणि मग तसेच वर्तनात येते. संसार म्हणजे काय? विपरीत ज्ञानात गटांगळ्या खात राहणे. आता यातून कसा काय सुटणार बिचारा?

## ...आणि आत्मव्यवहार कसा?

**प्रश्नकर्ता :** संसारव्यवहार आणि आत्मव्यवहार यात काय फरक आहे?

**दादाश्री :** संसारव्यवहार क्रियात्मक आहे आणि आत्मव्यवहार ज्ञानात्मक आहे. एक क्रिया करतो आणि दुसरा 'पाहत' राहतो. जो करतो तो जाणत नाही आणि जो जाणतो तो करत नाही. करणारा आणि जाणणारा कधीच एक नसतो, वेगवेगळेच असतात. वेगळे होते, वेगळे आहेत आणि वेगळेच राहतील. जर आतील परमात्म्याला उद्देशून सतत सहा महिने 'हे परमात्मा! 'ज्ञान तुझे आणि क्रिया माझी' असे म्हणत राहिलात तर सहा महिन्यात परमात्मा मिळेल असे आहे.

इंद्रिय ज्ञानाच्या आधीन पाहणे आणि जाणणे हे राग-द्वेष निर्माण करणारे आहे. अतींद्रिय ज्ञानाच्या आधीन पाहण्याचा आणि जाणण्याचा अधिकार आहे, त्याशिवाय पाहण्या-जाणण्याचा अधिकार नाही. कित्येक लोक म्हणतात, 'आम्ही ज्ञाता-दृष्टा राहतो.' पण कसला ज्ञाता-दृष्टा? तू तर अजून चंदुलालच आहेस ना? आत्मा प्राप्त झाल्यानंतरच, आत्म्याचे लक्ष्य बसल्यानंतरच ज्ञाता-दृष्टापद सुरू होते.

## मुक्तीचे ज्ञान झाल्यानंतरच मुक्ती

**प्रश्नकर्ता :** मुक्ती कशाला म्हणतात?

**दादाश्री :** तुम्हाला आता आपण बांधलेले आहोत असे वाटत नाही का?

**प्रश्नकर्ता :** वाटते.

**दादाश्री :** सगळ्यात प्रथम 'मी बंधनात आहे' असे ज्ञान व्हायला हवे. बंधन आहे म्हणून मुक्तीचे ज्ञान होणे आवश्यक आहे. 'मी मुक्त आहे' असे ज्ञान होईल तेव्हा मुक्ती होईल!

## 'ज्ञान' हेच आत्म्याचे स्वरूप

**प्रश्नकर्ता :** ज्ञानाचे स्वरूप काय आहे?

**दादाश्री :** ज्ञानाचे स्वरूप आत्मा आहे आणि आत्म्याचे स्वरूप ज्ञान आहे. ज्ञान म्हणजेच आत्मा आहे. 'मी चंदुलाल आहे' अशी जी तुमची श्रद्धा आहे तीच 'राँग बिलिफ' (चुकीची मान्यता) आहे. या श्रद्धेमुळेच अनंत जन्मांची भटकंती सुरू झाली आहे. जेव्हा 'ज्ञानी पुरुष' तुमची ही राँग बिलिफ फ्रॅक्चर करतील तेव्हा राइट बिलीफ उत्पन्न होईल आणि तेव्हा 'त्याला' ज्ञानाचे स्वरूप समजेल. ज्ञानाचे स्वरूप समजले तरी एकदम ते आचरणात येत नाही. समजल्यानंतर हळूहळू सत्संगाद्वारे ज्ञान-दर्शन वाढत जाते आणि मग ते प्रवर्तनात (आचरणात) येऊ लागते. प्रवर्तनात आल्यावर जेव्हा केवल आत्मप्रवर्तन अशी स्थिती येते, तेव्हा यालाच 'केवलज्ञान' म्हटले जाते. दर्शन-ज्ञानाव्यतिरिक्त अन्य काहीच प्रवर्तन नाही, त्याला 'केवलज्ञान' म्हणतात.

## 'प्रत्यक्षा'शिवाय बंधन तुटत नाही

**प्रश्नकर्ता :** ज्ञान म्हणजे काय?

**दादाश्री :** ज्ञान स्वत:च आत्मा आहे.

**प्रश्नकर्ता :** मग हे शास्त्रातील ज्ञान आहे ते काय?

**दादाश्री :** त्याला श्रुतज्ञान किंवा स्मृतीज्ञान म्हणतात. ते आत्मज्ञान नाही. ते पुस्तकात आले त्यामुळे ते 'जड' झाले.

**प्रश्नकर्ता :** शास्त्रांत भगवंतांची वाणी असेल तरी तिला 'जड' म्हणायचे ?

**दादाश्री :** भगवंतांची वाणीदेखील जेव्हा पुस्तकात उतरते तेव्हा तिला 'जड' म्हणतात. प्रत्यक्ष ऐकतो तेव्हा तिला चेतन म्हटले जाते. पण त्याला दरअसल (मूळ) चेतन म्हणत नाही. पण चेतनपर्यायाला स्पर्श करून निघालेली असल्यामुळे ती वाणी 'चेतना'सारखेच फळ देते. म्हणून तिला प्रत्यक्ष वाणी, प्रकट वाणी असे म्हणतात. पण या शास्त्रात जे उतरले, ते 'जड' झाले. ते चैतन्याला जागृत करू शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** पण हे तर बऱ्याच काळापासून शास्त्रांच्या आधारावरच चालत आले आहे.

**दादाश्री :** हो, हे तर असेच चालते. जोपर्यंत 'ज्ञानी' असतील, प्रकाश असेल तोपर्यंत तुमचा दिवा प्रज्वलित होऊ शकेल, नाही तर ही कर्मकांडे तर अशीच चालत राहतील.

**प्रश्नकर्ता :** मंत्रजाप केल्याने मोक्ष मिळतो की ज्ञानमार्गाने मोक्ष मिळतो ?

**दादाश्री :** मंत्रजाप तुम्हाला संसारात शांती देतात. मनाला शांती देतो तो मंत्र, त्यामुळे भौतिक सुखे मिळतात. मोक्ष मात्र ज्ञानमार्गाशिवाय मिळू शकत नाही. अज्ञानामुळे बंधन असते आणि ज्ञानामुळे मुक्ती मिळते. या जगात जे ज्ञान प्रचलित आहे ते सर्व इंद्रिय ज्ञान आहे. ते ज्ञान म्हणजे केवळ भ्रांती आहे. अतींद्रिय ज्ञान हेच खरे ज्ञान आहे.

## काय बोलले गेले ? आणि काय समजले गेले ?

**प्रश्नकर्ता :** सगळे धर्म सांगतात, 'मला शरण ये' मग जीवाने कोणाला शरण जावे ?

**दादाश्री :** सगळ्या धर्मांचे तत्त्व (सार) काय आहे ? तर 'मी

स्वत: शुद्धात्मा आहे' हे जाणणे आहे. शुद्धात्मा हाच कृष्ण आहे, शुद्धात्मा हाच महावीर आहे, शुद्धात्मा हाच भगवंत आहे. 'सर्व धर्मांचा त्याग कर आणि मला शरण ये' असे म्हणतात. म्हणजे त्यांना असे सांगायचे आहे की, 'तू हा देहधर्म सोड, मनोधर्म सोड, इंद्रियधर्म सोड, आणि स्वत:च्या स्वाभाविक धर्मात ये, आत्मधर्मात ये'. आता लोकांनी याचा चुकीचा अर्थ घेतला. 'मला शरण' म्हणजे 'श्रीकृष्णाला शरण' असे ते समजले. आणि हे लोक कृष्ण कुणाला मानतात? मुरलीवाल्याला! (अंगाला) चोपडायचे औषध जर प्यायले तर त्यात डॉक्टरचा काय दोष? तर असे हे पिऊन टाकले म्हणूनच भटकत आहेत!

## भ्रांतीरहित ज्ञान, हेच जाणण्यायोग्य

आजवर जे जाणले आहे, वाचले आहे, ती सर्व भ्रांती आहे. भ्रांतीमध्ये किती दिवस अडकून बसणार? तुम्हाला काय वाटते? आत्म्याबद्दल जे काही बोलले जाते ते सर्व भ्रांतीत बसूनच बोलले जात आहे. भ्रांतीतून बाहेर येणे आवश्यक आहे; त्याचे फळ काय मिळेल? तर भ्रांतीरहित फळ मिळेल, निराकूलता उत्पन्न होईल. सर्व जग आकूलता-व्याकूलता यातच अडकलेले आहे. निराकूलता हा तर सिद्ध भगवंतांच्या आठ गुणांपैकी एक गुण आहे. जर रियल गोष्ट प्राप्त झाली तर निराकूलता उत्पन्न होईल, अन्यथा याचा कधी अंतच येणार नाही. अनंत जन्मांपासून हे भ्रांतीयुक्त ज्ञानच जाणत आलो आहोत ना?

**प्रश्नकर्ता :** भ्रांती म्हणजेच मायावाद का? भ्रांतीबद्दल अजून सांगा.

**दादाश्री :** भ्रांती म्हणजेच मायावाद आहे. दोन्ही एकच आहेत. निजस्वरूपाचे अज्ञान ही पहिल्या क्रमांकाची भ्रांती आहे. भ्रांती म्हणजे जे नाही ते असण्याची कल्पना होणे. आत्मज्ञान ही गोष्ट काल्पनिक नाही. तिथे शब्दांनी बोलून चालत नाही, तर ते अनुभवपूर्वक असावे. 'सेल्फ'चे 'रियलाइजेशन' (आत्म साक्षात्कार) व्हायला हवे. या पुस्तकांत सांगितलेला आहे तसा आत्मा नसतो. 'मी कोण आहे?' हे जाणणे हा केवळ शब्दप्रयोग नाही, अनुभवप्रयोग आहे.

ही गोष्ट समजून घ्यायला हवी. ती समजली तर मोक्ष सहज आहे. नाही तर कोटी उपाय करून, आगीत जळून जरी मेला तरीही मोक्ष मिळणार नाही. पुण्याचे सुद्धा का होईना, पण बंधन होईल.

## विभ्रांत दशा! पण कोणाची ?

जोपर्यंत संबंध आहेत, तोपर्यंत बंध आहेत. स्वत:च्या (निज) स्वरूपात आला तर संबंधातून मुक्त होईल. संबंध म्हणजे काय ? तुमचे नाव तेच संबंध आहे. 'मी पुष्पा आहे, यांची मुलगी आहे' हा संबंध आहे. स्वत:च्या स्वभावात आला तर स्वत: असंगच आहे, निर्लेपच आहे.

अनंतकाळापासून विभ्रांतदशेतच आहे. आत्म्याला विभ्रांती नसते. पण माणसाला विभ्रांती असते ! काही कॉजेस (कारणे) उत्पन्न झाल्यामुळे काही संयोगांच्या दबावामुळे विभाविक ज्ञान उत्पन्न झाले आहे, म्हणून यात मनुष्य गुन्हेगार नाही. भ्रांतीमुळे तो गुन्हेगार वाटतो, पण 'ज्ञानाने' तर तो निर्दोषच आहे. 'ज्ञानींना' संपूर्ण जग निर्दोष दिसते.

## 'ज्ञानी पुरुष' तर अतुलनीयच असतात!

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानी' म्हणजे 'रियलाइज्ड' 'सोल'? (आत्मा) ?

**दादाश्री :** 'ज्ञानी पुरुषां'खेरीज कोणीही सेल्फ रियलाइजेशनवाला नसतोच. 'आत्मज्ञानीपद' हे पद सोपे नाही. तसे तर अनेक प्रकारचे ज्ञानी असतात, शास्त्रज्ञानी असतात, इतर ज्ञानी असतात, हा तर हिंदुस्तान आहे.

## सामान्य ज्ञान : विशेष ज्ञान

**प्रश्नकर्ता :** 'आप्तवाणी'त एक वाक्य आहे - 'सामान्य ज्ञानात राहा, विशेष ज्ञानात जाऊ नका.' याचा अर्थ काय ?

**दादाश्री :** विशेष ज्ञान जे आहे, ते बुद्धीत मोडते आणि बुद्धीबरोबर नेहमीच अहंकार जोडलेला असतो. 'सामान्य ज्ञान' म्हणजे सगळ्या जीवमात्रात 'शुद्धात्मा' पाहत राहणे. समजा आपण जंगलात गेलो असू

आणि तेथील सगळ्या झाडांचे शुद्धात्म्या स्वरूपाने दर्शन केले, तर ते झाले सामान्य ज्ञान. आणि हे झाड आंब्याचे, हे झाड कडुनिंबाचे, याप्रकारे झाडे पाहणे, हे झाले विशेष ज्ञान. सामान्य ज्ञान म्हणजे दर्शन उपयोग.

**प्रश्नकर्ता :** विशेष ज्ञान आणि संचित ज्ञान, यात काय फरक आहे?

**दादाश्री :** विशेष ज्ञानात बुद्धीचा वापर होतो. आणि संचित ज्ञानात चित्ताचा वापर होतो. बुद्धी कधी चुकूही शकते की, 'हे झाड मी कुठे तरी पाहिले आहे, पण आता आठवत नाही.' अशा प्रकारे बुद्धीला उलटून-सुलटून पाहावे लागते.

## अनुभवी व्यक्तीला कसे ओळखावे?

**प्रश्नकर्ता :** आम्हाला आत्मा शोधायचा आहे, शोधायला जातो, खूप इच्छा आहे, पण तो हाती लागत नाही.

**दादाश्री :** तो असा हाती लागतच नाही. आत्माच तर काय त्याची सावलीसुद्धा हाती लागत नाही. आत्म्याची सावली जरी हाती लागली ना, तरी कधी ना कधी आत्मा सापडेल.

**प्रश्नकर्ता :** स्व-पर प्रकाशक अशा चैतन्य सत्तेचा अनुभव प्राप्त झाला आहे, हे कसे समजू शकेल?

**दादाश्री :** आपला खिसा कापला गेला तरी राग-द्वेष होत नसेल किंवा कोणी शिव्या दिल्या तरी 'राग-द्वेष' होत नसेल तर चैतन्य सत्तेचा अनुभव आला असे समजावे. याहून पुढे परीक्षा करायची असेल तर कुणी हात कापले, कान कापले तरी देखील 'राग-द्वेष' काहीच झाले नाही तर समजा की चैतन्य सत्तेचा अनुभव आला आहे. चैतन्य सत्तेचा अनुभव असेल तेव्हा निर्लेप भावच असतो. समुद्रात राहून देखील पाण्याचा स्पर्श होत नाही!

**प्रश्नकर्ता :** ज्याला असा अनुभव आला आहे ती व्यक्ती कशी ओळखायची?

**दादाश्री :** ते तर तुम्ही त्याला दोन शिव्या दिल्या तर लगेचच

समजून येईल. त्याला डिवचल्यावर तो फणा काढतो आहे की नाही, हे नाही का समजणार ?

**प्रश्नकर्ता :** काही लोक असे शांत स्वभावाचेच असतात, म्हणूनच ते शांत राहू शकतात ना ?

**दादाश्री :** हो, काही जण शांत स्वभावाचे असतात. ते जर ह्या प्रयोगातून वाचले तर मग दुसरा प्रयोग करावा लागेल. जिथे अहंकार आणि ममता नाही तिथे स्व-पर प्रकाशक आत्मा आहे.

**प्रश्नकर्ता :** या चैतन्य सत्तेच्या ज्यांना अनुभव आहे त्यांना तर 'ज्ञानी' म्हणतात ना ?

**दादाश्री :** हो, त्यांना ज्ञानीच म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** असे ज्ञानी लपलेले असतात, त्यांना ओळखणे कठीण आहे.

**दादाश्री :** लपून बसलेल्यांकडे ज्ञान नसतेच. ज्ञानी तर संसारात वावरत असतात. ज्ञानी लपून राहूच शकत नाहीत. त्यांना स्वत:ला जे सुख प्राप्त झाले आहे, ते सुख सर्वांनाच देण्याची त्यांची भावना असते, म्हणून 'ज्ञानी' कधी जंगलात राहत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** ज्ञानी जरी जगात वावरत असतील, तरी सामान्य लोक त्यांना ज्ञानी म्हणून ओळखू शकत नाहीत ना ?

**दादाश्री :** असे ओळखता येणार नाहीत, पण त्यांच्या शब्दांवरून ओळखता येते. अरे, त्यांचे डोळे पाहूनच त्यांना ओळखता येते. जसे पोलिसांना डोळे पाहून एखादी व्यक्ती बदमाश आहे हे ओळखता येते. तसेच डोळे पाहून वीतरागींनासुद्धा ओळखता येते.

## अनुभव येतो म्हणूनच तर...

पॅरॅलिसिस (अर्धांगवात) झाला तरी सुख हरवत नाही, यालाच आत्मानुभव म्हणतात. डोके दुखत असेल, भूक लागली असेल, बाह्य

जगात अनेक संकटे आलेली असोत, तरीही आंतरिक *शाता* (सुख परिणाम) जात नाही, अशा अवस्थेला आत्मानुभव म्हणतात. आत्मानुभव तर दु:खालाही सुखात परिवर्तित करतो आणि मिथ्यादृष्टीवाल्याला तर सुखात देखील दु:ख वाटते, कारण दृष्टीत फरक आहे. यथार्थ 'जसे आहे तसे' दिसतच नाही. उलटेच (विपरीत) दिसते. फक्त दृष्टीच बदलण्याची गरज आहे. बाकी, कर्मकांडे लाखो जन्म करीत राहिलात तरी परिणामी प्रपंचच वाट्याला येणार. दृष्टी बदलणे आवश्यक आहे. अज्ञानामुळे उत्पन्न केलेल्या गोष्टींचे ज्ञानाने छेदन करायचे आहे. 'पुद्गलात' जी खळबळ आहे ती थांबली की आत्म्याचा अनुभव येतो.

**प्रश्नकर्ता :** आत्म्याचा अनुभव आला असे कधी म्हणता येईल ?

**दादाश्री :** 'स्वत:'ची प्रतीती होईल तेव्हा. 'स्वत: आत्मा आहे' अशी प्रतीती स्वत:ला आली, आणि 'मी चंदुलाल आहे' ही गोष्ट चुकीची ठरली, असा अनुभव आला, तेव्हा समजावे की अज्ञान गेले.

ज्ञानींनी आत्म्याचा अनुभव कशाला म्हटले आहे ? कालपर्यंत जे दिसत होते, ते दिसेनासे होऊन सगळे काही नवीनच दिसू लागले. अनंत जन्म भटकत होता आणि जे 'रिलेटिव्ह' (सापेक्ष) दिसत होते ते गेले आणि नव्यानेच 'रियल' दिसू लागले, हाच तर आत्म्याचा अनुभव आहे ! दृश्यला अदृश्य केले आणि जे अदृश्य होते ते आता दृश्य झाले !!

जो 'थिअॉरिटिकल' आहे त्याला अनुभव म्हणत नाहीत, त्याला 'समज' म्हणतात. आणि 'प्रॅक्टिकल' असते त्याला अनुभव म्हटले जाते.

ज्यांना आत्म्याचा पूर्ण अनुभव आलेला आहे अशा व्यक्तींना 'ज्ञानी पुरुष' म्हणतात. ते साऱ्या ब्रह्मांडांचे वर्णन करू शकतात. सर्व प्रश्नांची उत्तरे देऊ शकतात. कशा बद्दलही विचारा, खुदाबद्दल विचारा, ख्रिस्ताबद्दल, कृष्णाबद्दल विचारा, किंवा महावीरांबद्दल विचारा, कोणाबद्दलही विचारा तरी 'ज्ञानी पुरुष' त्याचे उत्तर देऊ शकतात. या 'अक्रम विज्ञाना'द्वारे तुम्हाला पण आत्मानुभवच प्राप्त झाला आहे. पण तुम्हाला तो सहज प्राप्त झाला आहे, म्हणून तुम्हाला स्वत:ला त्याचा लाभ होतो, तुम्ही

प्रगती करू शकता. जास्तीत जास्त वेळ 'ज्ञानीं'च्या परिचयात राहून पूर्ण समजून घेण्याची गरज आहे. करायचे काहीच नसते. क्रमिक मार्गात तर कितीतरी प्रयत्न केल्यानंतर आत्म्याचा अंदाज येतो, तो पण खूप अस्पष्ट आणि आत्म्याचे 'लक्ष्य' तर बसतच नाही. आत्मा असा आहे असे त्यांना सतत 'लक्ष्यात' ठेवावे लागते. याउलट अक्रम मार्गात सरळ सरळ आत्मानुभव होऊन जातो.

## जे साक्षात् झाले तेच ज्ञान

**दादाश्री :** तुम्हाला शुद्धात्म्याचे लक्ष्य राहते का?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** किती वेळ 'लक्ष्य' राहते?

**प्रश्नकर्ता :** निरंतर. तुम्ही ज्ञान दिले तेव्हापासून निरंतर राहते.

**दादाश्री :** 'आत्मानुभव' आल्याशिवाय 'लक्ष्य' राहूच शकत नाही. झोपेतून उठल्यावर लगेच 'लक्ष्य' येते का?

**प्रश्नकर्ता :** हो, ताबडतोब. डोळे उघडताच प्रथम 'मी शुद्धात्मा आहे' हे लक्षात येते.

**दादाश्री :** यालाच साक्षात्कार झाला असे म्हणतात. याला ज्ञान म्हणतात. आणि जे ज्ञान साक्षात् होत नसते त्याला अज्ञान म्हणतात.

आत्म्याची प्रतीती बसणे हीच अवघड गोष्ट आहे, मग लक्ष्य आणि अनुभव या तर त्याहूनही पुढच्या गोष्टी आहेत. आत्म्याची प्रतीती म्हणजे नि:शंकपणा. हाच आत्मा आहे अशी पक्की खात्री होणे म्हणजे प्रतीती. आम्ही तुम्हाला अशी खात्री पटवून देतो. म्हणून तर तुमच्या आत मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार सगळेच नि:शंक होतात.

ज्ञान त्यालाच म्हणायचे की जे कोणत्याही संयोगात हजर होते. प्रत्येक वेळी, जिथे जाल तिथे ते हजर होते. एवढेच नाही तर हजर होऊन समाधानही देते. आपले हे ज्ञान सर्वसमाधानी ज्ञान आहे. कुठल्याही द्रव्यात, कुठल्याही क्षेत्रात, कुठल्याही वेळी समाधान देते, असे हे विज्ञान

आहे. कोणी शिवी दिली, खिसा कापला तरी त्या प्रसंगी हे ज्ञान समाधान देईल. हे ज्ञान सतत सावध करत राहते.

**प्रश्नकर्ता :** मला ज्ञानाचे 'रियलाइजेशन' करायचे आहे, तर रियलाइजेशन म्हणजे काय?

**दादाश्री :** फक्त 'रियलाइजेशन'च नाही, पण जे नेहमीच तुमच्या सोबत राहते, तेच ज्ञान आहे.

## 'ज्ञान' अनादिपासून त्याचा तोच प्रकाश

दूषमकाळ, सुषमकाळ, कलियुग, सत्‌युग सगळेच बदलत असते, पण ज्ञान मात्र अनादिकाळापासून जसेच्या तसेच आहे. वीतरागांचे अमर ज्ञान आहे. ज्ञान म्हणजेच प्रकाश. या प्रकाशात एकही ठोकर लागत नाही, कसलीच काळजी वाटत नाही.

हे 'वीतरागांचे' ज्ञान आहे. जैन मार्ग, वैष्णव मार्ग हे तर वीतराग ज्ञान मिळवण्याची साधने आहेत. ज्ञान ज्ञानींकडूनच प्राप्त झालेले असावे, तरच ते एक्जेक्ट (हव्या त्या) वेळी हजर राहील. अशीच थापेबाजी चालणार नाही. जे स्वत:चे कल्याण करतात आणि इतरांचेही कल्याण करतात तेच 'ज्ञानी.'

आत्मज्ञानाखेरीज सिद्धी नाही. बाकी सर्व उपाय म्हणजे हठयोग आहेत. ज्ञान दुसऱ्या कोणत्याही मार्गाने प्राप्त होत नाही. 'अज्ञान' जाताक्षणीच मुक्तीचा अनुभव येतो. अज्ञानामुळेच बंधन आहे. कसले अज्ञान? स्वत:चे स्वत:बद्दलचे अज्ञान. श्रीकृष्णांनी याला गुह्यतम विज्ञान असे म्हटले आहे, 'गुह्य' म्हणजे काय तेच लोकांना समजत नाही, तर मग गुह्यतर आणि गुह्यतम म्हणजे काय ते कसे कळेल?

ज्याचा पौद्‌गलिक देण्या-घेण्याचा व्यवहार बंद झाला त्याला 'नि:शंक आत्मा प्राप्त झाला' असे म्हणता येईल. याला 'क्षायक समकित' म्हणतात की जे श्रीकृष्णाला झाले होते. भीक (इच्छा) संपूर्ण नष्ट झाल्यानंतरच जग 'जसे आहे तसे' दिसू लागते.

आत्मज्ञान झाले की स्वत: ब्रह्मांडाचा स्वामी बनतो! तोपर्यंत तो भक्त म्हटला जातो. आत्मज्ञान झाल्यानंतर तो भक्त पण आहे आणि भगवंत पण आहे. मग स्वत: स्वत:चीच भक्ती करतो.

## सत्-असत्चा विवेक, ज्ञानींच्या भाषेत!

सत् आणि असत् यांचा संपूर्ण विवेक फक्त 'ज्ञानी पुरुषां'नाच असतो. जग असत्लाच सत् मानते. हे सत् आहे आणि हे असत् आहे, असे जाणणे (ओळखणे) याला सम्यक् दर्शन म्हणतात. काही जण स्थूल असत्ला सत् म्हणतात. काही जण सूक्ष्म असत्ला सत् मानतात. काही जण सूक्ष्मतर असत्ला तर काही जण सूक्ष्मतम असत्ला सत् मानतात. जो संपूर्ण असत्ला जाणतो तो सत्ला जाणतो. संपूर्ण अज्ञान जाणले की त्याचा पलीकडे ज्ञान आहे. खडे ओळखता आले की गहू ओळखता येतात किंवा गहू ओळखता आले की खडे ओळखता येतात.

सर्व अवस्था 'असत्' आहेत, नाशवंत आहेत. आत्मा सत् आहे, अविनाशी आहे. अविनाशीने विनाशीची चिंता करायची नसते.

## आत्मानुभव कोणाला होतो?

**प्रश्नकर्ता :** आत्मानुभव कोणाला होतो? अनुभव घेणारा कोण असतो?

**दादाश्री :** (आत्मानुभव) स्वत:लाच होतो. अज्ञानामुळे जी भ्रांती उत्पन्न झाली होती ती नष्ट होते आणि अस्तित्व परत जागेवर येते. 'मी चंदुभाऊ आहे' असे भान 'ज्याला' होते त्याला मी त्याच्या या चुकीच्या भानापासून सोडवतो आणि त्यालाच 'मी शुद्धात्मा आहे' असे भान (जाणीव) होते. जो सूक्ष्मतम अहंकार आहे, ज्याचा फोटो काढता येत नाही, जो आकाशासारखा आहे, त्याला अनुभव येतो. 'मी चंदुभाऊ आहे' हा स्थूल अहंकार सुटला, नंतर सूक्ष्म, सूक्ष्मतर आणि शेवटी सूक्ष्मतम अहंकार राहतो. सूक्ष्मतम अहंकाराला 'मी शुद्धात्मा आहे' असा अनुभव येतो. जो आजपर्यंत उलट चालत होता तो आता परत फिरला. 'या' ज्ञानानंतर आता तुमच्यात स्थूल अहंकार राहतो, पण तो आता निर्जीव

आहे. त्यातला सजीव भाग निघून गेला. स्थूल अहंकाराचा 'फोटो' घेता येतो. मग शिल्लक राहतो तो सूक्ष्म, सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम अहंकार. या अहंकारालाच अनुभव येतो. ही गोष्ट कशी आहे? गप्पा मारता मारता डुलकी लागते आणि जाग येऊन मग परत गप्पा सुरू करतो. यात 'डुलकी कुणाला लागली आणि ते कोणी जाणले?' तशासारखे आहे हे.

## विचार करून आत्मज्ञान होऊ शकते का?

**प्रश्नकर्ता :** विचार करून आत्मज्ञान प्राप्त होऊ शकते का?

**दादाश्री :** विचार, ते तर खूप आवरण असलेले ज्ञान आहे. त्याला 'रिलेटिव्ह' ज्ञान म्हणतात. निर्विचार याला रियल ज्ञान म्हणतात. निर्विचार दशा ही ज्ञानाची 'ॲबसोल्यूट' (परिपूर्ण) दशा आहे.

विचार करून करून जर तुम्ही भगवंतांचा शोध घेत असाल, तर तुम्ही अजून स्थूलमध्येच आहात. त्यानंतर सूक्ष्म, सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतममध्ये जाल तेव्हा परमात्मा दिसेल. विचार तर त्या दिशेने नेणाऱ्या गोष्टी आहेत. विचार आणि शब्द ह्या गोष्टी आवरणवाल्या आहेत. जोपर्यंत शब्द आहेत तोपर्यंत आवरण आहे. जिथे शब्द पोहोचत नाहीत, तिथे परमात्मा विराजमान आहे.

**प्रश्नकर्ता :** आत्मा वेगळा केला, तर त्याची उत्पती विचारांमधूनच होते ना?

**दादाश्री :** विचार ही खूप वेगळी गोष्ट आहे. आत्मा त्याहून अगदीच वेगळी गोष्ट आहे. पण भ्रांतीमुळे 'मला विचार येत आहेत' असे वाटते. भ्रांतीची ही गाठ सुटणे आवश्यक आहे. 'मी चंदुलाल आहे' हा भ्रांतीभाव तुटला तर उलगडा होईल.

**प्रश्नकर्ता :** आत्मस्थिती सतत राहते की मग विचारांप्रमाणे क्षणिक असते?

**दादाश्री :** क्षणिक असली तर तो आत्मा नव्हेच. निरंतर राहिली तरच आत्मा प्राप्त झाला असे म्हटले जाईल.

**प्रश्नकर्ता :** आमच्या मनात सतत संसाराचेच विचार येत असतात.

**दादाश्री :** या जगाला क्षणभर देखील विस्मृत करायचे असेल तर ते शक्य नाही. जेव्हा ज्ञान प्राप्ती होते तेव्हाच जग निरंतर विस्मृत होते आणि निरंतर समाधी राहते.

सूर्य-चंद्र भेदून त्याच्याही पुढची ही गोष्ट आहे. तिथे आम्ही तुम्हाला घेऊन जातो. सूर्य म्हणजे बुद्धी आणि चंद्र म्हणजे मन. आत्मा यांच्याही वर आहे. एकदम 'टॉप'ला आहे.

**प्रश्नकर्ता :** आत्मा, ही मनाची कल्पना नाही का ?

**दादाश्री :** मनाने कितीही कल्पना करा, त्याचा काहीही उपयोग नाही. आत्मा 'निर्विकल्प' आहे आणि मनाच्या सर्व कल्पना विकल्पी आहेत.

**प्रश्नकर्ता :** मन-स्मृती यांच्या द्वारे आत्मा जाणून घेता येतो का ?

**दादाश्री :** त्याच्याही पलीकडची ही गोष्ट आहे. कोणतीही व्यक्ती आपल्याआपण आत्म्याला जाणू शकत नाही. 'विकल्पी' कधीच 'निर्विकल्पी' होऊ शकत नाही. केवळ निर्विकल्पी तरणतारण असे 'ज्ञानी पुरुष'च निर्विकल्प दशेपर्यंत पोहोचवू शकतात.

आत्मा मनस्वरूप नाही. चित्त स्वरूप नाही, बुद्धी स्वरूप नाही, अहंकार स्वरूप नाही, शब्द स्वरूप नाही. विचार स्वरूपही नाही, आत्मा निर्विचार आहे.

## आत्मा, त्याचे स्वरूपच अद्‌भुत!

*"जेणे आत्मा जाण्यो, तेणे सर्व जाण्युं"*

(ज्याने आत्मा जाणला, त्याने सर्व जाणले) - **श्रीमद् राजचंद्र**

जगातील सर्व शास्त्रे फक्त आत्मा जाणण्यासाठीच लिहिली गेली आहेत. ह्या जगात जाणण्यालायक गोष्ट फक्त आत्मा हीच आहे. जाणण्याऱ्याला जाणा. इन्द्र, महेन्द्र असे पद उपभोगल्यानंतर सुद्धा अनंत जन्मांची भटकंती थांबलेली नाही. शुद्धात्म्याशिवाय इतर सर्व परमाणूच आहेत, ते अनंत आहेत, फिजिकल (स्थूल रूपात) आहेत, त्यांच्या आत भगवंत अडकले आहेत!

**प्रश्नकर्ता :** आत्म्याचे स्वरूप आहे का?

**दादाश्री :** ज्या ज्या गोष्टी वस्तूरूपात असतात, त्यांचे स्वरूप असतेच असते. आत्मा पण वस्तू आहे आणि त्याचे पण स्वरूप आहे. त्याचे तर एकदम अद्भुत स्वरूप आहे, आणि आपल्याला तेच जाणायचे आहे. ज्ञान, दर्शन, चारित्र्य हेच ज्याचे स्वरूप आहे आणि परमानंद हाच ज्याचा स्वभाव आहे, ते जाणायचे आहे.

जग ज्याला 'आत्मा' समजते, तो आत्मा नाहीच. 'आत्मा' स्वतःच परमात्मा आहे, त्याच्या गुणधर्मांपुढे जगातील इतर कोणत्याही गोष्टीची खिजगणती नाही.

पण या जडाचीसुद्धा एवढी प्रचंड शक्ती आहे की त्याने भगवंतांना देखील अडवले आहे!

## संसार, समसरण मार्गाचे संयोग

संसार स्वभावानेच विकल्पी आहे. मूळ पुद्गलाने सर्व काही बनवले आहे. आणि यात आत्म्याचा तर फक्त विकल्पच आहे, बाकी काहीच नाही.

**प्रश्नकर्ता :** यात आत्मभाव नाही का?

**दादाश्री :** नाही. हा सर्व केवळ पुद्गलाचाच खेळ आहे. 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडेन्सेस्' एकत्र आल्यामुळे आत्म्याला विकल्प झाला आणि त्यातून हे सर्व उत्पन्न झाले!

**प्रश्नकर्ता :** हा विकल्प कशामुळे होतो?

**दादाश्री :** बाहेरील संयोगांच्या दबावामुळे.

**प्रश्नकर्ता :** बाहेरचा दबाव म्हणजे कोणाचा? पुद्गलाचा का?

**दादाश्री :** हो. संसार म्हणजे एक प्रवाह आहे, त्या प्रवाहातून जाताना संयोगांचे खूप दबाव येतात, आणि ते अनिवार्य आहे. (नियमानुसारच असे घडत असते.) संसार म्हणजे समसरण मार्ग. यात निरंतर समसरणाची क्रिया होत असते. निरंतर परिवर्तन होत असतो.

कोणी 11 मैलांवर आहे, कोणी 16 मैलांवर आहे, तर कोणी 17 मैलांवर आहे, तर कोणी 70 मैलांवर आहे. त्यात पण काही 70 मैल आणि 1 फर्लांगावर तर कोणी 70 मैल आणि 2 फर्लांगावर, असे वेगवेगळ्या ठिकाणी असतात. क्षेत्र वेगळे असल्यामुळे भाव वेगळे आणि म्हणून प्रत्येकाचे हिशोब वेगवेगळे असतात. यात आत्मा 'वेगळा'च आहे, फक्त भ्रांति उत्पन्न झाली आहे. त्यामुळे विभाविक दशेतच ऐक्य वाटत राहते.

## 'प्रयोगी' वेगळा! प्रयोग वेगळे!

प्रयोग आणि प्रयोगी दोन्ही एकच असतील की वेगळे? 'चंदुलाल' हा प्रयोग आहे आणि 'स्वतः', शुद्धात्मा हा प्रयोगी (प्रयोग करणारा) आहे. परंतु हे तर प्रयोगालाच 'प्रयोगी' समजून बसले आहेत. प्रयोगात वस्तू काढाव्या लागतात, घालाव्या लागतात. याउलट 'प्रयोगी'मध्ये *पूरण-गलन* (चार्ज करणे-डिस्चार्ज करणे) असे काही नसते. या प्रयोगात खाण्या-पिण्याच्या वस्तू घालाव्या लागतात आणि संडास-बाथरूममध्ये गलन करावे लागते.

*"पोते ज प्रयोगी छे, प्रयोगोनी मूर्छनामां."* – **नवनीत.**

प्रयोगी स्वतःच प्रयोगांच्या मूर्च्छेत अडकला आहे. त्यामुळे स्वरूपाचे भान हरवून बसला आहे. आता जर एखादा प्रयोग चालू असेल, पाणी उकळत असेल, त्यात हात घातला तर काय होईल? यात तर कळते पण आत्म्याच्या बाबतीत मात्र कळत नाही, म्हणून हात घालतच राहतो. मग वेगळेपण (भिन्नपणा) राहत नाही. 'मी वेगळा आहे' असा अनुभव येतच नाही ना?

**प्रश्नकर्ता :** यात मूळ प्रयोगी कोण आहे?

**दादाश्री :** आत्मा हाच प्रयोगी आहे. हे शब्द तर तुम्हाला समजावण्यासाठी वापरले आहेत. हा देह प्रयोग आहे आणि देहापासून जो वेगळा आहे तो आत्मा आहे, म्हणून प्रयोगात ढवळाढवळ करू नका.



# [ 2 ]
# अज्ञाशक्ती : प्रज्ञाशक्ती

## बंधन अज्ञाशक्तीमुळे : मुक्ती प्रज्ञाशक्तीमुळे

फक्त एका अज्ञाशक्तीमुळे या जगाची अधिकरण क्रिया चालू आहे. थेट मोक्षापर्यंत देखील ही अज्ञाशक्ती मंद होईल असे नाही. 'क्रमिक मार्गात' शेवटच्या स्टेशनवर जेव्हा अज्ञाशक्ती निरोप घेते तेव्हा प्रज्ञाशक्ती हजर होते. आणि इथे या 'अक्रम मार्गात' जेव्हा ज्ञान देतो तेव्हा प्रथम प्रज्ञाशक्ती उत्पन्न होते आणि अज्ञाशक्ती निरोप घेते. ही प्रज्ञाशक्तीच तुम्हाला मोक्षाला घेऊन जाईल. यात आत्मा तर आहे तोच आहे. तिथेही वीतराग आहे आणि इथेही वीतराग आहे. फक्त या शक्तीच सर्व कामे करत असतात.

अज्ञाशक्ती कशी उत्पन्न होते? आत्म्यावर संयोगाचा जबरदस्त दाब आला, त्यामुळे जे ज्ञान आणि दर्शन स्वाभाविक होते ते विभाविक होऊन गेले, त्यामुळे अज्ञाशक्ती उत्पन्न झाली. ही अज्ञाशक्ती मूळ आत्म्याच्या कल्पशक्तीतून उत्पन्न होत असते. जशी कल्पना करतो तसा होऊन जातो. आणि मग अहंकार सोबतच असतो, त्यामुळे संसार चक्र चालतच राहते... एकच जागा अशी आहे की जिथे संयोग नाहीत, आणि ती म्हणजे सिद्धगती! म्हणून तिथेच समसरण मार्गाचा शेवट होतो.

जेव्हा 'ज्ञानी पुरुष' भेटतात तेव्हा प्रज्ञादेवी हजर होते. अज्ञादेवी संसारातून बाहेर पडू देत नाही आणि प्रज्ञादेवी संसारात घुसू देत नाही.

त्या दोघींचे भांडण सतत चालू असते! दोघांत जिचे बळ जास्त तिचा विजय होतो. आता 'आपण' 'शुद्धात्मा' झालो म्हणजे प्रज्ञाशक्तीच्या बाजूचे झालो आणि म्हणून मग तिचाच विजय होणार हे नक्की.

एकदा आत्मा प्राप्त झाला की त्यानंतर निरंतर सावध करत असते ती प्रज्ञा. प्रज्ञा निरंतर आत्महितच पाहत असते. नंतर सगळे काही प्रज्ञाच करते, अगदी थेट मोक्षाला जाईपर्यंत. बाकी, आत्म्याला तर काहीच करावे लागत नाही.

**प्रश्नकर्ता :** प्रज्ञाशक्ती म्हणजेच आत्मा का? की ती निराळी असते?

**दादाश्री :** आत्मा आणि प्रज्ञा दोन्ही वेगळ्या गोष्टी आहेत आत्मा प्रकट झाल्यानंतर प्रज्ञा उप्तन्न होते. प्रज्ञा आत्म्याचे एक अंग आहे.

## अज्ञ, स्थितप्रज्ञ, प्रज्ञा - यात काय फरक?

**प्रश्नकर्ता :** 'स्थितप्रज्ञ दशा' म्हणजे काय? तीच प्रज्ञा आहे का?

**दादाश्री :** स्थितप्रज्ञ दशा तर सर्वात छोटे पद आहे. लोक त्याला खूप उच्च पद मानतात. प्रज्ञाशक्ती उत्पन्न होणे ही फार मोठी गोष्ट आहे. ती सतत सावध करत असते. ती म्हणजे 'आत्म्याचे' 'ऐश्वर्य' आहे.

'मी करतो' याबद्दल जर नि:शंक असेल, तर ती अज्ञदशा. 'मी करतो' याबद्दल शंका येऊ लागली तर ती स्थितप्रज्ञ दशा, आणि 'मी पणा' सुटला की प्रज्ञाशक्ती उत्पन्न होते.

**प्रश्नकर्ता :** आत्म्याच्या अनंत शक्ती आहेत. पुद्‌गलाच्याही अनंत शक्ती आहेत, मग या दोघांना वेगळे कोण करतो?

**दादाश्री :** प्रज्ञाशक्तीच दोघांना वेगळे करते. पण 'ज्ञानी पुरुषांची' भेट झाल्याशिवाय प्रज्ञाशक्ती उत्पन्न होत नाही.

**प्रश्नकर्ता :** चित्त आणि प्रज्ञा यात काय फरक आहे?

**दादाश्री :** चित्त तर पूर्वी जे जे पाहिले असेल तेच दाखविते पण प्रज्ञा नवीनच गोष्टी दाखविते. स्वत:चे दोष दाखविते ती प्रज्ञा. चित्त सर्व काही पाहू शकते पण प्रज्ञेला पाहू शकत नाही. प्रज्ञेला तर आपण पाहू शकतो. चित्त पाहिलेल्या गोष्टीच पाहते पण प्रज्ञा त्यापेक्षा अधिक पाहू शकते.

**प्रश्नकर्ता :** प्रज्ञा आणि दिव्यचक्षू एकच आहेत का?

**दादाश्री :** नाही, दिव्यचक्षू हे तर चक्षू आहेत आणि प्रज्ञा ही तर एक शक्ती आहे. दिव्यचक्षू जर तुम्ही वापरले नाहीत तर त्याचा वापर होत नाही. याउलट प्रज्ञाशक्ती एकदा जागृत झाली की ती सतत तुम्हाला सावध करतच राहते.

**प्रश्नकर्ता :** प्रज्ञा पुद्‌गल आहे का?

**दादाश्री :** नाही. ती पुद्‌गल नाही, तो मधला भाग आहे. आत्म्याला मोक्षपद मिळेपर्यंत ती सोबतच राहते. बोटीत चढण्यासाठी शिड्या ठेवतात, आणि बोटीत चढल्यावर ती शिडी काढून घेतात त्यासारखेच हे आहे.

**प्रश्नकर्ता :** प्रज्ञा मोक्षाला जाईपर्यंत राहते की केवलज्ञान प्राप्त होईपर्यंत?

**दादाश्री :** केवलज्ञान होईपर्यंत प्रज्ञा राहते, मग ती बाजूला होते. आम्ही जेव्हा मोक्षाला जाईपर्यंत म्हणतो तेव्हा त्याचा अर्थ केवलज्ञान प्राप्त होईपर्यंत असाच असतो. प्रज्ञेच्या बाबतीत असाच अर्थ धरावा.

**प्रश्नकर्ता :** जगत् कल्याणाची भावना कोण करतो?

**दादाश्री :** ते प्रज्ञाशक्तीमुळे होते. खरे म्हणजे जगत् कल्याणाची भावना करणे हे प्रज्ञेचे काम नाही. पण एक-दोन जन्म बाकी असतात त्या कारणास्तव प्रज्ञाशक्तीबरोबर एक सहाय्यक शक्ती काम करत असते. वस्तुत: दोन्ही जवळजवळ सारख्याच आहेत.



# [ 3 ]
# पुद्‌गल, तत्त्व स्वरूपात

## पुद्‌गलाची गुणशक्ती कोणती?

**प्रश्नकर्ता :** ज्याप्रमाणे आपल्या आत्म्यात अनंत शक्ती आहेत, अनंत ज्ञान आणि अनंत दर्शन आहेत, त्याचप्रमाणे पुद्‌गल परमाणूंचे जे स्वाभाविक गुण आहेत त्यांची शक्ती कोणती?

**दादाश्री :** या पुद्‌गलाच्या शक्तीमुळे तर हे सारे जग दिसत आहे. आत्मा कोणत्याही ठिकाणी दिसतच नाही. ह्या पुद्‌गलाची केवढी प्रचंड शक्ती आहे. हे तत्त्वच किती अद्‌भुत आहे! आणि ते देखील प्रचंड शक्तीसहित आहे. ते निरंतर परिवर्तित होत असते. पुद्‌गल अनंत प्रकारे परिवर्तित होत असते. ह्या चहात थोडे पाणी जास्त टाकले तर चव वेगळी, पाणी कमी टाकले तर चव वेगळी. एक तासानंतर प्यालात तर चव वेगळी. हे एकच पुद्‌गल आहे, पण त्याचे अनंत पर्याय अनंत प्रकाराने बदलतच असतात! आत्मा पण तत्त्व स्वरूपात आहे आणि पुद्‌गल पण तत्त्व स्वरूपात आहे. अवस्था कितीही बदलोत, पण तरीही कोणतीही वस्तू तीळभरही वाढत नाही आणि तीळभरही कमी होत नाही.

पुद्‌गल म्हणजे पूर+गल. जे *पूरण-गलन* होत असते, त्याला पुद्‌गल म्हटले जाते. हे जग किती सुंदर दिसते. म्हणून तर फसगत झाली आहे. सुंदर पण दिसते आणि कुरुप पण दिसते! कारण ते सर्व

सापेक्ष आहे. पुद्गलाचे स्वतंत्र गुण आहेत. रूप, रस, स्पर्श आणि गंध हे त्याचे गुण आहेत, पण त्यात ज्ञायकभाव नाही. पुद्गल स्वतः काहीच जाणू शकत नाही. शिवाय त्याला *लागणी* (संवेदना)चा अनुभवही होत नाही.

## सारी करामत पुद्गलाचीच

ज्ञान हे आत्म्याचे आहे आणि बाकी सर्व करामती पुद्गलाच्या आहेत. आत्मा अशी करामत करीत नाही. हिमालयात बर्फ पडतो आणि एखाद्या ठिकाणी महावीरांच्या पुतळ्यासारखी आकृती निर्माण होते! ही पुद्गलाची करामत. पण ती टेम्परारी (तात्पुरती) असते. पुद्गल इतके सक्रीय असते की त्यामुळे तऱ्हेतऱ्हेचे बदल होत असतात.

आता जेव्हा स्वयंपाक घरात फोडणी दिली तेव्हा इथे सगळे जण शिंकत होते. ही कोणाची करामत? तुम्हाला तर शिंका देण्याची इच्छा नाही. तुम्ही जर कर्ता असाल तर या शिंका थांबवा ना! पण तसे जमते का? नाही. ही सगळी तर पुद्गलाची करामत आहे! पुद्गलाची करामत म्हणजे एक गूढ गोष्ट आहे.

या जगात असे पुरुषार्थी लोक आहेत की ते मोठमोठे लोखंडी साखळदंड तोडू शकतात. पण हे आत्म्याचे आणि पुद्गलाचे सूक्ष्म बंधन ते तोडू शकत नाहीत. त्यांनी तसा तोडण्याचा प्रयत्न केला तर उलट ते त्यात आणखीनच अडकत जातात.

पुद्गल किती शक्तीशाली आहे! स्वतः परमात्मा देखील त्यात अडकले आहेत. एका पाण्याच्या पेल्यात थोडेसे विष मिसळून कोणाला पाजले तर काय होईल? 'चेतन' शरीरातून सट्कन निघून जाईल! अहो, विषाची शक्ती तर खूपच जास्त आहे. पण इन्कमटॅक्स ऑफिसचे एखादे पत्र आले तरी आतून जीव घाबराघुबरा होतो. इन्कमटॅक्स साहेबाला शिव्या द्यायला लागतो. मग पत्र उघडले की कळते की रिफंड आला आहे, तर हे असे आहे! पुद्गल पण 'चेतनाला' हलवून सोडते. सकाळी जाग येते, काळजी वाटू लागते, राग येतो, हे सगळे काय आहे? शेतात

बी पेरले तर अनेक पट होऊन परत येते. त्यागी त्याग करतात, तो अनेक पटीने परत येतो.

तुम्ही रागाने त्याग करा किंवा द्वेषाने त्याग करा त्याची रिॲक्शन (प्रतिक्रिया) आल्याशिवाय राहत नाही. पुद्‌गलाची करामत अशी आहे की तुम्ही ज्या वस्तूचा घृणापूर्वक तिरस्कार कराल, ती वस्तू तुम्हाला परत कधीच मिळणार नाही. या जन्मी कदाचित मिळेलही, पण पुढच्या जन्मात मात्र नक्कीच मिळणार नाही.

## परमाणूंच्या अवस्था कोणकोणत्या?

सारे जग पुद्‌गल परमाणूंनी भरलेले आहे. शुद्ध स्वरूपात असलेल्या पुद्‌गल परमाणूंना तीर्थंकर भगवंतांनी 'विश्रसा' असे म्हटले आहे. यात संयोगांच्या दबावामुळे कोणावर राग आला, त्यावेळी 'मी चंदुलाल आहे, आणि मी असे केले' असे ज्ञान असल्यामुळे बाहेरचे परमाणू (आत) ओढले जातात. दुसऱ्या शब्दात सांगायचे तर भ्रांतीमुळे आत्मा पुद्‌गलाच्या अवस्थेशी तन्मयाकार होतो, त्या भास्यमान परिणामांना स्वत:चे परिणाम मानतो, त्यामुळे परमाणू 'चार्ज' होतात. प्रयोग झाला म्हणून त्यांना 'प्रयोगसा' म्हटले जाते. हे 'प्रयोगसा' परमाणू 'कॉजल बॉडी' (कारण शरीर)च्या रूपात राहतात. ते मग पुढील जन्मात 'मिश्रसा' बनतात. म्हणजेच 'इफेक्टिव बॉडी' (कार्य शरीर) बनून जातात. 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडेन्सेस्'च्या आधारे हे परमाणू जेव्हा डिस्चार्ज होतात तेव्हा कडु-गोड फळ देऊन जातात. त्या वेळी त्यांना मिश्रसा म्हणतात. डिस्चार्ज झाल्यावर ते शुद्ध होतात आणि पुन्हा 'विश्रसा' होतात.

दान देतेवेळी 'मी दान देत आहे' असा भाव असतो, त्यामुळे तेव्हा पुण्याचे परमाणू खेचले जातात. आणि दृष्कृत्य करताना पापाचे परमाणू खेचले जातात. ते मग फळ देतेवेळी *शाता* फळ देतात किंवा *अशाता* फळ (सुख किंवा दु:ख परिणाम) देतात. जोपर्यंत अज्ञानी असेल तोपर्यंत फळ भोगेल, सुख-दु:ख भोगेल. मात्र 'ज्ञानी पुरुष' सुख-दु:ख भोगत नाहीत, ते फक्त 'जाणतात.'

पुद्‌गल अवस्थेत आत्मा अज्ञानामुळे अवस्थित झाला तो म्हणजे प्रयोगसा. मागाहून 'व्यवस्थित शक्ती' जेव्हा त्याचे फळ देते तेव्हा ते मिश्रसा होतात. 'प्रयोगसा' झाल्यानंतर फळ देण्याचे काम हे 'व्यवस्थित शक्तीच्या' ताब्यात जाते. टाइमिंग, क्षेत्र असे सर्व सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडेन्सेस् गोळा झाले की मग रूपकात (प्रत्यक्षात) येते. 'स्वरूपाचे ज्ञान' झाले की मग स्वत: या पुद्‌गलाच्या करामतीत तन्मयाकार होत नाही. त्यामुळे नवीन प्रयोगसा निर्माण होत नाहीत. जे जुने आहेत, त्यांचा समभावे निकाल करणे एवढेच शिल्लक राहते.

## परमाणूंचा परिणाम वेगळा, कषाय वेगळे

हे शरीर परमाणूंनी बनलेले आहे. काही गरम, काही थंड अशा वेगवेगळ्या प्रकारच्या परमाणूंनी बनले आहे. गरम परमाणू उग्रता देतात. हे उग्र परमाणू जेव्हा फुटतात, तेव्हा अज्ञानामुळे तो त्यात तन्मयाकार होतो. याला क्रोध म्हणतात. लोभ केव्हा होतो? एखादी वस्तू बघताच आसक्तीचे परमाणू उभे होतात, आणि आत्मा त्यात तन्मयाकार होतो तेव्हा लोभ उत्पन्न होतो. कोणी आदराने नमस्कार केला की गोडी वाटते, आणि आत्मा त्यात तन्मयाकार झाला तर त्याला मान म्हणतात. या सर्व परमाणूंच्या अवस्थांमध्ये आत्मा जर तन्मयाकार झाला नाही आणि वेगळाच राहिला तर त्याला क्रोध, मान, माया, लोभ असे म्हणत नाहीत. ती फक्त उग्रता म्हटली जाते. ज्या क्रोधात तंत (रेंगाळणारे भाव) आणि हिंसक भाव नसतात, त्याला क्रोध म्हणत नाहीत. आणि याउलट जिथे तोंडाने काहीच बोलत नाही पण मनात तंत आणि हिंसकभाव असतील या स्थितीला भगवंतांनी क्रोध म्हटले आहे. या तंतामुळेच जग चालू आहे. क्रोधाचा तंत, मनाचा तंत, कपटाचा तंत, लोभाचा तंत – असे सर्व तंत गेले म्हणजे सर्व कषाय मृतप्राय होतात.

**प्रश्नकर्ता :** क्रोधामध्ये आत्मा तन्मयाकार होतो हे समजले नाही.

**दादाश्री :** क्रोधात प्रतिष्ठित आत्मा तन्मयाकार होतो. मूळ आत्मा कधीच तन्मयाकार होत नाही, बिलीफ आत्मा तन्मयाकार होतो. हे

परमाणूंचे 'सायन्स' आहे. आवडणे किंवा न आवडणे हा परमाणूंचा परिणाम आहे. काही लोकांना चहा दिसताच तो प्यायची इच्छा होते आणि काही लोकांना अजिबात इच्छा होत नाही. त्याचे कारण काय? परमाणू आतून मागणी करतात, म्हणून.

## फर्स्ट गलन, सेकंड गलन

हे खाणे-पिणे वगैरे सर्व दिसते त्या सर्व गोष्टी पर-परिणाम आहेत आणि गलन स्वरूपात आहेत. या गलन स्वरूपाला 'मी खाल्ले, मी प्यायलो' असे समजतात.

**प्रश्नकर्ता :** खाल्ले याला तर पूरण म्हणायचे ना?

**दादाश्री :** लौकिक भाषेत त्याला पूरण म्हणतात, पण यथार्थ दृष्टीने ते गलनच आहे. खाल्ले ते 'पूरण' केले पण खरे म्हणजे ते पहिले 'गलन' आहे आणि नंतर संडासाला गेला ते दुसरे गलन आहे. शहरात गेला ते फर्स्ट गलन आणि तिथून परत आला ते दुसरे गलन. जे दिसते त्यालाच जग खरे मानते. पण इंद्रियजन्य ज्ञानाने सत्य मानल्यामुळेच तर हे जग चालू आहे. 'मूळ स्वरूपाने' तर फक्त 'ज्ञानी पुरुष'च पाहू शकतात. जे पूरण होत असते त्याला फक्त 'ज्ञानी'च त्यांच्या ज्ञानात पाहू शकतात. अर्थात हे सर्व जग गलन स्वरूपातच आहे.

## पुद्‌गलाचे पारिणामिक स्वरूप

*पूरण-गलन* सगळ्यांच्यात होतच असते. *पूरण-गलन* यात फरकच नाही. अहंकारात फरक आहे. 'मी डोंबारी आहे, मी सावकार आहे, मी गृहस्थी आहे, मी त्यागी आहे.' हे सर्व अहंकाराचे भेद आहेत. भगवंत म्हणतात, 'ज्याने जसे पूरण केले असेल तसे त्याचे गलन होईल. त्यात तू शुद्धात्मा कशाला त्याची उठाठेव करतोस? सोड ही झंझट! आपल्या एखाद्या महात्म्याच्या उदयकर्मात तसे आले आणि तो वेडेपणा करू लागला की लगेच आपल्या लक्षात येते, ओहोहो! याने कसे पूरण केले होते की ज्यामुळे त्याचे असे गलन होत आहे! म्हणून आपण त्याच्याबद्दल करुणा बाळगायला हवी. करुणा हाच त्याचा एकमेव उपाय आहे!

ज्याला ह्या *पूरण-गलना*चे 'सायन्स' समजले त्याला विषय-सुखे फिकी वाटतात. आणि हा माणूस तर धुळीत पडलेली जिलबी देखील झटकून खातो. तेव्हा काय त्याला उद्या सकाळी ह्या जिलबीची काय दशा होईल याचे भान राहते का? नाही. कारण अशुचीचे भानच नाही. ही खीर खाल्ली असेल पण उलटी केल्यावर खीर कशी दिसेल? आत तर सगळे अशुचीचेच संग्रहस्थान आहे. पण अशी पारिणामिक दृष्टी उत्पन्न तर व्हायला हवी ना?

## पुद्‌गल, परमाणू स्वरूपात कसे आहे?

**प्रश्नकर्ता :** विज्ञान असे म्हणते की शरीराचे परमाणू क्षणोक्षणी बदलत असतात.

**दादाश्री :** खरी गोष्ट आहे. मनाचे परमाणूसुद्धा बदलत असतात. 'डिस्चार्ज' म्हणजे प्रत्येक सेकंदा-सेकंदाला बदलणे, आणि मग नवे परमाणू घुसतात. पण जे चार्ज झालेले तेच निघते. परमाणू कमी किंवा जास्त होत नाहीत. जे गोळा झालेले असतात तेच विखुरतात आणि परत नवीन गोळा होतात.

**प्रश्नकर्ता :** आत्म्याच्या अनंत शक्ती आहेत, अनंत सुखधाम आहे, तर या शक्ती स्वतंत्र आहेत की पुद्‌गलाच्या आधीन आहेत?

**दादाश्री :** आत्म्याच्या ज्या शक्ती आहेत त्या सर्व स्वतंत्र आहेत.

**प्रश्नकर्ता :** मोक्षाला जाण्यासाठी पुद्‌गलाच्या शक्तींची गरज असते का?

**दादाश्री :** पुद्‌गलाच्या माध्यमाद्वारेच आत्म्याचे ज्ञान प्रकट होते. श्रुतज्ञान, मतीज्ञान आणि अवधिज्ञान - हे सर्व ज्ञान पुद्‌गलाच्या माध्यमाद्वारेच प्रकट होतात. जसे 3 नंबरच्या काचेने वेगळे दिसते, 4 नंबरच्या काचेने वेगळे दिसते, तसे.

**प्रश्नकर्ता :** 'ज्ञानीं'च्या स्थितीत पुद्‌गल कशा प्रकारे काम करते.

**दादाश्री :** पुद्‌गल शब्द आहे, त्या प्रकारेच ते कार्य करते. तुमच्या

आणि माझ्या *पूरण-गलन* यात काहीच फरक नाही. मी तुम्हाला सांगतो तीच पद्धत माझी पण असते. फरक एवढाच आहे की तुम्हाला तुमचे अंतराय बाधा आणतात.

**प्रश्नकर्ता :** परमाणू एकाच प्रकारचे असतात की वेगवेगळ्या प्रकारचे ?

**दादाश्री :** आत्मे जसे एकच प्रकारचे असतात, तसेच परमाणू पण एकाच प्रकारचे असतात. फरक दिसतो तो केवळ स्थान बदलल्यामुळे. स्थान बदलल्यामुळे भावात बदल होतो. आणि भावात बदल झाल्यामुळे हे सारे जग उत्पन्न झाले आहे.

ज्या संयोगात जे ज्ञान पाहतो, तसे तो शिकतो. जशी संधी मिळते त्यानुसार तो शिकतो. आणि ती संधी ॲक्सिडंटली (अचानकच) मिळत नाही. ती तर 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एविडेन्सेस्च्या' आधाराने मिळते. ॲक्सिडंट अशी गोष्ट खरे म्हणजे या जगात नाहीच. लोकांना वाटते की हा ॲक्सिडंट आहे.

**प्रश्नकर्ता :** परमाणू जसेच्या तसे राहतात की बदलतात ?

**दादाश्री :** परमाणू बदलतात. नाही तर तुम्ही सावळे कसे होणार ? परमाणूच आपले सर्व उघड करतात की हा लुच्चा आहे, हा चोर आहे, हा बदमाश आहे हे परमाणूच दाखवितात. कारण परमाणू त्याच रूपाचे होतात. 'त्याला' जसे भाव होतात त्याच रूपाचे परमाणू होतात. राग होतो तेव्हा शरीर थरथर कापत असते. त्यावेळी पूर्ण शरीराद्वारे बाहेरचे परमाणू आत खेचले जातात, जबरदस्त रीत्या खेचले जातात.

**प्रश्नकर्ता :** पुद्‌गलाव्यतिरिक्त इतर कोणाचे परमाणू असतात का ?

**दादाश्री :** पुद्‌गलाव्यतिरिक्त इतर कोणाचेच परमाणू नसतात. हे जे दिसते, अनुभवास येते, तो सगळा पुद्‌गलाचा खेळ आहे.

**प्रश्नकर्ता :** परमाणू चेतन स्वरूप असतात का ?

**दादाश्री :** परमाणू चेतनवाले झाले आहेत, चेतनभाव प्राप्त करून ते चेतनवाले झाले आहेत. जसे पूरण झाले आहे तसेच गलन पण होणार. जसे भाव कराल तसे गलन होईल. गलन होतेवेळी आपल्याला काहीच करावे लागणार नाही, ते आपोआप होत राहील. या देहात जे परमाणू आहेत, त्यांना चेतनभाव प्राप्त झाला आहे, ते मिश्रचेतन झाले आहेत.

**प्रश्नकर्ता :** जेव्हा बाहेर असतात तेव्हा त्यांच्यात चेतनभाव असतो की ते शरीरात घुसल्यावर त्यांना तो मिळतो?

**दादाश्री :** जोपर्यंत बाहेर असतात तोपर्यंत त्यांना विश्रसा परमाणू म्हटले जातात. आत घुसल्यानंतर प्रयोगसा, आणि ते जेव्हा फळ देतात तेव्हा त्यांना मिश्रसा म्हटले जाते.

**प्रश्नकर्ता :** आत्महेतूसाठी जी साधने असतात, त्या साधनांमुळे शुद्ध परमाणूच प्रवेश करतात ना?

**दादाश्री :** हो, ते फारच उच्च दर्जाचे परमाणू असतात. ते आत्म्याच्या अंतिम ध्येयाची सिद्धी करून देतात आणि इतर सर्व सुखसोयीची पण पूर्तता करतात. आत्महेतूसाठी जे जे काही केले जाते, त्यामुळे चक्रवर्तीसारख्या सुखसोयी मिळतात.

## यात आत्म्याचे कर्तापण असते का?

**प्रश्नकर्ता :** हे जे जग चालू आहे, त्यात पुद्‌गलाचे स्थान काय?

**दादाश्री :** पुद्‌गलाच्या स्वत:च्या अशा वेगवेगळ्या शक्ती आहेत, त्या शक्ती आत्म्याला आकर्षित करतात. या शक्तीमुळेच तर 'आपण' मार खाल्ला आहे ना! आत्मा या पुद्‌गलाची शक्ती जाणण्यासाठी बाहेर निघाला की हे काय आहे? ही कसली शक्ती आहे? आणि आता तो त्यातच अडकून गेला! 'परमात्मा' स्वत:च अडकून पडला. परमात्मा अरूपी आहे आणि रूपी परमाणूंच्या अधातू साखळीने बंदीवान् झाला आहे! आता कशा प्रकारे सुटणार? स्वत:च्या स्वरूपाचे भान होईल, तेव्हाच सुटेल.

**प्रश्नकर्ता :** आत्मा अडकला आहे, तो नैमित्तिक अडकला आहे ना?

**दादाश्री :** हो, नक्कीच! पुद्गल कर्ता स्वभावाचे आहे, क्रियाकारी आहे, पण त्याला स्वतंत्रपणे कर्ता मानताच येणार नाही ना! त्याच्याबरोबर 'चैतन्य' उपस्थित असणे आवश्यक आहे. पुद्गलांच्या धक्क्यांमुळे आत्मा कर्ता झाला. पुद्गलाची ढवळाढवळ नसती तर काहीच झाले नसते. म्हणून आत्म्याला नैमित्तिक कर्ता म्हटले आहे.

## 'डिस्चार्ज', परसत्तेच्या आधीन

**प्रश्नकर्ता :** खाते वेळी खाण्यावर कंट्रोल राहत नाही.

**दादाश्री :** खायच्या वेळी खातच राहतो हा पुद्गलाचा स्वभाव आहे. पुद्गल, पुद्गलाला ओढते. पाचशे लोक जेवायला बसतात आणि त्यात जर एखादा 'एटिकेटवाला साहेब' असेल, त्याला जर म्हटले 'जेवायला बसा' तर तो नाही, नाही म्हणतो. पण मग बसल्यानंतर भात वाढायला जरा उशीर झाला की तो लगेच वरणावर ताव मारतो, भाजीवर ताव मारतो, कारण तसा पुद्गलाचा स्वभावच आहे.

**प्रश्नकर्ता :** पुद्गलाची सत्ता आहेच ना?

**दादाश्री :** पुद्गलाची सत्ता नाही. पुद्गल 'व्यवस्थित शक्ती'च्या आधीन आहे.

**प्रश्नकर्ता :** तर मग कर्म अशी काही बाब राहतच नाही ना? पाप-पुण्य पण राहत नाही ना?

**दादाश्री :** हो, हे खरे आहे. 'मी करतो' हा आरोपित भाव आहे, तोच कर्म आहे. त्यामुळेच पाप-पुण्य आहे. कर्ताभाव गेला तर कर्मे गेली.

**प्रश्नकर्ता :** परमाणू विझीबल (दिसतील असे) आहेत का?

**दादाश्री :** परमाणू केवलज्ञानाद्वारे दिसतात.

**प्रश्नकर्ता :** कर्मांमुळे जी सुख-दु:खे भोगावी लागतात ते 'व्यवस्थित शक्ती'च्या ताब्यात आहेत का?

**दादाश्री :** हो, ते 'व्यवस्थित शक्ती'च्या ताब्यात आहे. पुद्‌गलाची सत्ता पण 'व्यवस्थित'च्या आधीन आहे. पुद्‌गलाची स्वत:ची नैसर्गिक शक्ती नाही. जर पुद्‌गल स्वतंत्रपणे सत्ताधीश असते तर कोणाला भूक लागलीच नसती ना!

जेव्हा अविरत स्थिरता असेल तेव्हा शुद्ध विश्रसा होते. जोपर्यंत प्रयोगसा परमाणू असतात, तोपर्यंत 'वाणी' बदलण्याची सत्ता असते. पण एकदा मिश्रसा झाले की मग कोणाचे काहीच चालत नाही.

**प्रश्नकर्ता :** बदलण्याची सत्ता कशा प्रकारे काम करते?

**दादाश्री :** आपण एखाद्याला शिवी देतो तेव्हा त्याचे परमाणू आत बांधले जातात. ज्या भावाने बंध निर्माण झाले असेल त्याप्रकारे त्या परमाणूंच्या हिशोबानुसार आतमध्ये बॅटऱ्या तयार होतात. यालाच आपण बॅटरी चार्ज होणे असे म्हणतो. त्या चार्ज झाल्या तरी थोड्या वेळाने आपण असे म्हटले की, 'भाऊसाहेब, मी तुम्हाला शिवी दिली होती ती तर माझी खूप मोठी चूक झाली.' मग चूक धुतली जाईल. पण एकदा 'प्रयोगसा'तून मिश्रसा स्थितीत गेल्यानंतर कोणीच काही करू शकत नाही. मग त्याचे परिणाम भोगावेच लागतात.

## विभाविक पुद्‌गलामुळे जग असे दिसते

आत्म्याला ज्या ज्या पुद्‌गलाचा स्पर्श झाला, त्या पुद्‌गलाला विभाविक झाले असे म्हणतात. ते प्रत्येक देहधारी सोबत असते. याउलट स्वाभाविक पुद्‌गलाची अवस्था सतत बदलत राहते. हे शरीर अनंत परमाणूंचे बनले आहे, पण ते सर्व विभाविक परमाणू आहेत. याउलट शरीराबाहेर जे परमाणू असतात ते स्वाभाविक असतात.

जे पुद्‌गल मूळ स्वाभाविक आहे ते 'परमनंट' (अविनाशी) आहे. पण हे विभाविक पुद्‌गल 'टेम्परारी' (विनाशी) आहे. जे विशेष भावाने

परिणामित झाले आहे ते 'टेम्परी' आहे. मूळ स्वाभावाचे पुद्‌गल परमाणू स्वरूप आहे, आणि ते 'परमनन्ट' आहे.

**प्रश्नकर्ता :** विशेष भावाने कशामुळे परिणामित होते?

**दादाश्री :** आत्मा आणि हे सर्व एकत्र आल्यामुळे. 'सामीप्य भाव' उत्पन्न झाल्यामुळे विशेष भाव उत्पन्न होत असतो. आणि त्यामुळे पुद्‌गलात पण विशेष भाव उत्पन्न झाला आहे. अस्सल पुद्‌गल तर परमाणूरूपात असते किंवा 'स्कंधरूपात' असते. पण ते 'रियल' असते. याउलट विशेष भाव म्हणजे यात मिश्र भाव आहे.

**प्रश्नकर्ता :** कोणत्या कारणामुळे स्त्रीला-स्त्री देह आणि पुरुषाला-पुरुष देह मिळतो?

**दादाश्री :** हा देह क्रोध, मान, माया, लोभ यांच्या परमाणूंनी बनला आहे. पुरुषाच्या देहात मान आणि क्रोधाचे परमाणू जास्त असतात आणि स्त्रीच्या देहात कपट आणि लोभाचे परमाणू जास्त असतात. एखाद्या पुरुषात जेव्हा कपट आणि लोभाचे परमाणू वाढतात तेव्हा तो पुढील जन्मी 'स्त्री' बनतो. आणि स्त्रीच्या मनात जेव्हा मान आणि क्रोध यांचे परमाणू वाढतात तेव्हा ती पुढील जन्मात पुरुष बनते. स्त्री ही कायम स्त्री राहत नाही. आत्मा, आत्माच आहे आणि परमाणू बदलत असतात.

हे जे चांगले-वाईट दिसते, ती पुद्‌गलाची विभाविक अवस्था आहे. त्यात हे चांगले आणि हे वाईट असे गट पाडू नका. द्वंद्ववाल्यांनी असे गट पाडले आहेत. हे विकल्पच आहेत. निर्विकल्पीला चांगले-वाईट या दोन्ही 'विभाविक अवस्था' म्हणून दिसतात.

## परमाणूंची सूक्ष्मता किती?

**प्रश्नकर्ता :** स्थूल, सूक्ष्म, सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम या सगळ्यांची बाउंड्री (मर्यादा) कोणती?

**दादाश्री :** डॉक्टरांना जे दिसते ते सगळे स्थूल. मोठ्यामोठ्या

दुर्बिणी, मायक्रोस्कोप यांनी दिसते ते पण स्थूलच म्हटले जाते.विश्रसा सूक्ष्मतम आहे, प्रयोगसा सूक्ष्मतर, आणि जे परमाणू ओढल्यावर परिणाम होऊन आतमध्ये गोळा झाले आहे ते मिश्रसा परमाणू सूक्ष्म म्हटले जातात. मिश्रसा इफेक्टिव बॉडी (कार्य शरीर) आहे, आणि प्रयोगसा कारणशरीर आहे.

**प्रश्नकर्ता :** वैज्ञानिक (शास्त्रज्ञ) ज्यांना 'ॲटम्स' आणि 'इलेक्ट्रॉन्स' म्हणतात, त्याला कोणत्या मर्यादेची सूक्ष्मता म्हणता येईल?

**दादाश्री :** ते सगळे 'स्थूल' मध्येच मोडते. वैज्ञानिकांनी जे जे शोध लावले आहेत त्या सर्वांची गणना स्थूलमध्येच केली जाईल. 'ज्ञानी पुरुष' ज्या परमाणूंबाबत बोलतात, त्यांना फक्त केवलज्ञानीच पाहू शकतात.

## पुद्‌गल, तत्त्वरूपाने अविनाशी

**प्रश्नकर्ता :** आत्मा सत्य आहे असे का म्हणतात? पुद्‌गल काय आहे?

**दादाश्री :** आत्मा सत्य नाही, पण सत् आहे. पुद्‌गलसुद्धा सत् आहे. पुद्‌गलाला गुणधर्म आहेत, आणि पर्याय पण आहेत. पण पर्याय सतत बदलत असतात. पर्याय विनाशी असतात. आत्मा स्वतः वस्तू रूपात आहे, स्वतंत्र आहे, गुणधर्मासहित आहे. सत्-आत्मा म्हणजेच परमात्मा.

**प्रश्नकर्ता :** पुद्‌गल सत् आहे ते कशा प्रकारे?

**दादाश्री :** आत्मा सत् आहे. पुद्‌गल पण सत् आहे. आत्मा अविनाशी आहे, पुद्‌गल पण अविनाशी आहे. आत्म्याचे पर्याय आहेत, पुद्‌गलाचेही पर्याय आहेत. आत्म्याचे पर्याय त्याच्या स्वतःच्या प्रदेशात राहून बदलतात. आत्मा सत्-चित्त-आनंद स्वरूप आहे! आणि चित्त्-आनंद हा पुद्‌गलाचा गुणधर्म नाही. पुद्‌गल सत् आहे. पुद्‌गल *पूरण-गलन* स्वभावाचे आहे. जे जे वस्तूच्या रूपात असते, गुणांच्या रूपात असते, स्वतंत्र असते आणि अविनाशी असते, त्याला सत् म्हणतात.

## पुद्‌गल भाव, वियोगी स्वभावाचे

दोन प्रकारचे भाव असतात, एक आत्मभाव आणि दुसरा पुद्‌गल भाव. सर्व पुद्‌गल भाव येतात आणि जातात. ते विनाशी असतात, ते थांबत नाहीत. 10 मिनिटात, 15 मिनिटात किंवा 30 मिनिटात निघून जातात. हे सर्व संयोगी भाव आहेत. आपल्याला ज्यांचा संयोग होतो ते सर्व संयोगी भाव असतात. हे सर्व संयोगी भाव वियोगी स्वभावाचे असतात. आपण त्यांना हाकलून द्यायचे नाही, आपल्या आपण गेले तर ठीक. वाईट विचार येतात तेव्हा म्हणायचे, 'या तुम्ही, तुमचेच घर आहे.' जेवढे भाडे घेतले असेल तेवढा वेळ त्यांना राहू द्यावे लागेल! वाईट विचार ते संयोगी भाव आहेत, त्यामुळे ते आपले आपणच निघून जातील.

## ज्ञानीशिवाय हे कसे समजून येणार?

मन, बुद्धी, चित्त आणि अहंकाराचे जे जे परिणाम येतात, मनात विचार येतात, बुद्धीने दर्शनात दिसते वगैरे सर्वच पुद्‌गल भाव आहेत आणि जो ह्या पुद्‌गल भावांना जाणतो तो आत्मभाव आहे.

सर्व शास्त्रांचे ज्ञान हेच आहे. पण हेच कळत नाही त्यामुळे लोक सगळे शास्त्र पाठ करतात. काय करणार मग? ही चूक दुरुस्त होणार कशी? 'ज्ञानी' शिवाय ही चूक कोण दुरुस्त करणार?

## ...त्यातच तन्मयाकार झालात तर मोठी जोखीमदारी

क्रोध, मान, माया आणि लोभ हे सगळे पुद्‌गल भाव आहेत. ते वाढतात पण आणि कमी पण होतात आणि आत्म्याचा स्वभाव वाढतही नाही आणि कमीही होत नाही, असा अगुरु-लघु स्वभाव आहे. म्हणून जेव्हा क्रोध, मान, माया, लोभ होतात तेव्हा 'आपण' त्यांना 'पाहत' राहिले पाहिजे 'ओहोहो, हे वाढले! हे कमी झाले!' म्हणजे 'आपण' त्यापासून 'वेगळे' राहिलो. मग 'आपण' जोखीमदार नाही. पुद्‌गलभावांशी जर तन्मयाकार झालात तर मग तुमची जोखीमदारी, कारण तुम्ही सही केली म्हणून. आणि जर तन्मयाकार झाले नाही, सही केली नाही तर तुम्ही सुटलात, भगवंत असे म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** आपण पुद्‌गलभावाशी तन्मयाकार झालो की नाही हे आपल्याला निश्चितपणे कसे समजते?

**दादाश्री :** (तन्मयाकार झालो) तर चेहरा बिघडतो, मन बिघडते, असे वेगवेगळे परिणाम होतात. परिणाम झाला तरी पण 'आपण' वेगळे राहू शकतो. ते आपले आपल्याला कळते. पुद्‌गलभावांशी तन्मयाकार होताच आतमध्ये दोन-चार लाठ्या पडतात, मग लगेच कळते की 'आपण' आपली बाउंड्री ओलांडली.

'मन' मनाचा धर्म पाळत असते. बुद्धी बुद्धीचा धर्म पाळत असते. अहंकार, अहंकाराचा धर्म पाळत असतो. हे सगळे पुद्‌गल भाव आहेत. हे आत्मभाव नाहीत. या सर्व पुद्‌गलभावांना 'आपण' पाहायचे आणि जाणायचे, तोच आत्मभाव आहे. 'ज्ञाता-दृष्टा' आणि परमानंद हाच आत्मभाव आहे. पुद्‌गलभाव तर अमर्याद आहेत. लोक या पुद्‌गलभावातच अडकून पडलेले आहेत.



# [ 4 ]
# स्वसत्ता - परसत्ता

## स्वत:ची शक्ती किती असेल?

या जगात असा कोणीही जन्माला आला नाही की ज्याला संडासला जाण्याची देखील स्वत:ची स्वतंत्र शक्ती असेल! जेव्हा संडासला होत नाही तेव्हा समजून येते की ही शक्ती माझी नव्हतीच. झोप येत नाही तेव्हा समजते की झोपण्याची शक्ती माझी नाही. ज्या वेळी उठायचे असेल त्यावेळी उठायला जमले नाही तेव्हा समजते की ही शक्ती पण माझी नाही. या जगात जे सर्व काही चालू आहे ते 'आपल्या' सत्तेत नाही. 'आपली' सत्ता संपूर्ण आहे, याची जाणीवच नाही, आणि परसत्तेलाच स्वसत्ता मानली जाते. भगवंताजवळ अशी कोणतीही सत्ता नाहीच.

जोपर्यंत स्वत:च्या स्वरूपाचे भान होत नाही तोपर्यंत सगळे व्यर्थ आहे. 'मार्केट मटिरिअल' आहे. यात कसला अहंकार बाळगायचा? आणि जर अहंकार बाळगायचाच असेल तर तो फक्त 'ज्ञानी पुरुषां'नीच बाळगावा, कारण त्यांच्याजवळ पूर्ण ब्रह्मांडाची सत्ता असते. मात्र तेव्हा त्यांच्यात अहंकार बिल्कुल नसतो. जिथे सत्ता नाही, तिथे अहंकार आहे आणि जिथे सत्ता आहे, तिथे अहंकार नाही. 'ज्ञानी पुरुष' तर बालकासारखे असतात.

## सत्ता, पुण्याने मिळते

जगाचा नियम असा आहे जी की सत्ता प्राप्त झाली असेल त्या सत्तेचा जरासाही दुरुपयोग झाला तर ती सत्ता नाहीशी होते. (हातात राहत नाही.)

सत्तेचा सदुपयोग म्हणजे करुणा भाव आणि सत्तेचा दुरुपयोग म्हणजे राक्षसी वृत्ती. सत्ता कशासाठी आहे? सत्ता पुण्यामुळे मिळते. जर तुम्ही पाच जणांचे *उपरी* (वरिष्ठ) झालेले असाल, तर तुमचे पुण्य जमा असेल म्हणूनच. त्याशिवाय *उपरी* होऊच शकणार नाही. 'प्रिन्सिपल साहेब आहेत का? प्रिन्सिपल साहेब आहेत का?' असे विचारत विचारत लोक येतात. येतात ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** तर हे पुण्य आहे म्हणूनच. नाही तर कोणी विचारले पण नसते. कुठेतरी एखाद्या शेठजीकडे मुनीम म्हणून हिशोब लिहित बसला असता! 'तुम्हाला' आता 'चंदुभाईला' सांगायला हवे, 'चंदुभाऊ, (चंदुभाऊच्या जागी वाचकाने स्वतःचे नाव समजावे) सत्तेचा दुरुपयोग कशासाठी करता? जरा करुणा बाळगा ना!

**प्रश्नकर्ता :** दादाजी, आपले ज्ञान मिळाल्यापासून मी असेच करतो.

## ...पण ती सारी परसत्ता

**दादाश्री :** तुमच्याजवळ कसली कसली सत्ता आहे?

**प्रश्नकर्ता :** एकही नाही.

**दादाश्री :** याचे कारण काय? 'तुम्ही कोण आहात' हेच तुम्ही जाणत नाही. तुम्ही चंदुभाईलाच 'मी आहे' असे मानता. पण ती तर परसत्ता आहे. त्यात तुमचे काय आहे? तुम्ही परसत्तेच्या आधीन आहात. अगदी शेवटपर्यंत परसत्ताच आहे, केवळ भोवराच आहे! सगळे काही 'व्यवस्थित शक्ती'च्या आधीन आहे.

तुम्ही खाता, पिता, लग्नाला जाता, ते सगळे परसत्तेच्या आधीन आहे. तुम्हाला क्रोध, मान, माया, लोभ होतात ते सगळे परसत्तेच्या आधीन होतात. 'तुमची' स्वसत्ता तुम्ही पाहिलीच नाही. स्वसत्तेची तुम्हाला जाणीवच नाही. स्वसत्तेची जाणीव झाली तर स्वतः परमात्मा बनू शकतो. अगदी क्षणभर देखील स्वसत्तेची जाणीव झाली तर तो परमात्मा होऊ शकतो!

ही बोलण्याची शक्ती पण माझी नाही. जो बोलत आहे तो केवळ 'टेपरेकॉर्ड' आहे. आणि तुम्ही बोलता तो देखील 'टेपरेकॉर्डच' आहे. (मात्र) तुम्ही अहंकार करता, आणि 'मी' अहंकार करत नाही, एवढाच फक्त आहे.

जीव का जळत असतो? स्वत:च्या जागेवर बसलेला असेल तर कोणतीच उपाधी नाही. पण दुसऱ्यांच्या घरात बसले तर भिती नाही का वाटणार? तुम्ही परक्षेत्रात बसला आहात, परचे स्वामी होऊन बसले आहात, आणि सत्तासुद्धा परसत्ताच वापरत आहात. 'स्व'ला, स्वक्षेत्राला, आणि स्वसत्तेला तुम्ही जाणतच नाही.

## परसत्तेला जाणणे, तिच स्वसत्ता

**प्रश्नकर्ता :** स्वसत्तेत राहून मनुष्य अर्थाचा मालक का होऊ शकत नाही?

**दादाश्री :** कुठल्या अर्थाचा?

**प्रश्नकर्ता :** रिद्धी, सिद्धी आणि स्टेटस या अर्थाचा मालक का होऊ शकत नाही?

**दादाश्री :** 'स्वत:' त्याचा मालक नाहीच. या सर्व 'टेम्पररी' वस्तू आहेत. त्या त्यांचा उदयकाळ आला की आपोआप प्रकट होतात, पण तो ज्ञानाचा धर्म नाही.

**प्रश्नकर्ता :** स्थितप्रज्ञ दशेत संयोगाचा मालक होतो ना?

**दादाश्री :** जोपर्यंत कशाचाही मालक आहे, तोपर्यंत स्थितप्रज्ञ दशा येतच नाही. 'मालकीभाव' संपला पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** पण त्याबरोबरच गुलाम पण असता कामा नये, नाही का?

**दादाश्री :** तू गुलाम नाहीसच, चंदुलाल गुलाम आहे. तू स्वत:

कसला गुलाम? सगळे देहधारी गुलामच आहेत. सगळे 'व्यवस्थित शक्तीचे' गुलाम आहेत. तू 'शुद्धात्मा' आहेस, गुलाम नाहीसच.

**प्रश्नकर्ता :** ईश्वर हे सर्व स्वत:च्या ताब्यात का घेत नाही?

**दादाश्री :** असे करणे हे ईश्वराच्या हातात नाही!

**प्रश्नकर्ता :** मन ताब्यात का राहत नाही?

**दादाश्री :** ताब्यात काहीच ठेवायचे नाही. आणि ते राहणारही नाही. ती परसत्ता आहे. त्याला तर फक्त 'जाणत' राहायचे आहे. की इथे ताब्यात राहते आणि इथे ताब्यात राहत नाही. आणि हे जो जाणतो तो आत्मा आहे.

## धन्य ! ज्ञानींनी स्वसत्ता कशाला म्हटले आहे?

**प्रश्नकर्ता :** 'क्षणोक्षणी' स्वसत्तेत राहून स्वसत्तेचाच उपभोग घेऊ.' स्वसत्ता तर तुम्ही दिलीच आहे, त्याचा उपयोग कसा करू? आणि परसत्तेत प्रवेश करू नये हे कसे करावे? हे जरा सविस्तर समजावून सांगा.

**दादाश्री :** सर्व क्रियामात्र परसत्ता आहेत. सर्व क्रिया आणि क्रियावाले ज्ञान पण परसत्ता आहे. जे ज्ञान अक्रिय आहे, ज्ञाता-दृष्टा आणि परमानंदी आहे, आणि जी ह्या सर्व क्रियेवाल्या ज्ञानाला जाणते ती आपली स्वसत्ता आहे, आणि तोच 'शुद्धात्मा' आहे.

**प्रश्नकर्ता :** संसारी लोकांनी स्वसत्तेचा उपयोग कसा करावा?

**दादाश्री :** ज्ञाता-दृष्टा आणि परमानंदी राहायला हवे. मन, वचन, काया स्वभावानेच 'इफेक्टिव' (परिणाम करणारे) आहेत. थंडीचा परिणाम होतो, गरमीचा परिणाम होतो. डोळ्यांनी काही वाईट पाहिले तर घृणा वाटते, कानाने वाईट ऐकले तर परिणाम होतो. हे सगळे परिणाम आपण जाणायचे. हे सगळे फॉरेन डिपार्टमेंटचे आहेत, आणि आपले होम डिपार्टमेंट आहे.

**प्रश्नकर्ता :** स्वसत्ता सर्वोपरी असते का?

**दादाश्री :** या सत्तेत तर कोणीच *उपरी* नाही. परमात्मा पण *उपरी* नाही, अशा सत्तेला स्वसत्ता म्हणतात.

## ज्ञानींद्वारे स्वसत्ता प्रकट होते

मी तुम्हाला तुमची परमात्मशक्ती ओपन (उघड) करून दिली आहे. तीच संपूर्ण सत्ता आहे. ज्या सत्तेवरून तुम्हाला कोणी उठवू शकत नाही. उठवू शकते तिला सत्ता कसे म्हणता येईल? स्वसत्ते पुढे तर परमात्मादेखील काही करू शकत नाही. आता तुमच्याजवळ जी संपत्ती आहे ती परमात्म्याजवळ पण नाही.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे कसे?

**दादाश्री :** परमात्म्याजवळ रेकॉर्ड नाही. बोलण्या-चालण्याची मिकॅनिकल शक्ती नाही. म्हणून तो दुसऱ्यांचे काहीच कल्याण करू शकत नाही! याउलट तुम्ही स्वसत्तेत राहूनदेखील लोकांचे कल्याण करू शकता! म्हणून हे नीट समजून घ्या. तुम्हाला करायचे काहीच नाही. जिथे जिथे करणे आहे तिथे मरण आहे आणि जिथे समजणे आहे तिथे मुक्ती आहे. कोणी आपला घोर अपमान केला तर त्याची आपल्यावर सत्ता होता कामा नये. अपमानच काय, त्याने नाक जरी कापले तरी पण त्याची सत्ता मान्य करू नये. (स्वत:वर) त्याचा परिणाम होऊ देऊ नये.

आता आत्मा प्राप्त झाल्यानंतर काय? तर जेवढा जास्त शुद्ध उपयोग राहील तितकी जास्त स्वसत्ता उत्पन्न होईल. आणि संपूर्ण स्वसत्ता उत्पन्न झाली की मग तो भगवंतच झाला. पुद्‌गल परसत्तेत आहे. आणि आत्मासुद्धा जोपर्यंत स्वरूपाचे ज्ञान होत नाही तोपर्यंत परसत्तेतच आहे. ज्ञानी पुरुषांची भेट होते आणि आत्मा जेव्हा स्वसत्तेत येतो त्यानंतर पुद्‌गलाचा जोर कमी होत जातो, किंवा मृतप्राय होऊन जातो. जसजसा पुरुषार्थ वाढत जातो तसतसे पुद्‌गल नरम पडत जाते. तासभर शुद्धात्मपदात राहून प्रतिक्रमण कराल तर स्वसत्तेचा अनुभव येईल.



# [ 5 ]
# स्वपरिणाम - परपरिणाम

## स्वपरिणती म्हणजे...

परिणती म्हणजे काय? तर जी सहजपणे होतच राहते, ज्यात काही करावे लागत नाही, ती म्हणजे परिणती. या पुद्‌गलाच्या क्रिया ज्या 'व्यवस्थित शक्ती' करत असते त्यात 'मी करत आहे' अशी मान्यता उत्पन्न होता कामा नये. हे सगळे 'व्यवस्थित शक्ती'चे परिणाम आहेत. त्यांना भगवंतांनी परपरिणाम असे म्हटले आहे. पर-परिणामांना 'मी करत आहे' असे मानणे याला परपरिणती असे म्हणतात. आणि त्यामुळेच संसार चालू राहतो. स्वपरिणतीला भगवंतांनी मोक्ष म्हटले आहे.

**प्रश्नकर्ता :** स्वपरिणती याचा अर्थ काय?

**दादाश्री :** 'चंदुलाल' जे काही करतो ते सर्व त्याच्याकडून 'व्यवस्थित शक्ती' करवून घेते. त्याला 'आपण' फक्त 'पाहत' राहायचे आहे. याला स्वपरिणती असे म्हणतात. चांगले काय आणि वाईट काय या भानगडीत आपण पडायचेच नाही. त्यात राग पण करायचा नाही आणि द्वेष पण करायचा नाही.

## ज्ञानींकडून समजून घेण्यासारखी गोष्ट

जगातील लोकांना ही परपरिणती आणि ही स्वपरिणती असे समजावून सांगितले, असे सतत गायला सांगितले तरी पण ते घरी

गेल्यानंतर ही गोष्ट विसरून जातात! जोपर्यंत कषायभावांना 'ज्ञानी पुरुष' मुळापासून उपटून टाकत नाहीत तोपर्यंत काम पूर्ण होत नाही कषायभावांमुळेच जग निरंतर विद्यमान आहे. कषायरूपी साखळीने आत्मा बांधलेला आहे. ज्यांनी कषायभाव जिंकले त्यांना अरिहंत असे म्हटले गेले आहे.

ज्ञानी पुरुष जेव्हा ज्ञान देतात, तेव्हा कषाय निघून जातात. आणि मग ते स्वपरिणाम आणि परपरिणाम म्हणजे काय ते स्पष्टपणे समजावून सांगतात. एरवी शिकवत राहून काहीही निष्पन्न होत नाही. कारण शिकवलेले लगेच विसरायला होते. एक मोठा तलाव असेल, त्यावर खूप शेवाळ जमले असेल आणि त्यात जर एक मोठा दगड टाकला तर 20-25 फूट व्यासाचे वर्तुळ तयार होते. पण थोड्या वेळाने पाणी परत पूर्वीसारखेच होते. म्हणून काही होऊ शकत नाही. सर्वच शेवाळ जर एकदम बाजूला काढले तरच ते काबूत येऊ शकेल. मग त्याचा जोर राहणार नाही.

**प्रश्नकर्ता :** पण ते तर फारच अवघड आहे.

**दादाश्री :** नाही, ज्ञानी पुरुष स्वत:च हे सर्व करून देतात, पण त्यासाठी तुम्हाला आमच्याजवळ बसून सर्व गोष्टी समजून घ्याव्या लागतील, स्वपरिणती आणि परपरिणती कोणती-कोणती ते सर्व समजून घ्यायला हवे.

## जोपर्यंत अज्ञान, तोपर्यंत परपरिणती

काही जण म्हणतात की ह्या व्यक्तीची परिणती चांगली नाही. पण परपरिणती ही गोष्टच वेगळी आहे. ह्या शब्दाचा लोक कुठेही उपयोग करतात. धर्मात किंवा इतर कुठल्याही ठिकाणी परपरिणती या शब्दाचा उपयोग करू शकत नाही. व्याख्यानाला गेले आणि तिथे प्रपंचाचे विचार आले तर त्याला परपरिणती मानतात आणि धर्माच्या कार्याला स्वपरिणती मानतात. पण मुळात ते स्वत: परपरिणतीतच आहेत. जोपर्यंत आत्मपरिणती उत्पन्न होत नाही, तोपर्यंत सतत पुद्गल परिणतीच असते,

आणि तोपर्यंत त्यांना पुद्‌गल परिणतीचे वेगळेपण कसे समजणार? 'मी आहे', 'माझे आहे' असे म्हटल्याबरोबर दोन्ही धारा एकत्र होतात.

## ज्ञानींना सतत स्वपरिणती वर्तते

**प्रश्नकर्ता :** दादाश्री, तुम्हाला कधीही पाहिले तरी तुम्ही असेच मुक्त, चांगल्या 'मूड'मध्येच असता, याचे कारण काय?

**दादाश्री :** आम्ही क्षणभरदेखील परपरिणतीत राहत नाही, स्वपरिणतीतच असतो. तासभर जरी मला परपरिणती उत्पन्न झाली तरी तुम्हाला माझ्या चेहऱ्यावर फरक दिसेल, 'ज्ञानीं'ना परपरिणती नसतेच. जगातील हे एक आश्चर्यच आहे की ते सदैव स्वपरिणतीत असतात! क्षणभरदेखील जर कोणी स्वपरिणतीत येऊ शकला, तरी शास्त्रकारांनी त्याला खूप मोठे पद दिले आहे! कृपाळूदेव यांनी म्हटले आहे की 'ज्ञानी पुरुष' देहधारी परमात्माच असतात. म्हणून तर म्हटले आहे की इतर ठिकाणी परमात्म्याला का शोधत आहेस? जे देहधारी रूपात आले आहेत अशा ज्ञानी पुरुषांना शोध. देहधारी परमात्मा कोणाला म्हणतात? तर ज्यांना परपरिणती होतच नसते, निरंतर स्वपरिणतीच असते त्यांना.

## पुरुषार्थ, स्वपरिणतीत राहण्याचा

भगवंतांना स्वपरिणती असायची. आम्हालाही स्वपरिणतीच असते. आम्ही पर-परिणामांना स्वत:चे परिणाम म्हणत नाही. तुम्हाला देखील तुम्ही स्वपरिणतीत राहावे यासाठी आम्ही सांगतो की 'तुम्ही' 'चंदुलाल' सोबत व्यवहार संबंध ठेवावे. इतर कुणाशी व्यवहार असो, नसो त्याने काय फरक पडतो? इतर कोणी 'आपल्या' खोलीत झोपायला येत नाही. याउलट 'चंदुलाल' तर सोबतच झोपणार आहे. म्हणून त्याच्याबरोबर व्यावहारिक संबंध ठेवावे. त्याचे डोके दुखत असेल, पाय दुखत असतील तर चेपून द्यावे. त्याच्याशी बोलून त्याला आश्वासन द्यावे. कारण तो शेजारी आहे ना?

हे कुठल्या द्रव्याचे परिणाम आहेत, ते समजून घ्यायला हवे. पुद्‌गल द्रव्याचे परिणाम आहेत की चेतन द्रव्याचे परिणाम आहेत ते

समजून घ्यायला हवे. चोच बुडविताच स्वपरिणाम आणि परपरिणाम वेगळे-वेगळे व्हायला हवेत.

आम्ही ज्ञान देतो त्यानंतर परपरिणती बंद होते. पण 'पाहता' येत नाही त्यामुळे तो मनाच्या, बुद्धीच्या आरडाओरड्यात अडकून जातो आणि मग गोंधळतो, एक प्रकारची घुसमट जाणवते. आपण तर फक्त एवढेच पाहायचे आहे की स्वपरिणती आहे की परपरिणती आहे. बाहेर जरी पाकिस्तानाचे युद्ध चालू असेल तरी आपली हरकत नाही. याप्रकारे ज्याच्यात स्वपरिणती उत्पन्न झाली, त्याला परपरिणाम स्पर्शही करू शकत नाहीत. ही जी मनाची, बुद्धीची आणि चित्ताची स्पंदने उत्पन्न होतात, ते *पूरण-गलन* आहे. त्याच्याशी आपल्याला काहीही देणेघेणे नाही. यात आत्मा काहीच करत नाही. सर्व काही पुद्गलच करत असते.

सकाळी उठल्यापासूनच पुद्गल त्याच्या परिणामात असते आणि आत्मा त्याच्या परिणामात असतो. परंतु जर मनाची स्पंदने वाढली आणि मन म्हणाले, 'मला असे का होत आहे?' की लगेच भूत चिकटते! म्हणून 'आपण' त्याला पाहत राहायचे आणि जाणत राहायचे की वादळ जरा जास्तच जोरात आहे. 65 मैलाच्या वेगाने वारा सुटला म्हणून काय घरदार सोडून पळून जायचे? वादळ तर चालतच राहणार. मोक्षमार्गावर चालताना अशी अनेक वादळे येतात पण ती बाधक नाहीत.

ज्याला हे बाहरचे परिणाम आवडत नाहीत, 'युजलेस' (निरर्थक) वाटतात आणि या परिणामाला जो स्वपरिणाम मानत नाही, या स्थितीलाच आत्मा हजर आहे असे म्हणतात. हाच स्वपरिणाम आहे.

## हे भेदविज्ञान फक्त ज्ञानी पुरुषच प्राप्त करवितात

दोनही द्रव्ये आपआपल्या स्वरूपात स्थित होतात. पुद्गल पुद्गलाच्या रूपात परिणमीत होत राहते. आणि चेतन चेतनाच्या परिणामाची भजना करत राहते. दोनही आपला आपला स्वभाव सोडत नाहीत, पण हे केव्हा? तर जेव्हा 'ज्ञानी पुरुष' ह्या दोघांना वेगळे करून देतात त्यानंतरच! जोपर्यंत वेगळे होत नाहीत तोपर्यंत अनंत काळ जरी भटकत

राहिला तरी पण काहीही साध्य होणार नाही. हे भेदविज्ञान आहे. जगातील सर्व शास्त्रांहून सर्वात मोठे विज्ञान असे हे भेदविज्ञान आहे. शास्त्रात तर 'हे करा, ते करा' अशी सगळी क्रिया-कर्मकांडे सांगितली आहेत. पण भेदविज्ञान ही वेगळीच गोष्ट आहे. ते शास्त्रांत सापडत नाही. ते तर 'ज्ञानी पुरुषां'च्या कृपेमुळेच प्राप्त होईल असे आहे.

ज्याला स्वपरिणती राहत असेल परपरिणती राहत नसेल, आणि देहधारी असेल त्याला सद्गुरु म्हणतात.

## निजपरिणती केव्हा म्हणायची

एका क्षणासाठी देखील स्वपरिणती उत्पन्न झाली तर त्याला समयसार असे म्हणतात. एका क्षणासाठी देखील ज्याला समयसार उत्पन्न झाला, त्याला मग तो कायम राहतोच.

**प्रश्नकर्ता :** 'शुद्धात्मा म्हणजे निजपरिणती नाही, ज्ञान म्हणजे निजपरिणती आहे.' हे जरा समजावून सांगा.

**दादाश्री :** शुद्धात्मा म्हणजे निजपरिणती नाही. शुद्धात्मा तर संज्ञा आहे. आम्ही तुम्हाला जे दिले आहे ते ज्ञान आहे आणि ते ज्ञान जेव्हा उपयोगात येते तेव्हा तो निजपरिणतीत येतो.

**प्रश्नकर्ता :** आपल्या पाच आज्ञांपैकी एका आज्ञेत राहिलो तर त्याला निजपरिणती म्हणता येईल का?

**दादाश्री :** हो, ती निजपरिणती म्हटली जाईल. आमच्या आज्ञा निजपरिणतीत राहाण्यासाठीच आहेत. त्यात दुसरी कुठली परिणती नाही.

**प्रश्नकर्ता :** दादा भगवान यांचे दर्शन करण्याचे भाव होतात, ते भाव स्वभाव भाव आहेत का?

**दादाश्री :** ते स्वभावात आणणारे परिणाम आहेत. तसे तर ते परपरिणाम आहेत, पण ते स्वभावात आणणारे आहेत म्हणून ते हितकारी आहेत.

स्वपरिणती व्यतिरिक्त इतर सर्व पुद्गल परिणती आहेत. जोपर्यंत

किंचितदेखील कशाचेही अवलंबन आहे तोपर्यंत परपरिणती आहे. जोपर्यंत मूर्ती, गुरु, शास्त्र, त्याग अशा गोष्टींचे अवलंबन आहे तोपर्यंत परपरिणती आहे आणि शुद्धात्म्याचे अवलंबन म्हणजे स्वपरिणती.

## ...कशा प्रकारे स्वपरिणतीत वर्तले!

**प्रश्नकर्ता :** हे माहीत असते की हे सगळे 'टेम्परारी' आहे तरी पण 'परमनंट'ला ओळखण्यात चूक कोण करविते?

**दादाश्री :** जो 'टेम्परारी'ला 'परमनंट' मानतो तोच! 'स्वरूप ज्ञान' झाल्यावर डिस्चार्ज भावांना 'स्वत:चे' भाव मानतो तो. ती चूक आहे, ती मागील रिॲक्शन (प्रतिक्रिया) आहे. 'डिस्चार्ज' भावांना स्वत:चे मानणे ही परपरिणती आहे. 'ज्ञानी पुरुष' एकाही 'डिस्चार्ज' भावाला स्वत:चा भाव मानत नाहीत, म्हणून ते निरंतर स्वपरिणतीत राहतात.

हे जे समजत नाही त्याचे कारण जागृती मंद आहे. 'ज्ञानी पुरुषां'ची जागृती इतकी जास्त असते की 'डिस्चार्ज'च्या एका परमाणूला देखील स्वत:चा मानत नाहीत, डिस्चार्जच मानतात. तरीही संपूर्ण केवलज्ञान वर्तत नसते, चार डिग्री कमीच राहते. 360 डिग्रीवर केवलज्ञान संपूर्ण असते. आम्हाला तेवढे पचले नाही आणि 356 डिग्रीवर येऊन थांबले!

आत्मा जाणण्याची जागृती हीच (खरी) जागृती, बाकी सर्व भ्रांत जागृती आहे, संसार-जागृती आहे. ती संसारात 'हेल्प' करते.

निज स्वरूपाचे ज्ञान, भान आणि परिणती, म्हणजेच महावीर.

आत्मा होऊन आत्म्यात वर्ततात, आत्म्यातच तन्मयाकार राहतात, ते म्हणजे ज्ञानी.

## ज्ञान, परमविनयामुळे प्राप्त होते

**प्रश्नकर्ता :** तुम्ही आम्हाला विधीत काय देता?

**दादाश्री :** देणारा तर भिकारी होऊन जातो. आम्ही देत ही नाही आणि आम्ही काही स्वीकारत पण नाही. आम्ही वीतराग राहतो. म्हणून

तुम्ही जे द्याल ते शंभर पटीने तुम्हाला परत मिळेल. तुम्ही एक फूल दिलेत तर शंभर फुले मिळतील आणि एक दगड मारलात तर तुम्हाला शंभर दगड लागतील!

**प्रश्नकर्ता :** तुम्ही कृपेचा वर्षाव करता म्हणजे काय?

**दादाश्री :** तेही असेच आहे. तुम्ही जो भाव ठेवाल त्याच्या शंभर पट होऊन तो तुम्हाला मिळेल.

**प्रश्नकर्ता :** जर कोणाला तुमच्यासारखे ज्ञान प्राप्त करायचे असेल तर त्याचे वर्तन कसे असले पाहिजे?

**दादाश्री :** आई-वडिलांबरोबर विनयशील असले पाहिजे. त्यांच्या आज्ञेत राहिले पाहिजे. तसाच इथे परम विनय असला पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** परम विनय म्हणजे काय?

**दादाश्री :** अहंकाररहित स्थिती. ज्ञानाचा स्वभाव कसा आहे की ते वरून खाली येते. म्हणून परम विनय जर नसेल तर ज्ञान प्राप्ती होऊ देणार नाही.

परम विनय म्हणजे ग्रहण करत राहणे. पूज्य व्यक्तींचा *राजीपा* (गुरुजनांची कृपा आणि प्रसन्नता) प्राप्त करणे. त्यांनी जरी मारले, ठोकले तरीही त्यांच्याजवळच पडून राहायचे! अविनयासमोर पण विनय राखणे त्याला गाढ विनय असे म्हणतात आणि अपमान करून दोन थोबाडीत मारल्या तरीही विनय राखणे याला परम अवगाढ विनय असे म्हणतात. हा परम अवगाढ विनय ज्याला प्राप्त झाला तो मोक्षात जातो. त्याला मग सद्गुरु किंवा इतर कशाचीच गरज नाही. तो स्वयं बुद्ध बनेल याची मी गॅरंटी देतो.

## दोन्ही परिणाम स्वभावतःच वेगळे

दोन प्रकारचे परिणाम आहेत: पौद्गलिक परिणाम आणि दुसरा आत्मपरिणाम-चेतन परिणाम.

जोपर्यंत चेतन म्हणजे काय ते जाणले नाही, तोपर्यंत चेतन परिणती

कशी उत्पन्न होईल? त्याला तर शेवटपर्यंत पौद्गलिक परिणतीच असते. तुम्हाला या 'अक्रम विज्ञाना'मुळे चेतन परिणती उत्पन्न झाली आहे. पूर्वी चेतन परिणाम आणि पुद्गल परिणामाच्या दोन्ही धारा बरोबरच वाहत होत्या. जरी दिवा पेटत असला तरी आंधळ्याला त्याचा काय उपयोग? ज्याला 'मी शुद्धात्मा आहे' आणि 'मी चंदुलाल नाही' असे विभाजन झालेले नाही, त्याला निरंतर पुद्गल परिणतीच असते. आणि ज्याच्यात विभाजन झाले आहे त्याला शुद्ध परिणामी असे म्हणतात.

ही गोष्ट फक्त समजूनच घ्यायची आहे. जी जी कर्मे आहेत ती सर्व पुद्गल स्वभावाची आहेत. ती त्याचे परपरिणाम दाखवितच राहणार. आपण 'शुद्धात्मा' म्हणजे 'स्वपरिणाम' आहे. परपरिणाम हे 'ज्ञेय-स्वरूप' आहे आणि स्वत: 'ज्ञाता-स्वरूपी' आहे.

प्रत्येक जीवमात्राला स्वपरिणाम आणि परपरिणाम उत्पन्न होतच राहतात. फक्त राँग बिलीफमुळे परपरिणामाला स्वपरिणाम मानतो. 'पहा, आमटी-भात, भाजी मी बनवली' असे तो म्हणतो. आपण त्यांना विचारले, 'आमटी-भात, बनविण्याचे ज्ञान तुम्हाला होते का?' तेव्हा तो म्हणतो, 'हे ज्ञान मी जाणतो आणि ही क्रिया पण मीच करत आहे. म्हणजेच अज्ञानी ह्या दोन्ही परिणामांना एकत्र करतो.' 'ज्ञानी' फक्त ज्ञानक्रियेचे कर्ता असतात, अज्ञान क्रियेचे कर्ता नसतात. कोणतीही क्रिया ही अज्ञान क्रियाच म्हटली जाते. स्वपरिणाम आणि परपरिणाम यांना एकत्र केल्यामुळे सर्व बेचव होऊन जाते.

## व्यवहार, किती अधिक पराश्रित

हे सर्व परपरिणाम आहेत, आणि शिवाय ते आपल्या हातात नाहीत, पराश्रित आहेत. सर्वच व्यवहार पराश्रित आहे. पराश्रित असल्यामुळे धर्म करू जाल तर तो कसा होऊ शकेल? तरी पण तो एक प्रकारचा मार्ग आहे. पण जेव्हा ज्ञानी असतात, तीर्थंकर असतात तेव्हाच तो ठीक प्रकारे चालतो, नाही तर काही अर्थ नाही. अर्थ एवढाच आहे की दारू पिण्याऐवजी ते करणे चांगले, म्हणजे तो घसरणार तर नाही. एरवी पराश्रित व्यवहारात क्रोध, मान, माया, लोभ कसे बंद होतील? जग ते

बंद करण्याच्या मागे आहे. आपले 'अक्रम विज्ञान' काय सांगते ते तुम्हाला या चेंडूच्या उदाहरणावरून सांगतो.

## 'अक्रम विज्ञाना'चा सायंटिफिक सिद्धांत

जोपर्यंत आपण अज्ञानात असतो, तोपर्यंत आपण चेंडू फेकत राहतो. त्याचा परिणाम काय होतो हे आपल्याला समजत नाही. आता ज्ञान झाल्यावर आपण चेंडू फेकणे बंद केले, पण त्यापूर्वी आपण चेंडू टाकले आहेत ते तर उसळणारच. पंचवीस-पंचवीस वेळा उसळेल. आपण चेंडू फेकला तो एकच परिणाम आपला होता. क्रमिक मार्गात चेंडू फेकल्यावर त्या उसळत्या चेंडूला थांबविण्यासाठी प्रयत्न करतात, मात्र त्याच वेळी दुसरे चेंडू फेकणेही चालूच ठेवतात. म्हणजे एकीकडे चेंडू थांबविण्याचा प्रयत्न करणे आणि दुसरीकडे चेंडू फेकणे, असे चालू राहते. मग याचा शेवट कसा होणार? (अक्रम मार्गात) आपण काय करतो की प्रथम चेंडू फेकणे बंद करतो आणि नंतर जे परिणाम उसळतात त्यांना 'पाहत' राहायला सांगतो. हे परिणाम तर 'डिस्चार्ज' स्वरूपाचे आहेत त्यामुळे ते आपोआपच बंद होतील. 'आपण' त्यात हात घालू नये, आता फक्त इतकेच पाहायचे आहे.

**प्रश्नकर्ता :** परपरिणामात गेल्यामुळे कुठल्याही प्रकारचा गोंधळ निर्माण होतो का?

**दादाश्री :** परपरिणामात निव्वळ गोंधळच आहे. त्यात शिरायचेच नाही. पर-परिणामांना फक्त 'पाहत' राहायचे. हा चेंडू आपल्या परिणामामुळे टाकला गेला होता, त्यानंतर घडतात ते सर्व परपरिणाम. आता आपण फक्त भाव बंद करून टाकायचे. भाव बंद कसे होतील? तर 'ज्ञानी पुरुषां'ना अर्पण करून टाकले तर त्यातून सुटता येते. त्यानंतर मात्र ज्ञानींच्या आज्ञेतच राहायचे. हे तर निरंतर समाधी देणारे प्रत्यक्ष विज्ञान आहे. चेंडू फेकून तो थांबवण्याचा प्रयत्न करणे आणि चेंडू फेकण्याची प्रक्रिया चालू ठेवणे हा 'सायंटिफिक' (शास्त्रीय) मार्ग नाही. तू चेंडू टाकणे बंद केलेस तर परपरिणाम आपोआपच बंद होतील!

म्हणून या 'अक्रम मार्गा'त आम्ही कोणाची योग्यता तपासत नाही.

क्रियेकडे लक्ष देऊ नका. 'त्याने' चेंडू फेकणे बंद केल्यानंतर क्रियेकडे पाहण्याची गरज नाही. आमच्याकडून 'स्वरूप ज्ञान' प्राप्त करून घेतले, त्याला पूर्णपणे समजून घेतले, त्यानंतर त्याने जरी क्रोध केला तरीही तो 'डिस्चार्ज' स्वरूपात आहे असे आम्ही सांगतो. तो क्रमश: नक्कीच बंद होईल. 'डिस्चार्ज' कोणाच्याच हातात नसतो, 'डिस्चार्ज'ला फक्त 'पाहण्याची' आणि 'जाणण्याची' गरज आहे.

## पुद्गल पारिणामिक भावाने आहे

शुद्धात्म्याचा पारिणामिक भाव आणि पुद्गलाचा पारिणामिक भाव हे दोन्ही वेगवेगळेच आहेत.

**प्रश्नकर्ता :** असे केले की असे होईल, तसे होईल, असे पुढेच सर्व दिसते. याला कोणते ज्ञान म्हणायचे?

**दादाश्री :** त्याला पारिणामिक ज्ञान म्हणायचे. आपली वातप्रकृती असेल तर 'हे खाल्ले तर असे होईल' असे ज्ञान हजर राहिले तर त्याला पारिणामिक ज्ञान असे म्हणतात. सांसारिक बाबतीत असे ज्ञान समोर येते की हे खाल्ले तर किंवा असे केले तर त्याचा परिणाम असा होईल हे समजते. 'कॉज' (कारण) होण्याअगोदरच त्याचा इफेक्ट (परिणाम) समजून येतो.

**प्रश्नकर्ता :** ह्या क्रिया आम्ही करतो, त्याचे फळ मिळते. परंतु जर फळाची इच्छा न ठेवता केले तरी पण त्याचे फळ मिळेल?

**दादाश्री :** भाजण्याची इच्छा न करता निखाऱ्यात हात घातला तरी तो भाजणारच ना! तसेच पारिणामिकचे आहे. ताबडतोब फळ देणार, सोडणारच नाही. असे हे जग आहे. प्रत्येक गोष्ट पारिणामिक स्वभावातच आहे, परिणाम येणारच.

**प्रश्नकर्ता :** कित्येकदा बोलायचे नाही असे ठरवितो तरी पण बोलले जाते. मग पश्चाताप होतो.

**दादाश्री :** वाणीने जे काही बोलले जाते त्याचे आपण 'ज्ञाता–

दृष्टा' आहोत. पण त्यामुळे ज्याला दु:ख झाले त्याचे प्रतिक्रमण 'आपण' 'बोलणाऱ्याकडून' करवून घेतले पाहिजे. पारिणामिक भाव सोडत नाहीत. हे तर पुद्‌गलाचे पारिणामिक भाव आहेत. पोटात वात झाला आणि बटाटे खाल्ले तर वात वाढणार. हा पण पुद्‌गलाचा पारिणामिक भाव आहे. त्याला 'प्लस-माइनस' (अधिक-उणे) करून घेतले पाहिजे, नाही तर ते 'अॅबनॉर्मल' होऊन जाईल.

## चेतनाचा पारिणामिक भाव, ज्ञाता-दृष्टा

शुद्धात्म्याचे पारिणामिक भाव, ते तर 'ज्ञाता-दृष्टाच' आहेत. बाहेर औदयिकभावामुळे काही वेडे-वाकडे बोलले गेले, तर या 'चंदुलाल' बरोबर आपले संबंध शेजाऱ्यासारखे आहेत म्हणून आपण चंदुलालकडून प्रतिक्रमण करवून घ्यायला हवे. पण आपण (चंदुलाल बरोबर) शेजारी भावाने न राहता निकटभावाने आल्यामुळे असे वाटते. ह्या पौद्‌गलिक परिणामांची इच्छा नसेल तरी ते येतातच. आणि मग इच्छा नसली तरी बोलले जाते.

## राग-द्वेष, हे पण पारिणामिक भाव

**प्रश्नकर्ता :** असे म्हणतात की जीवाला राग-द्वेष याचेच बंधन आहे. म्हणून राग-द्वेष सोडा.

**दादाश्री :** भगवंतानी राग-द्वेष सोडायला सांगितलेले नाही, कषाय करू नका असे सांगितले आहे. 'कषाय रहित व्हा' असे सांगितले आहे. राग-द्वेष हे तर पारिणामिक भाव आहेत, रिजल्ट (परिणाम) आहे, सोडून ते सुटणारे नाहीत. तुम्ही असे काही तरी 'ज्ञान' द्या की ज्यामुळे ते सुटतील.

पारिणामिक भाव याची नीट माहिती नसल्यामुळे लोक 'राग-द्वेष सोडून द्या, राग-द्वेष सोडून द्या' असे म्हणतात. पण ते कसे सुटतील? ती काय कागदपत्रे आहेत की लिहायची आणि फाडून टाकायची? भगवंतांनी संसाराचे 'रूट कॉज' (मूळ कारण) काय सांगितले आहे? तर राग-द्वेष आणि अज्ञान. त्यातदेखील मूळ 'रूट कॉज' काय आहे?

तर अज्ञान. त्या कारणातच जर बदल झाले तर मग राग-द्वेष हे तर पारिणामिक भाव आहेत. म्हणून ते निघून जातील (संपतील).

तू कार्याबद्दल बोलू नकोस, कार्याचे सेवन करू नकोस. तो तर परिणाम आहे. पण कारणांचे (कॉजेस्‌चे) सेवन कर. जोपर्यंत कारणांचे सेवन होत नाही तोपर्यंत काहीही निष्पन्न होत नाही. मग जरी शास्त्रे वाचली, तप केले तरीही. त्याग करो, किंवा इतर काहीही करो त्याने काहीच होणार नाही.

जे ज्ञान क्रियाकारी होते तेच खरे ज्ञान. चाळीस वर्षांपासून उपदेशक सांगत असतात, 'राग-द्वेष सोडा, राग-द्वेष सोडा', पण ते काही सुटत नाहीत, तेव्हा आपल्याला समजतेच ना की हे ज्ञान क्रियाकारी नाही? मग काय फायदा? बाकी, पारिणामिक भावामध्ये तर काहीच करावे लागत नाही. क्रोध, मान, माया, लोभ सोडायला सांगितले जाते पण वस्तुतः ते देखील पारिणामिक भाव आहेत. तू परीक्षा दे तर पास होशील. वीतराग फारच समजदार होते! पण लोक उलटच समजले! लोकांनी पारिणामिक भावांना 'क्रियाकारी' केले. चालत असलेल्या गाडीलाच चालवत राहिले आणि त्यातच समाधान मानले.

**दादाश्री :** तुमच्या सायन्समध्ये पारिणामिक भाव असतात ना?

**प्रश्नकर्ता :** सायन्स तर पूर्णपणे पारिणामिक भावावरच असते.

**दादाश्री :** पारिणामिक भावात काहीच करायचे नसते. $H_2$ आणि O असे प्रमाणात घेतले तर पाणी आपोआप बनणारच ना! उलट लोक तर म्हणतात, 'पाणी बनवा.' तसेच हे लोक म्हणतात, 'राग-द्वेष काढून टाका, क्रोध, मान, माया, लोभ काढून टाका.' अरे, ती काय आत्याची मुले आहेत की निघून जातील!?

## व्यवहार, उपधातूंचा परिणाम

यात धातू आणि उपधातू दोनही आहेत. आणि उपधातूचा परिणाम व्यवहार आहे. त्यालाच धातू परिणाम म्हणून कसे चालेल? त्यामुळेच

तर अनंत जन्मांची भटकंती मागे लागली आहे. हा चेंडू फेकला, तो उपधातूचा परिणाम आहे. आता तो काय एकदाच उसळून थांबणार नाही. पाच-सात वेळा पुन्हा पुन्हा उडतच राहणार, तो पण उपधातूचाच परिणाम आहे. धातू मिळाल्यानंतर, म्हणजे निश्चय धातू एकदाच मिळाला की मोक्षच आहे. नाही तर हा सगळा उपधातूंचा मिलाफ आहे. पूर्ण जग उपधातूंमुळे उभे आहे आणि त्यालाच धातू मानत आहे.

## पुद्गल आणि आत्मा, स्वभाव परिणामी

**प्रश्नकर्ता :** जीवाला क्षणोक्षणी अपारिणामिक भाव केव्हा उत्पन्न होतात?

**दादाश्री :** अपारिणामिक भाव म्हणजे संसार भाव, आणि पारिणामिक भाव म्हणजे मोक्षभाव. आत्म्याचा पारिणामिक भाव आहे. पारिणामिक भाव तो आत्म्याचा स्वभाव आहे, तो अंतिम भाव आहे. आत्म्याचा मूळ स्वभाव पारिणामिक भाव आहे. एक मिथ्यात्व भाव आहे, दुसरे उपशम भाव आहेत, क्षयोपशयम भाव आहेत, क्षायक भाव आहेत, सन्निपात भाव आहे आणि शेवटचा पारिणामिक भाव आहे. यातील फक्त पारिणामिक भावच आत्म्याचा आहे. बाकी सर्व पौद्गलिक भाव आहेत. सन्निपात हा पण भाव आहे. ज्ञानींना सन्निपात झाला तर ते काय करतील, सांगता येत नाही. पण तरीही त्यांचे ज्ञान बिल्कुल विचलित होत नाही.

आत्मा स्वभाव-परिणामी आहे, तो आपला स्वभाव कधीच सोडत नाही. जसे बर्फावर निखारा ठेवला तरी बर्फ आपला स्वभाव सोडत नाही.

पुद्गल पण परिणामी आहे आणि आत्माही परिणामी आहे. परिणामी स्वभाव म्हणजे क्षणोक्षणी पर्याय बदलणारा. स्वपरिणामाला आत्मचारित्र्य म्हणतात. पुद्गल परिणामात जो तन्मयाकार होत नाही, त्याचा संसार सुटला.



# [ 6 ]
# आत्मा, तत्त्वस्वरूपाने

## आत्मा : कल्पस्वरूप

आत्म्याचा स्वभाव कसा आहे? अचिंत्य चिंतामणी आहे. त्यामुळे जसे चिंतवन करतो, लगेच तसा होऊन जातो!

आत्मा कल्पस्वरूप आहे. अत: त्याचा प्रकाश बाहेर गेला म्हणून अहंकार उत्पन्न झाला. आत्मा स्वत: चिंतवन करीत नाही. परंतु अहंकाराचे आरोपण होऊन चिंतवन झाले की लगेच अगदी तसेच विकल्प निर्माण होतात!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे आत्म्याचे स्वरूप दर सेकंदाला बदलते का? कारण आम्ही तर सेकंदा-सेकंदाला चिंतवन बदलत असतो.

**दादाश्री :** सेकंदच काय, सेकंदाच्या अगदी लहानात लहान भागात पण बदलत राहते, पण एवढा उपयोग कोणाला राहत नाही.

तब्येत बरी नसेल तर म्हणावे, 'चंदुलालची तब्येत बरी नाही.' याऐवजी 'माझी तब्येत बरी नाही' असे म्हटले की लगेच त्याचा परिणाम होणार. जसे चिंतवन करील तसा होईल. आम्हाला डॉक्टरनी विचारले तर आम्ही तोंडाने म्हणतो की, 'खोकला झाला आहे.' पण आम्ही लगेचच ते (बोललेले) पुसून टाकतो. आपल्याला बोलावे लागते की 'चंदुलालला खोकला झाला आहे.' शुद्धात्म्याला थोडेच खोकला झाला

आहे? ज्याच्या दुकानाचा माल असेल ते जाहीर करावे लागते. पण ते आपल्या डोक्यावर का घ्यायचे? याला काय अर्थ आहे?

आत्म्यात दु:ख नावाचा गुण नाही, चिंता नावाचाही गुण नाही. परंतु उलटे, विभाविक चिंतवन केले तर विभाविक गुण उत्पन्न होतात. 'मी फसलो' असे चिंतवन झाले की तो फसतो. 'चोरी केली पाहिजे' असे चिंतवन करू लागला तर तो चोर बनतोच.

**प्रश्नकर्ता :** आत्मा तर शुद्धच आहे, तर मग आत्म्यात या गोष्टी कशा येतात?

**दादाश्री :** आत्मा तर शुद्धच राहतो! पण हा अहंकार जसे चिंतवन करतो तसा तो होऊन जातो. याला मेकॅनिकल आत्मा, व्यवहार आत्मा किंवा प्रतिष्ठित आत्मा असे म्हणतात. 'मी दिवाळखोर आहे' असे चिंतवन केले तर तो दिवाळखोर होतो. 'मी आजारी आहे' असे चिंतवन केल्याबरोबर तो आजारी होतो.

**प्रश्नकर्ता :** आत्मा जसे चिंतवन करतो तसा तो होतो, असे असेल तर मला हजार रुपये मिळावेत किंवा एखादी वस्तू मिळावी असे चिंतवन केल्यावर त्याचा इफेक्ट (परिणाम) का होत नाही?

**दादाश्री :** त्याच क्षणी ते 'इफेक्टमध्ये येते, पण ज्ञानींच्या भाषेत समजून घेतले तर समजेल. हजार रुपये मिळावेत असे चिंतवन केले म्हणजे लगेच तो याचक झाला. पैसे मिळणार नाहीत पण स्वत: याचक होऊन जातो. 'मी खूप दु:खी आहे' असे चिंतवन केले की स्वत:च्या अनंत सुखावर आवरण येते, आणि दु:खी बनतो. 'मी सुखी आहे' असे चिंतवन केल्याने सुखी बनतो. सासूबरोबर कटकट केली तर कटकटी होऊन जाते. मग तर चहासाठीसुद्धा कटकट करत राहते. कारण कटकटीचेच चिंतवन केले म्हणून!

आत्मा स्वत: अनंत शक्तीवाला आहे! सर्व प्रकारच्या शक्ती आतून निघतील अशा आहेत, जेवढी शक्ती काढता आली तेवढी तुमची. पण एकदा त्या अनंत शक्तीचे भान व्हायला हवे! इथे तर सतत उलटेच

(चुकीचेच) चिंतवन करतो, त्यामुळे गोंधळ निर्माण होत असतो. एकदा शुद्धात्म्याचे चिंतवन प्राप्त झाले की मग ते आपोआपच राहते, स्वत:ला काहीच करावे लागत नाही. तुम्ही जिथे जाता, तिथे तुम्हाला शुद्धात्म्याचे चिंतवन होतच असते ना?

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** हे ज्ञानच क्रियाकारी आहे! असे लाखो वर्षात झालेलेच नाही!!

**प्रश्नकर्ता :** वेड्या माणसाने 'मी शहाणा आहे' असे चिंतवन केले तर तो शहाणा होईल का?

**दादाश्री :** हो, तसे केले तर तो हळूहळू शहाणा होत जातो. हा तर त्याच्या आत परिणाम झाला आहे, 'सायकोलॉजिकल इफेक्ट्स' (मानसिक परिणाम) आहे. आम्ही तर आत एकसुद्धा परिणाम होऊ देत नाही.

**प्रश्नकर्ता :** लोक म्हणत असतात की, 'तुम्ही असे आहात, तुम्ही तसे आहात', त्याचे काय?

**दादाश्री :** लोक काही का म्हणेनात, पण आपल्यावर त्याचा परिणाम होता कामा नये की, 'मी असा आहे.' आपल्याला तर 'मी शुद्धात्मा आहे, मी शुद्धात्मा आहे' एवढेच (भान) राहिले पाहिजे.

आत्म्याचे कुठलेच चिंतवन वाया जात नाही. एक गोष्ट चांगली आहे की आत्म्याचे चिंतवन स्थूल पातळीवरतीच होत असते, म्हणून चालून जाते. उच्च प्रकारच्या चिंतवनात एका मिनिटात पाच हजार 'रिव्होल्यूशन' असतात. प्रत्येकाचे चिंतवन वेगवेगळे असते. अनंत प्रकारचे चिंतवन असतात. म्हणून तर या जगात वेगवेगळ्या प्रकारचे लोक दिसतात ना!

**प्रश्नकर्ता :** चिंतवन म्हणजे काय?

**दादाश्री :** तुम्ही या सर्व क्रिया करता, त्यांना चिंतवन म्हणत

नाहीत, तुम्ही विचार करता त्याला पण चिंतवन म्हणत नाहीत. चिंतवन तर, तुम्ही मनात जो आशय नक्की केला असेल, त्याला चिंतवन म्हणतात. मनात एक आशय ठरवला असेल की माझा एक बंगला असावा, एक बाग असावी, मी मुलांना चांगले शिकवीन-असे सगळे चिंतवन केले तर तो तसा होऊन जातो. 'लाच घ्यायला काही हरकत नाही', असे चिंतवन केले तर तो तसा (लाचखोर) होऊन जातो. हे जे दिसत आहे ते पूर्वी जसे चिंतवन केलेले त्याचे फळ आहे. 'जसे निदिध्यासन करतो, तसा आत्मा बनतो.' कित्येक लोक असे चिंतवन करतात की माझा आत्मा पापी आहे. मग असे चिंतवन करणाऱ्यांचे काय होईल?

**प्रश्नकर्ता :** मनुष्याने आत्मतत्त्वाचे चिंतवन तर करायलाच हवे ना?

**दादाश्री :** हो, करायलाच हवे. परंतु जोपर्यंत 'ज्ञानी पुरुष' त्याला 'सचेतन करत नाहीत' तोपर्यंत ते चिंतवन शुद्ध चिंतवन आहे असे मानता येणार नाही. तो केवळ शब्दांने चिंतवन करत आहे. तो एक प्रकारचा उपाय आहे. (मोक्षाला जाण्याच्या) रस्त्यावरचे ते एक मधले स्टेशन आहे.

बाहेरच्या संयोगांच्या दबावामुळे आत्म्यामध्ये कंपनशक्ती उत्पन्न होते, तेव्हा तो बाहेरचे परमाणू ग्रहण करतो. कंपनशक्ती एक तास बंद झाली तर तो मोक्षाला जाईल! 'मी डॉक्टर आहे, मी स्त्री आहे आणि दादा पुरुष आहेत' असे समजत राहिला तर मोक्ष कधीच मिळणार नाही. 'मी आत्मा आहे' असे समजले तरच मोक्ष मिळेल.

## आत्म्याचा स्वभाव - उर्ध्वगामी

आत्म्याचा स्वभाव आहे उर्ध्वगमनमध्ये जाणे-मोक्षात जाणे, स्वभावत:च तो उर्ध्वगामी आहे. आणि पुद्गलाचा स्वभावच खाली खेचणारा आहे.

एक वाळलेला तुंबा (भोपळा) आहे, आणि त्याच्यावर तीन इंच जाड साखरेची 'कोटींग' (थर) केलेली आहे, नंतर त्याला आपण समुद्रात टाकले तर प्रथम तो वजनामुळे समुद्रात बुडेल. पण जशीजशी साखर विरघळत जाईल, तसातसा तो तुंबा वर यायला लागेल. त्याच

प्रकारे हे सर्व परिणाम निरंतर विरघळत जातात. आणि आत्मा वर येऊ लागतो. फक्त आपण पुन्हा ढवळाढवळ करू लागतो, त्यामुळे पुन्हा नवीन उत्पन्न होत राहते. परमाणूंचे थर जितके जास्त तितका तो खालच्या गतीत जातो आणि कमी थरवाले उच्च गतीत जातात. आणि जेव्हा एकाही परमाणूंचे आवरण राहत नाही तेव्हा तो मोक्षाला जातो.

**प्रश्नकर्ता :** प्रत्येक जीवाचा शेवटी मोक्ष तर होतोच. कारण आत्मा स्वभावत: उर्ध्वगामी आहे. मग गुरु करण्याची काय गरज?

**दादाश्री :** आत्म्याचा स्वभाव उर्ध्वगामी आहे, पण केव्हा? जर कोणाच्या संपर्कात आला नाही तर. या बुद्धीमान् लोकांच्या संपर्कात आला नाही तर! जनावरांच्या संपर्कात राहिला तर उर्ध्वगामीच आहे. पण बुद्धीमुळे हे सर्व बिघडते, म्हणून अधोगतीत जातो. पुद्‌गलाचा स्वभाव अधोगामी आहे आणि आत्म्याचा स्वभाव उर्ध्वगामी आहे.

## सिद्धात्म्याची स्थिती

सिद्ध भगवंत स्वत:चे संपूर्ण सिद्धांत प्राप्त करून सिद्ध क्षेत्रात पुद्‌गलरहित स्वत:च्या स्व-स्वरूपात निरंतर विराजमान आहेत.

**प्रश्नकर्ता :** मुक्त झाल्यानंतर आत्म्याची अवस्था काय असते? तो कुठे जातो? काय करतो? त्याला कसे अनुभव येतात?

**दादाश्री :** प्रथम अज्ञानापासून मुक्ती होते. नंतर शिल्लक असलेल्या सर्व कलमांचा (कर्मांचा) हिशोब पूर्ण होतो. मन, वचन, काया यांचा पूर्ण निकाल झाल्यावर तो पूर्ण आत्मस्वरूप होतो. मोक्षाला जाण्यासाठी इतर कोणत्याही कारणाची गरज नसते. पूर्वीची डिस्चार्ज कर्मेच त्याला सिद्धगतीत बसवून देतात. तिथे स्वत:चा आत्मा स्वभावातच, ज्ञाता-दृष्टा आणि परमानंदातच राहतो. त्यांना हे सर्व जग दिसत असते, की काय काय चालले आहे. आत अद्‌भुत सुख वर्तत असते! तिथले एका सेकंदाचे सुख जर इथे आले, तर ते सर्व जगाला सहा महिन्यांपर्यंत सुखात ठेवील! आपण तर त्या सुखाचा एक थेंब पण पाहिलेला नाही.

**प्रश्नकर्ता :** सिद्धशिला काय आहे?

**दादाश्री :** ते एक क्षेत्र आहे. तिथे ज्ञेय नाहीत, संयोगमात्र नाहीत. जो लोक-अलोक स्वरूप आहे, त्यात लोकमध्ये सर्व तत्त्वे आहेत आणि अलोकमध्ये फक्त आकाशतत्त्व आहे. लोक आणि अलोक या दोन्हीला जोडणाऱ्या संधी स्थानावर सिद्धक्षेत्र आहे. तिथे सर्व सिद्धात्मा स्वतंत्र रूपाने वेगळेवेगळे विराजमान आहेत.

**प्रश्नकर्ता :** सिद्धात्मा तिथे काय करतात?

**दादाश्री :** काहीच नाही, करण्याचा स्वभावच नाही. स्वतःच्या परमात्मपदातच स्थित असतात. सिद्धक्षेत्रात बसलेल्यांना एकाच प्रकारचे ज्ञान दिसते. मी इथे हात वर केला तर तो त्यांना दिसतो. ज्ञान सर्वस्व प्रकाश करू शकणारे असे असते. त्याला ज्ञान का म्हणतात? कारण ते ज्ञेयांना पाहते म्हणून. अवस्था बदलते पण ते त्याला शुद्ध स्वरूपातच पाहतात. अज्ञानी व्यक्तीला मांसाचा तुकडा दिसला की त्याची चीड येते, आणि तो त्यात अवस्थित (तन्मयाकार) होतो. याउलट सिद्ध त्याच वस्तूला ज्ञेय स्वरूपात, शुद्ध स्वरूपातच पाहतात.

जर सिद्ध भगवंतांच्या गुणांची भजना केली तर काय काय प्राप्त होईल याची तर कल्पनाही करता येणार नाही, असे आहे!

## आत्मगुण : ज्ञान आणि दर्शन

आत्मा काय असेल? शब्दब्रह्माने तर सर्वांनाच माहीत आहे की अनंत गुणवाला आहे. पण यथार्थ आत्मज्ञान केव्हा म्हणायचे? जेव्हा ते गुण परिणमीत होतात तेव्हा. केवळ 'मी हीरा आहे' असे म्हणून हीरा प्राप्त होत नाही. आत्मज्ञान होण्यासाठी, आत्म्याला गुणधर्मासहित ओळखेल आणि ते गुण जेव्हा परिणमीत होतील तेव्हाच आत्मज्ञान होईल.

आत्म्याचे दोन मुख्य गुण आहेत : ज्ञान आणि दर्शन. या खेरीज तर अनंत गुण आहेत! 'अनंत ज्ञान - अनंत दर्शन - अनंत शक्ती - अनंत सुख'!

आत्मा स्वतः शुद्धच आहे, पण त्याचे जे पर्याय आहेत ते जरा

अशुद्ध झाले आहेत. त्या प्रत्येकाला वेगळे वेगळे धुवायचे आहे. ते आपले सुख अडवत आहेत.

**प्रश्नकर्ता :** आत्म्याच्या 'अनंत ज्ञान' या गुणधर्माला गुण म्हणायचे की धर्म?

**दादाश्री :** आत्म्याचे अनंत गुणधर्म आहेत. गुण परमनंट आहेत आणि धर्म टेम्पररी आहे.

'मी अनंत ज्ञानवाला आहे' हा त्याचा 'परमनंट' गुण आहे. 'मी अनंत दर्शनवाला आहे' हा त्याचा 'परमनंट' गुण आहे. 'मी अनंत शक्तीवाला आहे' हा त्याचा 'परमनंट' गुण आहे. 'मी अनंत सुखधाम आहे' हा त्याचा 'परमनंट' गुण आहे.

आत्म्याचे गुण परमनंट आहेत. आणि त्याच्या धर्मांचा वापर होत असतो. ज्ञान परमनंट आहे आणि पाहणे-जाणणे हे टेम्पररी आहे. कारण जशीजशी अवस्था बदलते तशीतशी पाहणाऱ्याची अवस्था बदलते. जशी सिनेमात अवस्था बदलते तशीच पाहणाऱ्याची अवस्था पण बदलते.

ज्ञान-दर्शन हे तर कायमस्वरूपी गुण आहेत आणि पाहणे-जाणणे हा त्याचा धर्म आहे. अनंत ज्ञेयांना जाणण्यात परिणमीत झालेल्या अनंत अवस्थांमध्ये 'शुद्ध चेतन' संपूर्ण शुद्ध आहे, सर्वांग शुद्ध आहे. अनंत दृश्यांना पाहण्यात परिणमीत झालेल्या अनंत अवस्थांमध्ये 'शुद्ध चेतन' संपूर्ण शुद्ध आहे, सर्वांग शुद्ध आहे.

**प्रश्नकर्ता :** अनंत ज्ञेये, अनंत अवस्था आणि त्यांचे अनंत ज्ञान - ही तर फार उच्च गोष्ट आहे, हे वाक्य पूर्वी कधीच ऐकलेले नाही. जरा सविस्तर समजावून सांगा ना.

**दादाश्री :** ही वाक्ये तर आम्ही 'केवल ज्ञानात' पाहून बोलत आहोत. 'ज्ञानी पुरुषां'च्या मुखातून निघालेली वाक्ये संपूर्ण स्वतंत्र असतात, मौलिक असतात, ती कुठूनही उचललेली नसतात. त्यांचे 'वेल्डिंग' काही वेगळ्याच प्रकारचे असते! ते शास्त्रांचे शब्द नसतात!! त्यांच्या एकच वाक्यातून अनेक शास्त्रे बनू शकतात.

'अनंत ज्ञेयांना जाणण्यात परिणमीत झालेल्या अनंत अवस्थांमध्ये मी संपूर्ण शुद्ध आहे, सर्वांग शुद्ध आहे.' हे एवढेच वाक्य जो कोणी पूर्णपणे समजेल तो संपूर्ण दशा प्राप्त करील!

अवस्था या अवास्तविक असतात आणि मूळ वस्तू वास्तविक असतात. आपण अवस्थांना जाणणारे आहोत आणि इतर लोक अवस्थांमध्ये तद्रूप होऊन जातात. लग्न केले तर म्हणतात 'मी लग्न केले' आणि विधुर झाले तर म्हणतात, 'मी विधुर झालो.' ते त्या अवस्थारूपी होतात.

विनाशी वस्तूंचे परिवर्तन होत असते. त्यात आत्म्याच्या ज्ञानशक्तीचे परिवर्तन होते. कारण अवस्थांना 'पाहणारे' 'ज्ञान' आहे. जशाजशा अवस्था बदलतात तसेतसे ज्ञान पर्याय बदलतात. पर्यायांचे निरंतर परिवर्तन होतच असते. तरीही त्यात ज्ञान शुद्धच राहते. संपूर्ण शुद्ध राहते, सर्वांगाने शुद्ध राहते.

**प्रश्नकर्ता :** ज्ञान कुठल्या रूपात परिवर्तित होते? पर्याय स्वरूपात?

**दादाश्री :** हो. स्वत:च्या पर्यायालादेखील जो जाणतो तोच तो 'स्वत:' आहे, शुद्धात्मा आहे.

**प्रश्नकर्ता :** आम्ही जगातील सतत बदलत्या गोष्टी पाहू शकतो. पण स्वत:ची 'पर्मनन्सी' (अविनाशीपण) पाहू शकत नाही.

**दादाश्री :** जो सतत बदलणाऱ्या वस्तूंना पाहातो, तो स्वत: परमनंट आहे.

अनंत ज्ञान आहे म्हणून तर अनंत ज्ञेयांना जाणू शकतो. नाही तर कसे काय जमले असते? एकच दिवस आपण ऐकतो की चुलत सासऱ्यांचा मुलगा वारला. ते काही आपण कुठे वहीत लिहून ठेवीत नाही. पण बारा वर्षांनंतर त्यांच्या घरी गेलो तरी मगनभाऊ घरात आहेत का? असे आपण विचारतो का?! ते मृत्यू पावले आहेत असे एकदाच कळल्यावर ते ज्ञान कायम हजरच राहते ना!! कितीतरी लोक मरतात, पण सगळ्यांच्या बाबतीत लक्षात राहते की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो, निश्चित लक्षात राहते.

**दादाश्री :** आत्म्याची शक्ती अद्‌भुत आहे. व्यापार करतो, इतरही अनेक गोष्टी करतो, आणि तरीही आत्म्यात राहू शकतो.

**प्रश्नकर्ता :** ज्ञान आणि दर्शन हे जे आत्म्याचे गुण आहेत त्यांना गुण म्हणण्यामागे काय कारण आहे?

**दादाश्री :** ती तर स्वाभाविक वस्तू आहे.

## आत्मा : गुणधर्माने अभेद स्वरूप!

**प्रश्नकर्ता :** ज्ञान भेदवाले आहे की अभेद आहे?

**दादाश्री :** ज्ञान भेदवाले नसतेच. ज्ञान, दर्शन सर्व काही अभेदस्वरूपीच आहे. जर सोने असेल, तर त्याचा रंग पिवळा असतो, हा त्याचा गुण आहे, मग ते वजनदार असते हा दुसरा धर्म, त्याला गंज लागत नाही हा त्याचा तिसरा धर्म आहे. म्हणजे हे सगळे सोन्याचे गुणधर्म आहेत. त्याचप्रमाणे आत्म्याचे पण गुणधर्म आहेत. ज्या प्रकारे सोने त्याच्या गुणधर्मात अभेदभावाने सोनेच असते, त्याच प्रकारे आत्मा त्याच्या सर्व गुणांत अभेदभावाने आत्माच असतो, तिथे अजिबात भेद नसतो.

**प्रश्नकर्ता :** ज्ञान जेव्हा आपल्या विचारात येते, तेव्हा तर त्याचे तुकडे-तुकडे होतात. अभेद-स्वरूपात राहत नाही. आपण जाणतो अभेद स्वरूपात, पण शब्दात वर्णन करू लागल्यावर ते भेदरूपी होऊन जातो.

**दादाश्री :** वर्णन करायचे झाले की भेद दिसणारच. सोने पिवळे आहे, असे बोलावे लागते पण एट ए टाईम (एकाच वेळी) त्याचे सर्व गुणधर्म सांगता येत नाहीत. त्यानंतर दुसऱ्या वेळी ते वजनदार आहे असे बोलावे लागते. त्याच प्रकारे 'मी अनंत ज्ञानवाला आहे' तरीही भेद नाही, अभेद स्वरूपाने आहे. मूळ वस्तू एकच आहे.

## परिणमीत अवस्थेत आत्मा शुद्ध

ज्ञानाचा स्वभाव आहे की ते ज्ञेयाच्या आकाराचे होऊन जाते, तरीही ते स्वतः शुद्धच राहते. एक ज्ञेय बाजूला झाले की दुसरे ज्ञेय

समोर येते, आणि पुन्हा स्वतः ज्ञानाकार होते, पण दोन्ही (ज्ञान आणि ज्ञेय) चिकटून राहत नाहीत.

अवस्थांचे ज्ञान नाशवंत आहे आणि स्वाभाविक ज्ञान अविनाशी आहे. ज्या प्रकारे हा सूर्य आहे आणि हे त्याचे किरण आहेत, त्याच प्रकारे आत्मा आहे आणि आत्म्याचे किरण आहेत, ते त्याच्या अवस्था आहेत. अवस्थेतच बदल होत असतो, बाकी, एकही परमाणू वाढलेला नाही किंवा कमीही झालेला नाही.

## आत्मा : द्रव्य आणि पर्याय

**प्रश्नकर्ता :** पर्याय म्हणजे काय?

**दादाश्री :** ज्ञेयात ज्ञेयाकार परिणाम ते पर्याय.

फक्त आत्म्याचाच प्रकाश असा असतो की तो संपूर्ण ज्ञेयाकार होऊ शकतो. बाकी कोणताही प्रकाश असा नाही की जो ज्ञेयाकार होऊ शकतो.

**प्रश्नकर्ता :** 'तत्त्वाने जे शून्य आहे, ते पर्यायांने पूर्ण आहे.' याचा अर्थ काय?

**दादाश्री :** द्रव्य आणि गुणांनी आत्मा शून्य आहे आणि पर्यायाने पूर्ण आहे. आत्म्याला द्रव्य, गुण आणि प्रर्याय आहेत आणि पुद्‌गलालासुद्धा द्रव्य, गुण आणि पर्याय आहेत. हे दोन्ही (आत्मा आणि पुद्‌गल) स्वतःच्या पर्यायाने पूर्ण आहेत आणि मूळ स्वभावाने शून्य आहेत. ते स्वतः स्वभावात आले तर शून्य आहेत.

ज्ञेयानुसार आत्म्याचे पर्याय होतात पण आत्म्याचे द्रव्य आणि गुण ज्ञेयानुसार होत नाहीत. ज्ञेय दूर झाले की मग पर्याय पण तिथून हटून इतर ठिकाणी जाते. म्हणजे या प्रकारे पर्यायाने पूर्ण आहे.

**प्रश्नकर्ता :** द्रव्य आणि गुणाने शून्य कशा प्रकारे होऊ शकतो?

**दादाश्री :** शून्य म्हणजे जग ज्याला शून्य समजते तसे नाही.

शून्य याचा अर्थ निर्विकार पद. मनाला लोक शून्य करू पाहतात, पण मन जेव्हा आत्म्यासारखे होईल तेव्हा ते शून्य होईल. अर्थात आत्म्याचे सर्वच गुण प्राप्त होतील तेव्हा शून्य होईल. मन एक्झॉस्ट झाले (संपले) तर ते शून्य होईल.

पर्याय विनाशी असतात आणि द्रव्य-गुण अविनाशी असतात. द्रव्य-गुण सहचारी (एकमेकांबरोबर) असतात. गुण सर्व सहचारी असतात आणि पर्याय बदलत असतात.

सिद्ध भगवंताना पण द्रव्य-गुण आणि पर्याय असतात. पण त्यांचे सर्व पर्याय शुद्ध असतात, म्हणून ते फक्त पाहतात आणि जाणतात.

वस्तूच्या सूक्ष्म अवस्थेला पर्याय म्हणतात, आणि स्थूल अवस्थेला अवस्था म्हणतात. इंग्रजीत 'फेजीस्' म्हणतात ना? पण तसे तर ते देखील स्थूलच आहे.

मला जो आत्मा समजला आहे त्याचे मी वाणीद्वारा बोलून वर्णन करत आहे. त्याचा तुम्ही फक्त 'व्ह्यू पॉइंट'चा अर्थ समजू शकता. खरे तर तो अवर्णनीय आहे.

आत्मा स्वत: ज्ञाता-दृष्टा आणि परमानंदी आहे. ही सगळी ज्ञेये आहेत म्हणून तो ज्ञाता आहे. ज्ञेय-ज्ञाता असा संबंध आहे. ही फुलाची पाकळी पण आहे आणि फूल पण आहे, पण पाकळी म्हणजे फूल नव्हे आणि फूल म्हणजे पाकळी नव्हे, असे आहे.

पाहण्यात आणि जाणण्यात कोणतीही चूक होत नाही त्याला ज्ञाता-दृष्टा असे म्हणतात.

''अनंत ज्ञेयांना जाणण्यात परिणमीत झालेल्या अवस्थांमध्ये 'शुद्ध चेतन' संपूर्ण शुद्ध आहे, सर्वांग शुद्ध आहे.'' ज्ञेयांना जाणण्यात काहीच हरकत नाही. आत्म्याला ज्ञेयांबरोबर राग-द्वेषामुळे बंधन आहे, आणि वीतरागतेमुळे मुक्ती आहे. जरी देह असला, मन असले, वाणी असली, तरी त्या ज्ञेयांमध्ये आत्मा वीतरागतेमुळे मुक्तच आहे.

पर्याय अनंत आहेत, पण त्यात घाबरायचे काय कारण? डोक्यावर कोट्यावधी केस आहेत, पण एक कंगवा फिरवला की ते सर्व नीट जागेवर बसतात!

## आत्मा : ज्ञान क्रिया

ज्ञान आणि दर्शन या क्रियांमध्ये भगवंतांचे नुकसान तरी काय आहे? अज्ञान क्रियेमध्ये त्रास आहे. ज्ञानक्रियेत तर दमायला होतच नाही. भगवंत क्रियाशील आहेत, पण ज्ञानक्रियेचे क्रियाशील आहेत. शुद्ध चेतनाची सक्रियता आहे, पण ती त्याची स्वत:ची स्वाभाविक सक्रियता आहे, त्यामुळे दमायला होत नाही. आरशात आपले प्रतिबिंब दिसते, त्यात आरशाला काही मेहनत करावी लागते का? भगवंत पण असेच आहेत! पूर्ण जग प्रतिबिंबाच्या रूपात दिसत असते असे शेषशायी भगवंत आहेत! शेषशायी का म्हणतात? अरे, जर पर रमणता केलीस तर साप चावेल!

आत्मा स्वत: अनंत काळापासून वीतरागच आहे, त्याचे गुणधर्म कधीच बदललेले नाहीत. आत्मा-अनात्मा अनादि काळापासून 'मिक्स्चर' रूपात एकत्र राहिले आहेत. त्यांचे कंपाउंड (संयुग) झालेले नाही. परंतु जेव्हा ज्ञानी पुरुष त्या दोघांना वेगळे करून देतात तेव्हाच मूळ आत्म्याचा अनुभव येतो. जोपर्यंत अनात्म्याचा एक जरी परमाणू आत्म्यात शिल्लक असेल तोपर्यंत अनुभव येत नाही.

## द्रव्य, गुण, पर्यायांनी शुद्धत्व

**प्रश्नकर्ता :** तत्त्वाच्या रूपाने आत्मा कसा आहे?

**दादाश्री :** आकाशासारखा आहे.

**प्रश्नकर्ता :** आत्म्याचे परमाणू असतात का?

**दादाश्री :** नाही, आकाशात काय दिसते? आत्म्याचा प्रकाशच वेगळ्या स्वरूपाचा असतो आणि ते परमाणू वेगळ्या प्रकारचे असतात. कितीतरी परमाणू जेव्हा एकत्र होतात तेव्हा वस्तू दिसते. हे शरीर मन, वचन, अंत:करण सगळे परमाणूंनी बनले आहे. याउलट आत्मा एकच वस्तू आहे.

**प्रश्नकर्ता :** तत्त्वाच्या रूपात आत्मा प्रकाशाचा बनलेला आहे का?

**दादाश्री :** त्याचा स्वभाव प्रकाशासारखा आहे!

**प्रश्नकर्ता :** आपले ज्ञान वाक्य आहे ''द्रव्य, गुण आणि पर्याय यांनी शुद्धचेतन संपूर्ण शुद्ध आहे, सर्वांग शुद्ध आहे.'' मग आत्मा कोणत्या पर्यायाने शुद्ध आहे? ज्ञान, दर्शनाच्या पर्यायाने?

**दादाश्री :** ज्ञान-दर्शन हे तर आत्म्याचे गुण आहेत. आंबा पाहताच 'ज्ञान' आंब्याच्या आकाराचे होऊन जाते. ज्ञेयाचा जसा आकार असतो तसा ज्ञानाचा आकार होतो. जगातील लोकांना ते ज्ञान पर्याय चिकटतात, आणि त्यामुळे अशुद्धी निर्माण होते. आपल्याला (ज्ञान प्राप्त झालेल्या महात्म्यांना) हे चिकटत नाही. परत तिथून निघून दुसरीकडे जाते. कुठेही पाहिले तरी तन्मयाकार होत नाही.

**प्रश्नकर्ता :** त्याला आंब्याचा आकाराचे म्हणालात म्हणजे तो ज्ञान-दर्शनाचा पर्याय झाला ना?

**दादाश्री :** नाही. ज्ञान-दर्शन हे तर गुण आहेत आणि पर्यायाला स्थूल भाषेत समजायचे असेल तर अवस्था म्हणू शकतो. जी कोणती वस्तू असेल पर्यायाने ते त्याच आकाराचे ज्ञेयाकार होऊन जाते. द्रश्याकार होत नाही. कारण दर्शन सामान्य भावाने आहे आणि ज्ञान विशेषभावाने आहे त्यामुळे ज्ञेये वेगवेगळी असतात.

**प्रश्नकर्ता :** 'द्रव्य, गुण आणि पर्याय यांनी मी संपूर्ण शुद्ध आहे, सर्वांग शुद्ध आहे', हे शुद्धात्म्याच्या दृष्टीने की प्रतिष्ठित आत्म्याच्या दृष्टीने?

**दादाश्री :** शुद्धात्म्याच्या दृष्टीने.

**प्रश्नकर्ता :** सिद्धक्षेत्रात विराजमान असलेल्या सिद्ध भगवंतांनी आंबा पाहिला तर त्यांच्यात पर्याय उत्पन्न होतात की नाही?

**दादाश्री :** पर्यायाशिवाय तर आत्मा नसतोच ना! पर्याय असतात म्हणून तर वस्तू तत्त्व दृष्टीने अविनाशी आणि पर्यायाच्या दृष्टीने विनाशी असते.

**प्रश्नकर्ता :** आपण जे पाहतो आणि सिद्ध भगवंत जे पाहतात, त्यांचे पर्याय वेगळे असतात का?

**दादाश्री :** ते तर वेगळेच असतात ना! आपण चिकटलेले पर्याय उपटून टाकतो आणि सिद्धांना तर काही उपटण्याची गरजच नाही, कारण त्यांना चिकटतच नाहीत! सिद्धांचे स्वरूप आपल्या श्रद्धेत आहे आणि वर्तनात विनाशी स्वरूप आहे. पण श्रद्धेतून ते विनाशी स्वरूप निघून गेले आहे.

**प्रश्नकर्ता :** 'द्रव्याने, तत्वाने संपूर्ण शुद्ध आहे, सर्वांग शुद्ध आहे' हे ज्ञान-दर्शनानेच ना?

**दादाश्री :** द्रव्याने आहे, ज्ञान दर्शनाने पण आहे, आणि गुणांने पण आहे, सर्व गुणांने.

**प्रश्नकर्ता :** आत्मा शुद्ध झाल्यावर त्याचे पर्याय असतात का?

**दादाश्री :** हो, पर्यायांशिवाय आत्मा नसतोच.

**प्रश्नकर्ता :** पर्याय असतील तर मग आत्मा बदलणार नाही का?

**दादाश्री :** अजिबात बदलत नाही. ही (ट्युब) लाइट आहे ती जड आहे. उदाहरण म्हणून जर आपण ही लाइट घेतली तर लाइट 'द्रव्य' आहे आणि प्रकाश देण्याची जी शक्ती आहे, ती ज्ञान-दर्शन आहे, आणि त्या प्रकाशात आपल्याला ह्या सर्व वस्तू दिसतात त्यांना ज्ञेय म्हणतात. आता या लाइटला तुम्ही कशात तरी बंद करून ठेवलेत तर तिला काहीच चिकटत नाही, लाइट शुद्धच राहते. जसा तुमच्या श्रद्धेत आहे, तसाच आत्मा होऊन जाईल.

**प्रश्नकर्ता :** 'स्वत:' स्वत:च्या' द्रव्यानेही शुद्ध आहे, ते कसे?

**दादाश्री :** ते स्वभावानेच आहे. द्रव्याने तर सर्व तत्त्वे शुद्धच असतात, फक्त पर्यायानेच सर्व बिघडलेले आहे.

हा पर्याय शब्द जसा संसारात वापरला जातो तसा वापरू शकत

नाही. पर्याय फक्त अविनाशी वस्तूंनाच, सत् वस्तूंनाच लागू होतो, इतर कोणत्याही ठिकाणी लागू होत नाही. चेतनाचे पर्याय चेतन असतात आणि अचेतनाचे पर्याय अचेतन असतात. द्रव्य, गुण आणि पर्याय यांना जर एक्जेक्टनेसमध्ये समजून घेतले तर 'केवलज्ञान स्वरूप' होऊन जाईल.

**प्रश्नकर्ता :** अचेतन पर्यायांचे परिणाम काय होतात?

**दादाश्री :** 'ज्ञानीं'वर कुठल्याही प्रकारचा परिणाम होत नाही, पण अज्ञानींवर होतो.

**प्रश्नकर्ता :** अज्ञानींना कर्मबंधन होते का?

**दादाश्री :** हो.

आत्म्याचे द्रव्य, गुण आणि पर्याय या अतिशय गहन गोष्टी आहेत. सहज समजता येतील अशा त्या गोष्टी नाहीत. वीतरागींचे विज्ञान सहज संपूर्ण समजेल असे नाही.

## आत्मा : परमानंद स्वरूपी

जोपर्यंत व्यवहार आत्मा आहे तोपर्यंत मानसिक आनंद आहे. आत्मा जाणल्यानंतर आत्म्याचा आनंद प्राप्त होतो. शब्दरूपाने ऐकलेल्या आत्म्याने काम होणार नाही, यथार्थ रूपाने असले पाहिजे.

निरंतर आनंदात राहणे याचेच नाव मोक्ष. कोणी शिव्या देवो, कोणी खिसे कापो, तरीदेखील आनंद न हरवणे म्हणजे मोक्ष. मोक्ष म्हणजे इतर कुठली वस्तू नाही. 'ज्ञानी पुरुषांना' निरंतर परमानंदच असतो.

आत्म्याचा स्वभावच परमानंदस्वरूपी आहे. सिद्ध भगवंतांचा परमानंद असीम असतो. त्यांच्या एका मिनिटाचा आनंद म्हणजे साऱ्या जगातील सर्व जीवांच्या वर्षभराच्या आनंदाइतका असतो. तरीदेखील ही तर स्थूल सिमीली (उपमा)च आहे.

बाहेरून जो काही आनंद मिळतो, तो सगळा पौद्गलिक आनंद

आहे. किंचितदेखील बाहेरचा आनंद नसेल, किंचितही पुदगल परमाणूचा आनंद नसेल, सहज, अप्रयास प्राप्त आनंद असेल तोच आत्म्याचा आनंद. शास्त्रे वाचून जो आनंद मिळतो, तो आत्म्याचा आनंद नाही. तो सर्व पौद्‌गलिक आनंद आहे. भयंकर उन्हात चालून थकलेला माणूस बाभळीच्या झाडाच्या सावलीत देखील हुश्श करतो, असा तो (पौद्‌गलिक) आनंद आहे. जी मेहनत केली, त्या मेहनतीचा तो आनंद आहे. आनंद सहज असला पाहिजे, निराकूल आनंद असला पाहिजे. लग्नात आणि सिनेमा पाहाण्यात आनंद आहे पण तो आकूल-व्याकूल आनंद आहे. ते मनोरंजन आहे, आत्मरंजन नाही. निराकूल आनंद उत्पन्न झाला तर समजा की आत्मा प्राप्त झाला आहे.

आनंद हा तर आत्म्याच्या सहचारी गुणांपैकी एक गुण आहे, अन्वय गुण आहे. आत्मा जाणल्यानंतर आत्म्याचा शुद्ध पर्यायिक आनंद उत्पन्न होतो, तो क्रमा क्रमाने वाढत जाऊन संपूर्ण दशेपर्यंत पोहोचतो. बाहेरील सर्व संयोगापासून मुक्त झाल्यावर कसल्याही प्रकारचे त्रास राहत नाहीत. थेट केवलज्ञान होईपर्यंत काही भाग शुद्ध पर्यायात येत नाहीत. केवलज्ञानानंतर सर्व पर्याय शुद्ध पर्यायात येतात आणि त्यानंतर तो मोक्ष प्राप्त करतो.

**प्रश्नकर्ता :** सच्चा आनंद कशा प्रकारे अनुभवास येऊ शकतो?

**दादाश्री :** सच्चा आनंद कोणत्याही बाह्य प्रकाराने अनुभवला जात नाही. या लौकिक आनंदासाठी इंद्रियांची गरज असते, पण सच्च्या आनंदासाठी इंद्रियांची गरज नसते. उलट इंद्रिये अंतराय (अडथळा) आणतात. सच्चा आनंद हा शाश्वत आनंद आहे. कुठल्याही वस्तूचा आधार लागत असेल तर तो पौद्‌गलिक आनंद आहे. आधार म्हणजे एखादी वस्तू मिळते, विषयांची वस्तू मिळते, मान-पान मिळतो, लोभामुळे लाभ मिळतो तो सर्व कल्पित, पौद्‌गलिक आनंद! जगाचे विस्मरण करवितो तोच सच्चा आनंद आणि तोच आत्म्याचा आनंद. आनंद तर निरुपाय आनंद असायला हवा, मुक्त आनंद असायला हवा.

प्रत्येक जीवमात्राच्या आत भरमसाट आनंद भरलेला आहे पण

आत्म्याचा आनंद येणे आता बंद झाले आहे. कषाय, क्लेश, राग-द्वेष होत असल्यामुळे आत्म्यावर आवरणे येतात म्हणून आनंद निघून जातो. गाईच्या शिंगावर मोहरीचा दाणा ठेवला तर तो जितका वेळ टिकेल (राहील), तितका वेळ देखील जर आत्म्याचा आनंद चाखायला मिळाला तर तो आनंद मग कधीच जाणार नाही. एकदा दृष्टीत 'फिट' बसल्यामुळे कायम राहतो. सच्चा आनंद निरंतर मिळतो. अत्यंत तृप्ती वाटते. त्या आनंदाचे वर्णन होऊच शकत नाहीत.

क्रोध, मान, माया, लोभ यांची गैरहजेरी म्हणजेच आनंद. सांसारिक आनंद असतो, तो मूर्च्छेचा आनंद आहे, दारु पिऊन मिळालेल्या आनंदासारखा. जगातील लोकांनी आनंद पाहिलेलाच नाही. जो पाहिला आहे तो तिरोभावी आनंद आहे. आनंदात थकवा नसतो, कंटाळा नसतो. कंटाळा येतो याचा अर्थच थकवा.

**प्रश्नकर्ता :** इतर कोणत्याही ठिकाणापेक्षा मला इथे वेगळे वाटते. इथे सगळ्यांच्या चेहऱ्यावर हास्य आणि आनंद काही वेगळ्याच प्रकारचा दिसतो. याचे कारण काय?

**दादाश्री :** तुम्हाला याची परीक्षा करता आली हीच फार मोठी गोष्ट आहे. ही परीक्षा करता येणे ही सोपी गोष्टी नाही. हे तर जगातील एक मोठे आश्चर्य आहे! याचे कारण येथील सगळ्यांच्या आतमधील जळजळ संपली आहे आणि आत्म्याचा आनंद उत्पन्न झाला आहे. इथे सच्चा आनंद प्राप्त होतो आणि त्यामुळे कित्येक जन्मात झालेले घाव भरून निघतात. नाही तर संसारात झालेले घाव भरून निघतच नाहीत ना! एक घाव भरून निघतो तोपर्यंत नवीन पाच घाव पडतात! आत्म्याचा आनंद लाभला की आतील सर्व घाव भरून निघतात, त्यामुळे मुक्तीचा अनुभव होतो!!

**प्रश्नकर्ता :** जगात अशी कोणती वस्तू आहे की ज्यामुळे आनंद मिळू शकेल?

**दादाश्री :** 'ज्ञानी पुरुषां'ना पाहताच आनंद मिळतो.

**प्रश्नकर्ता :** तुमचे बोलणे ऐकूनच आम्हाला अपार आनंद होतो मग तुम्हाला किती आनंद असेल?

**दादाश्री :** तुमच्यात पण तोच आनंद भरलेला आहे, माझ्यात पण तोच आनंद भरलेला आहे, सगळ्यांच्यात तोच आनंद भरलेला आहे, एकच स्वरूप आहे. ज्याचा जेवढा पुरुषार्थ आणि जेवढा 'ज्ञानीं'चा *राजीपा,* या दोन्ही गोष्टी एकत्र आल्या की झाले! (आत्म प्रगती होऊ लागते.)

## आत्मा : अनंत शक्ती

स्वत:मध्ये स्वत:च्या सर्व शक्ती व्यक्त होतात, तोच परमात्मा आहे. पण या शक्ती आवरणांमुळे झाकल्या गेल्या आहेत. अन्यथा स्वत:च परमात्मा आहे.

प्रत्येक जीवमात्रात, गाढव, कुत्रा, गुलाबाचे रोपटे सगळ्यांच्यातच आत्म्याच्या अनंत शक्ती आहेत, पण त्या झाकल्या गेल्या आहेत, म्हणून त्यांचे फळ मिळत नाही. जेवढ्या शक्ती प्रकट झालेल्या असतील, तेवढ्याच प्रमाणात फळ मिळते. 'इगोइजम' (अहंकार) आणि ममता पूर्णपणे समाप्त झाल्यावर ती शक्ती व्यक्त होते.

पुद्‌गलावर जितकी सस्पृहता होती, आणि आत्म्यावर नि:स्पृहता होती, तर आता पुद्‌गलावर नि:स्पृहता जितक्या प्रमाणात येईल तितक्या प्रमाणात आत्म्यावर सस्पृहता येईल.

पुद्‌गलाच्या आणि आत्म्याच्या सर्व शक्ती फक्त एका प्रकट परमात्म्यासाठीच लावण्यायोग्य आहेत. मनुष्यात संपूर्ण परमात्म शक्ती आहे, पण ती वापरता आली पाहिजे. 'ज्ञानी पुरुष' सर्व शक्ती द्यायला तयार आहेत. शक्ती (खऱ्या तर) तुमच्या आतच पडून आहेत. पण कुलूप उघडून ती शक्ती मिळवण्याचा हक्क तुमच्याजवळ नाही. 'ज्ञानी पुरुष' कुलूप उघडतील तेव्हाच त्या शक्ती बाहेर येतील. या हिंदुस्तानातील एकच मनुष्य सगळ्या जगाचे कल्याण करू शकेल एवढ्या साऱ्या शक्ती त्याच्याजवळ आहेत, पण सध्या या साऱ्या शक्ती चुकीच्या दिशेने वापरल्या जात आहेत म्हणून 'सॅबोटेज' (विनाश) होत आहे. या शक्तींना कंट्रोलरची

(नियंत्रकाची) आवश्यकता आहे. 'ज्ञानी पुरुष' आणि 'सत् पुरुष' आणि 'संत पुरुष' यासाठी निमित्त असतात.

भगवंतांकडे कोणती शक्ती मागावी? हे जे वादळ चालू आहे, त्यात ज्ञान शक्ती आणि स्थिरता शक्ती द्या. असे मागितले पाहिजे. पुद्‌गल शक्ती मागू नये, ज्ञान शक्ती मागावी.

आतमध्ये अनंत शक्ती आहेत. अनंत सिद्धी आहेत, पण त्या अव्यक्त स्वरूपात आहेत. आतमध्ये खूप सुंदर, रम्य, अशा शक्ती आहेत! गजब शक्ती आहेत, त्यांना सोडून लोकांनी बाहेरच्या कुरूप शक्ती विकत आणल्या. स्वभावकृत शक्ती किती सुंदर आहेत! पण त्या सोडून ह्या शक्ती बाहेरुन विकत आणल्या. आतमध्ये दृष्टी पडलीच नाही. आत्मा प्राप्त झाल्यावर या व्यक्त होऊ लागतात.

आत्मशक्तींना तर 'आत्मवीर्य' असे म्हटले जाते. 'आत्मवीर्य' कमी असेल तर त्याच्यात कमकुवतपणा निर्माण होतो; क्रोध, मान, माया, लोभ उत्पन्न होतात. अहंकारामुळे 'आत्मवीर्य' तुटते. आणि अहंकाराचा जसाजसा विलय होऊ लागतो, तसेतसे 'आत्मवीर्य' उत्पन्न होऊ लागते. जेव्हा जेव्हा असे वाटते की 'आत्मवीर्य' कमी होत चालले आहे, तेव्हा तेव्हा पाच-पंचवीस वेळा मोठयाने बोलावे, 'मी अनंत शक्तीवाला आहे' मग शक्ती उत्पन्न होईल.

**प्रश्नकर्ता :** 'मी अनंत शक्तीवाला आहे' असे आम्ही म्हणतो, पण सिद्ध भगवंतांसाठी या शक्ती कोणत्या आहेत?

**दादाश्री :** जोपर्यंत वाणी आहे तोपर्यंतच 'मी अनंत शक्तीवाला आहे' असे बोलण्याची गरज आहे आणि मोक्षाला जाताना विघ्ने अनंत प्रकारची आहेत, म्हणून त्या विघ्नांसमोर 'आपण अनंत शक्तीवाले आहोत,' नंतर काहीच उरत नाही. वाणी आहे आणि विघ्ने आहेत, तोपर्यंतच बोलण्याची गरज आहे.

**प्रश्नकर्ता :** आत्मा मोक्षाला गेल्यावर 'ज्ञाता-दृष्टा' या शिवाय कोणकोणत्या शक्ती त्याच्याजवळ असतात?

**दादाश्री :** इतर अनेक शक्ती आहेत. स्वत:च्या शक्तीने तो हे सर्व पार करतो आणि मोक्षाला गेल्यानंतर या सर्व शक्ती 'स्टॉक' मध्ये असतात. आज पण तुमच्याजवळ त्या सर्व शक्ती आहेत, पण जितक्या वापराल तितक्या खऱ्या.

**प्रश्नकर्ता :** मोक्षाला गेल्यावर त्या शक्तींचा उपयोग दुसऱ्यांसाठी करता येत नाही ना?

**दादाश्री :** नंतर कुठे उपयोग करायचा? आणि तिथे कशासाठी उपयोग करायचा? स्वत:ला कोणतीही अडचण येणार नाही एवढी 'सेफसाईड' (सुरक्षितता) असते.

**प्रश्नकर्ता :** आत्म्याच्या अनंत शक्ती आहेत, त्या देहामुळे आहेत का?

**दादाश्री :** देहामुळे तर नाशवंत शक्ती उत्पन्न होतात.

**प्रश्नकर्ता :** मोक्षातही अनंत शक्ती असतात?

**दादाश्री :** हो, सगळ्याच शक्ती असतात, पण तिथे त्यांचा वापर करायचा नसतो. मोक्षाला जाता जाता वाटेत अनेक अंतराय येतात. म्हणून मोक्षाला जाताना त्या अंतरायांसमोर अनंत शक्ती विद्यमान असतात.

**प्रश्नकर्ता :** आत्म्याच्या अनंत शक्तींचा उपयोग कशा प्रकारे होतो? 'ज्ञाता-दृष्टा' राहण्यासाठीच?

**दादाश्री :** ज्ञाता-दृष्टापण ही मूळ वस्तू आहे. ती आली तर सर्व प्रकारच्या शक्ती उत्पन्न होतात. त्याच्याशी 'आपण' 'जॉइंट' केले तर त्या सर्व शक्ती आपोआप प्राप्त होतात.

आत्म्याच्या अनंत शक्ती आहेत. त्यांचा जर उलट उपयोग केला तर असे (उलट) होऊ शकते आणि सुलट उपयोग केला तर असीम आनंद उत्पन्न होतो. उलट उपयोग केला म्हणून तर हे सर्व जग उत्पन्न झाले आहे! सिद्ध भगवंतांना तर निरंतर ज्ञाता-दृष्टा आणि परमानंद, त्यातच निरंतर राहायचे असते. त्यांना विलक्षण सुख वर्तत असते!

**प्रश्नकर्ता :** म्हणजे याचा अर्थ असा आहे की या अनंत शक्तींचा उपयोग मोक्षाला जाताना स्वत:च्या स्वभावात राहण्यासाठीच करायचा आहे?

**दादाश्री :** या उलट शक्तींमुळे संसार उत्पन्न झाला आहे. आता सरळ शक्ती इतकी जास्त आहे की ती सर्व प्रकारची विघ्ने दूर करू शकते. म्हणूनच आम्ही तुमच्याकडून हे वाक्य म्हणवून घेतो : 'मोक्षाला जाताना विघ्ने अनेक प्रकारची असल्याने त्यांच्या समोर मी अनंत शक्तीवाला आहे.' ज्ञाता-दृष्टा राहिल्यावर सर्व विघ्नांचा नाश होतो.

**प्रश्नकर्ता :** आत्मशक्ती कधी प्रकट होतात?

**दादाश्री :** स्वत: अनंत शक्तीवालाच आहे! आत्मा होऊन 'मी अनंत शक्तीवाला आहे' असे बोलला की त्या शक्ती प्रकट होऊ लागतात. 'ज्ञानी पुरुष' जो रस्ता दाखवतात, त्या रस्त्याने जाऊन मुक्त व्हायचे. नाही तर मुक्त होऊ शकू असे शक्यच नाही. म्हणून ते सांगतील त्या रस्त्याने जाऊन सुटायचे आहे.

कोणी गात असेल आणि त्याची टिंगल केली, त्याच्यावर चिडलात, किंवा असे काही केले तर ती विराधना म्हटली जाते. विराधनेचे फळ खूप वाईट येते. आणि आराधना केलीत, 'फार छान, फार छान' असे म्हणालात तर तुम्हाला पण गाता येईल.

आत्म्याच्या अपार शक्ती आहेत. कोणी जमीनीसंबंधी विचारले तर लगेच उत्तर देतो, 'इतकी एकर आहे, आकार विचारला तर सांगेल, असा असा आहे.' समोरून कोणाला येताना पाहिले तर लगेच सांगेल, 'चुलत सासरे आले आहेत!' कुठेही, कधीही, कसलाही प्रश्न विचारला तरी 'एट-ए-टाएम' सगळीकडे लक्ष असते.

आत्म्याची चैतन्य शक्ती कशामुळे झाकली गेली आहे? 'हे पाहिजे, ते पाहिजे,' त्यामुळे. लोकांना हवे होते तर त्यांचे पाहून आपणही ते ज्ञान शिकलो. याच्याशिवाय चालणारच नाही. मेथीच्या भाजीशिवाय चालणारच नाही, असे करत करत फसगत झाली! अनंत शक्तीवाला आहे, त्याच्यावर सतत दगड टाकत राहिले!

## आत्मा : अगुरु - लघु स्वभाव

आत्मा अगुरु-लघु स्वभावाचा आहे. अगुरु-लघु म्हणजे अगुरु आणि अलघु! आत्मा गुरु नाही, लघु नाही, जाड नाही, बारीक नाही, उंच नाही, ठेंगणा नाही, आत्मा अगुरु-लघु स्वभावाचा आहे. बाकी सर्व गोष्टी गुरु-लघु स्वभावाच्या आहेत. क्रोध, मान, माया, लोभ, राग, द्वेष या सर्व गोष्टी लघु-गुरु स्वभावाच्या आहेत. जेव्हा क्रोध येतो तेव्हा सुरुवातीला कमी असतो, मग वाढत-वाढत शिखरापर्यंत पोहोचतो आणि तिथून परत खाली उतरतो, नंतर संपला असेही आपल्याला कळते; याउलट आत्म्यात असे चढ-उतार होत नाहीत. राग-द्वेष पण लघु-गुरु स्वभावाचे आहेत. आत्मा आणि राग-द्वेष, यांचा एकमेकांशी काहीही संबंध नाही. आत्म्याला राग होतो, द्वेष होतो, हा तर आरोपित भाव आहे. हे व्यवहाराचे भाव आहेत. खरे म्हणजे राग-द्वेष हे फक्त पौद्गलिक आकर्षण आणि विकर्षण आहे. राग म्हणजे आकर्षण आणि द्वेष म्हणजे विकर्षण.

जे प्रेम अगुरु-लघु स्वभावाचे असते तेच परमात्म्याचे प्रेम आहे. परमात्मा अगुरु-लघु प्रेम स्वरूप आहे. जे प्रेम वाढतही नाही आणि कमीही होत नाही, तेच परमात्म्याचे प्रेम आहे. घटकेत वाढते आणि घटकेत कमी होते ते प्रेम नाही, ती तर आसक्ती आहे.

**प्रश्नकर्ता :** अगुरु-लघु स्वभाव सर्वच द्रव्यात सामान्य रूपाने असतो का?

**दादाश्री :** प्रत्येक द्रव्यात अगुरु-लघु स्वभाव हा एक सर्व सामान्य गुण आहे. पण प्रकृती, जी विकृत स्वभावाची आहे ती लघु-गुरु स्वभाववाली असते. जगात जे शुद्ध परमाणू आहेत ते अगुरु-लघु स्वभावाचे आहेत. मनुष्य जेव्हा भाव करतो तेव्हा परमाणू ओढले जातात तेव्हा त्याला प्रयोगसा म्हणतात. त्यानंतर ते मिश्रसा होतात. मिश्रसा जेव्हा फळ देऊन जातात त्यानंतर ते परत विश्रसा, म्हणजेच शुद्ध परमाणू बनतात. मिश्रसा आणि प्रयोगसा हे लघु-गुरु स्वभावाचे असतात आणि विश्रसा परमाणू अगुरु-लघु स्वभावाचे असतात.

**प्रश्नकर्ता :** अगुरु-लघु स्वभाव म्हणजे तो हानि-वृद्धी घडवून आणतो?

**दादाश्री :** नाही, अगुरु-लघु स्वभाव म्हणजे बाहेर हानि होते, वृद्धी होते, पण 'स्वत:' अगुरु-लघु स्वभावातच स्थिर असतो. प्रत्येक शुद्ध तत्त्वात अगुरु-लघु स्वभाव हा सामान्य आहे.

**प्रश्नकर्ता :** आत्म्याचा अगुरु-लघु स्वभाव म्हणजे कोणत्याही प्रदेशाला बाहेर जाऊ न देणे, असा आहे का?

**दादाश्री :** हो, त्याच्या प्रदेशाबाहेर जाऊ देत नाही, म्हणजे स्थिरता सोडत नाही.

क्रोध, मान, माया, लोभ, राग, द्वेष हे आत्म्याचे अन्वय गुण नाहीत, ते व्यतिरेक गुण आहेत. अन्वय गुण म्हणजे सहचारी गुण, कायम सोबत असणारे गुण. राग-द्वेष हे जर अन्वय गुण असते तर राग-द्वेष यांनी सिद्ध भगवंतांना पण सोडले नसते. पण हे तर व्यतिरेक गुण आहेत. व्यतिरेक गुण म्हणजे आत्म्याच्या हजेरीत पुद्‌गलात उत्पन्न होणारे गुण! ज्या प्रकारे सूर्यनारायणाच्या उपस्थितीमुळे संगमरवरी दगड दुपारी गरम होतो, तसे संगमरवरी दगड काही गरम स्वभावाचा नाही, तो तर मुळात थंड स्वभावाचाच आहे. तो सूर्यनारायणाच्या प्रभावामुळे गरम होतो.

आत्म्याला टंकोत्कीर्ण स्वभावाचा म्हटले जाते, त्याचे कारण तो अगुरु-लघु स्वभावाचा आहे.

## आत्मा : अरूपी

आत्मा अरूपी आहे. त्याने बहुरूप्याचे रूप धारण केले आहे. बाहेर जे बहुरूपी चालत आहे, त्याला तो जाणतो की मी स्वत: बहुरूपी नाही, पण बहुरूप्याचे रूप धारण केले आहे. लोक हसले की तो पण हसतो. म्हणजेच तो स्वत:च्या स्वरूपालाच जाणतो.

आत्मा अरूपी आहे. म्हणून भगवंतांनी असे म्हटले आहे की

आत्मा अरूपी आहे असे मानून तू त्याची भजना करू लागलास तर पुद्‌गलाव्यतिरिक्त अन्य तत्त्वेही अरूपी आहेत, त्यांच्यात तू अडकून पडशील. म्हणून 'ज्ञानी पुरुषां'कडून आत्मतत्त्वाला समजून घे तरच तुला मूळ आत्मा मिळेल. आत्मा फक्त अरूपीच नाही, आत्म्याचे इतरदेखील अनंत गुण आहेत. म्हणून फक्त एकच गुण धरून बसलास तर तुला आत्मा प्राप्त होणार नाही.

**प्रश्नकर्ता :** आत्मा अरूपी आहे आणि कर्मरूपी आहे. अरूपीला रूपी कर्मे कशी चिकटली?

**दादाश्री :** ही कर्मे चिकटलेली आहेत, ते तर भ्रांतीमुळे असे वाटते की 'मला चिकटली आहेत.' पण तसे नाही. समजा घरात चंदुलाल शेठ एकटेच झोपले असतील, आणि रात्री दोन वाजता स्वयंपाक घरातून खुडबुड ऐकू आली तर रात्रभर 'भूत, भूत' म्हणून त्यांची घाबरगुंडी उडते. मग सकाळ झाल्यावर दरवाजा उघडून पाहिले तर तिथे एक मोठा उंदीर खुडबुड करताना दिसतो. तुझ्या असमंजसपणामुळेच कर्मे चिकटली आहेत.

## आत्मा : टंकोत्कीर्ण स्वभाव

**प्रश्नकर्ता :** टंकोत्कीर्ण आहे असे तुम्ही म्हणता, तर टंकोत्कीर्ण म्हणजे काय?

**दादाश्री :** टंकोत्कीर्ण हा 'सायंटिफिक' (शास्त्रीय) शब्द आहे. लोक भाषेचा हा शब्द नाही, ऋषभदेव भगवंतांनी सांगितलेला हा शब्द आहे. पंडितांना समजू शकेल असा हा शब्द नाही. तरी पण संक्षिप्तपणे स्थूल भाषेत मी त्याचा अर्थ समजावून सांगतो. या *पुद्‌गलाला* आणि आत्म्याला एकत्र कितीही वेळा घुसळलेत तरी पण ते कधीही एकाकार म्हणजे 'कंपाउंड' होत नाहीत. ते दोनही कायम त्रिकाळ मिश्रण स्वरूपातच राहतात. कंपाउंड झाले तर आत्म्याचे मूळ गुणधर्म बदलून जातील, पण मिक्स्चरमध्ये बदलत नाहीत.

तेल आणि पाणी यांना कितीही 'मिक्स' केले तरी पण ते एकाकार

होत नाहीत. मूळ वस्तूच्या रूपात आत्मा आणि *पुद्‌गल* एकाकार होत नाहीत. म्हणजे आत्मा हा वस्तूच्या रूपात आहे आणि अविनाशी आहे, आत्म्याखेरीज इतरही काही वस्तू आहेत की ज्या अविनाशी आहेत. त्या सर्व वस्तू एकत्र आल्या आहेत पण त्या एकाकार झाल्या नाहीत. एकाकार होऊ पण शकत नाही. कारण प्रत्येक मूळ तत्त्व हे टंकोत्कीर्ण स्वभावाचे आहे. एक द्रव्य दुसऱ्याला काही करू शकत नाही, कारण ती सर्व टंकोत्कीर्ण स्वभावाची आहेत.

या *पुद्‌गल* तत्त्वाचा स्वभाव असा वेगळ्या प्रकारचा आहे की तो हे सगळे उत्पन्न करतो! तिथे बुद्धी चालतच नाही. आत्म्याची फक्त 'बिलीफ' (मान्यता)च बदलते. त्यात 'कल्पातून' विकल्प होतात आणि म्हणून हा देह आणि संसार उत्पन्न होतो. तरीही यात आत्मा स्वभावपरिणामीच राहतो, कधीच आपला स्वभाव चुकत नाही.

टंकोत्कीर्ण शब्द तर फार गहन आहे, त्याचा संपूर्ण अर्थ सांगण्याचे सामर्थ्य कोणालाच नाही. सगळेजण आपआपल्या भाषेत त्याचा अर्थ लावतात. 'ज्ञानी पुरुष' अंतिम भाषेत समजावतात पण अंतिम भाषेत शब्द सापडतच नाहीत. कारण 'मूळ वस्तू'पर्यंत पोहोचण्यासाठी शब्दच नसतात. आम्ही जे बोलतो ते 'संज्ञासूचक' शब्द आहेत, कारण मूळ वस्तू तर शब्दांपलीकडे आहे. आत्मा हा शब्द वापरला आहे पण तोही संज्ञासूचक आहे. नाही तर आत्मा ही वस्तूच अशी आहे की तिला नाव नाही, रूप नाही.

टंकोत्कीर्ण हा परमार्थ भाषेचा शब्द आहे आणि 'स्वानुभव' हे त्याचे प्रमाण आहे.

शुद्धचेतन टंकोत्कीर्ण स्वभावाचे आहे. पर-*पुद्‌गलात* राहूनदेखील आपल्या टंकोत्कीर्ण स्वभावामुळे शुद्धचेतन कधीही तन्मयाकार झालेले नाही, एकत्वभाव झालेला नाही, सदैव वेगळेच राहिले आहे. केवळ भ्रांतीमुळे तन्मयाकार झाले आहे असे भासते. शुद्धचेतन कोणत्याही वस्तूबरोबर मिसळू शकत नाही.

स्थूलतमपासून ते सूक्ष्मतमपर्यंतच्या सर्व पौद्गलिक पर्यायांचे शुद्धचेतन फक्त ज्ञाता-दृष्टा आहे, टंकोत्कीर्ण आहे, केवलज्ञान स्वरूप आहे.

## आत्मा : अव्याबाध स्वरूप

'मी शुद्धात्मा आहे' असे लक्ष्य बसले, तेव्हापासून अनुभव श्रेणी सुरू होते. एखादा जंतू पायाखाली चिरडला तर 'त्याला' शंका येते, नि:शंकता वाटत नाही. म्हणून तोपर्यंत 'तुम्हाला' 'चंदुलाल'कडून प्रतिक्रमण करून घ्यावे लागेल की, 'चंदुलाल, तुमच्याकडून जंतू चिरडला गेला, म्हणून प्रतिक्रमण करा.' असे करत करत सूक्ष्म भावाची अनुभव श्रेणी लाभेल आणि स्वत:चे स्वरूप अव्याबाध स्वरूप आहे असे वाटेल, दिसेल आणि अनुभवास येईल. त्यानंतर मात्र शंका होणार नाही. तोपर्यंत तो जप आत्मा, तप आत्मा, त्याग आत्मा, सत्य आत्मा, यातच असतो, शुद्धात्म्यात नसतो. याला श्रेणी म्हणत नाहीत. म्हणजेच ती व्यक्ती मोक्षात जाईल की कुठे अन्य ठिकाणी जाईल ते सांगता येत नाही. 'शुद्धात्म्याचे' लक्ष्य बसल्यानंतर श्रेणीची सुरुवात होते. त्यानंतर स्वत:चे स्वरूप अव्याबाध आहे, सूक्ष्म आहे, अमूर्त आहे असा अनुभव येऊ लागतो.

**प्रश्नकर्ता :** अव्याबाध याचा अर्थ काय?

**दादाश्री :** अव्याबाधचा अर्थ असा की माझे स्वरूप असे आहे की ते कधीही कुठल्याही जीवमात्राला किंचितदेखील दु:ख देऊ शकत नाही, आणि समोरच्याचे स्वरूप पण असे आहे की त्याला कधीही दु:ख होणार नाही; त्याचप्रमाणे आपल्यालाही समोरचा माणूस कधी दु:ख देऊ शकत नाही, असा अनुभव येतो. समोरच्याला याचा अनुभव नाही पण मला तर अनुभवास आलेले आहे, त्यामुळे माझ्याकडून दुसऱ्याला दु:ख होईल अशी शंका वाटत नाही. जोपर्यंत माझ्याकडून समोरच्या व्यक्तीला दु:ख वाटत आहे अशी थोडीशी जरी शंका वाटत असेल तर त्याचे प्रतिक्रमण करायला हवे, त्या शंकेचे निवारण करायला हवे. आणि 'आपले' स्वरूप तर तेच ते आहे; अव्याबाध! 'ज्ञानी पुरुषां'नी आपल्याला ज्या सिंहासनावर बसवले आहे, त्या सिंहासनावर बसल्या बसल्या काम करत राहायचे आहे!!

**प्रश्नकर्ता :** या वेदना कोणाला होतात? आत्म्याला?

**दादाश्री :** आत्म्याला वेदनेने कधीच स्पर्श केला नाही. आणि जर वेदनेने आत्म्याला स्पर्श केला तर त्या वेदना सुखमय होऊन जातात. आत्मा अनंत सुखांचे धाम आहे. मानलेल्या आत्म्याला वेदना होतात. मूळ आत्म्याला काहीच होत नाही. मूळ आत्मा तर अव्याबाध स्वरूप आहे! तो संपूर्णपणे बाधा-पीडा रहित आहे!! या शरीराला जर कोणी सुरीने भोसकले, कापले तर शरीराला बाधा-पीडा होते, पण आत्म्याला काहीच होत नाही.

## आत्मा : अव्यय

आत्मा अव्यय आहे. मन, वचन, आणि काया याचा निरंतर व्यय होत असतो. व्यय दोन प्रकारचा असतो : एक अपव्यय आणि दुसरा सद्व्यय. परंतु आत्मा हा तर अव्यय आहे. तो अनंत काळापासून भटकत आहे; कुत्र्यात गेला, गाढवात गेला, पण आत्म्याचा थोडादेखील व्यय झालेला नाही.

## आत्मा : निरंजन, निराकार

**प्रश्नकर्ता :** आत्म्याला, निरंजन, निराकार असे का म्हटले आहे?

**दादाश्री :** निरंजन म्हणजे त्याला कर्मे चिटकत नाहीत. निराकार म्हणजे त्याची कल्पना करता येईल असा तो नाही. त्याला आकार आहे पण तो स्वाभाविक आकार आहे. लोकांना वाटते तसा तो आकार नाही. लोक कल्पना करतात की तो गायीसारखा आहे किंवा घोड्यासारखा आहे, पण तो तसा नाही. आत्म्याचा स्वाभाविक आकार आहे, कल्पित आकार नाही. आत्मा निराकार असूनसुद्धा देहाच्या आकाराचा आहे. ज्या भागावर देहाचे आवरण आहे त्या भागात आत्मा आहे, त्याचा तसा आकार आहे.

आत्मा भाजनाप्रमाणे संकोच-विकास करतो. भाजनाप्रमाणेच प्रकाश करतो (प्रकाशमान होतो). अंतिम अवतारानंतर जेव्हा देह राहत नाही तेव्हा तो संपूर्ण लोकाला (ब्रह्मांडाला) प्रकाशमान करतो.

**प्रश्नकर्ता :** सिद्धक्षेत्रात पण आत्मा भाजनाप्रमाणेच असतो का?

**दादाश्री :** तो अंतिम देहाच्या भाजनानुसार असतो. अंतिम देह ज्या आकाराचा असतो त्याच्यापेक्षा थोडासाच कमी असतो.

**प्रश्नकर्ता :** मग आत्म्याचा आकार आहे की निराकार आहे?

**दादाश्री :** आत्मा निराकार आहे पण साकारसुद्धा आहे. 'आत्मा साकारच आहे' असे कोणी म्हणू शकत नाही. निराकार तर आहेच, पण साकारसुद्धा आहे. परंतु साकार त्याच्या भिन्न भिन्न स्वभावाचे आहे (देहाप्रमाणे आकार होतो).

**प्रश्नकर्ता :** जगात सर्व काही साकारी आहे. मग लोक निराकारी आहे असे कसे म्हणतात?

**दादाश्री :** निराकार ही गोष्ट वेगळी आहे. लोकांना निराकार म्हणजे 'व्हॅक्यूम' स्वरूप (निर्वात प्रदेश) असे वाटते. पण हे आकाशासारखे आहे. आकाश निराकारी आहे.

**प्रश्नकर्ता :** संत म्हणतात की परमात्मा निराकार आहे. ते असेही म्हणतात की श्रीरामचंद्र आणि श्रीकृष्ण होऊन गेले ते भगवंत आहेत. देह असलेले निराकार आहेत असे म्हणतात. हे आम्हाला समजत नाही.

**दादाश्री :** जो निराकार आहे तो तर परमात्मा आहे. पण निराकाराची भक्ती कशी करणार? तर ज्याच्या आत परमात्मा प्रकट झाले आहेत अशा (देहधारी) व्यक्तींची भक्ती केल्याने परमात्मा प्राप्त होतात. भगवंत हा शब्द विशेषण आहे, पण परमात्मा विशेषण नाही. परमात्म्याचे, निराकाराचे ध्यान करता येत नाही. पण देहधारी परमात्मा असतील तर त्यांचे दर्शन घेता येते, त्यांचे निदिध्यासन करता येते.

## आत्मा : अमूर्त

आत्मा अमूर्त आहे आणि मूर्तच्या आत राहिला आहे. जो मूर्त आहे, तो 'रिलेटिव्ह' आहे, आणि आत अमूर्त आहे तो 'रियल' आहे.

ज्या मूर्तीत अमूर्त प्रकट झाले आहेत त्यांना मूर्तामूर्त भगवंत म्हटले जाते. 'ज्ञानी पुरुषां'ना प्रकट परमात्मा म्हटले जाते, त्यांच्या चरणी आपले आत्यंतिक कल्याण होते.

## आत्माः परम ज्योतीस्वरूप

**प्रश्नकर्ता :** आत्म्याला कुठलेच स्वरूप नाही का?

**दादाश्री :** आत्मा ज्ञान स्वरूप आणि दर्शन स्वरूप आहे.

**प्रश्नकर्ता :** आत्मा ज्योतीस्वरूप आहे असे म्हणतात म्हणजे काय?

**दादाश्री :** ज्याला सामान्यपणे ज्योतीस्वरूप समजतात तसा ज्योतीस्वरूप तो नाही. आपण 'इलेक्ट्रिसिटी'च्या तेजाला तेज म्हणतो, तसे हे तेज नाही.

आत्मा परम ज्योतीस्वरूप आहे. स्व-पर प्रकाशक आहे. आत्म्याचे ज्ञान आणि दर्शन दोन्ही एकत्र येतात त्याला ज्योतीस्वरूप म्हणतात. ज्योतीस्वरूप म्हणजे तोच प्रकाशक आहे, याला म्हटले आहे. 'इनर-आउटर' (आतील आणि बाहेरील) सर्व वस्तूंना तो जाणतो, वस्तूंना वस्तूच्या रूपात आणि अवस्थांना अवस्थाच्या रूपात जाणतो. जेवढे जाणले तेवढे सुख उत्पन्न होते.

## आत्मा : स्व-पर प्रकाशक

**प्रश्नकर्ता :** आत्मा स्व-पर प्रकाशक आहे, तर तो स्व-प्रकाशक आणि पर-प्रकाशक कसा?

**दादाश्री :** पुद्गलाची जेवढी ज्ञेये आहेत, ती सर्व ब्रह्मांडाची ज्ञेये आहेत. त्या सर्व ज्ञेयांना प्रकाशित करणारा आत्मा आहे. स्वतः ज्ञाता आहे, दृष्टा आहे आणि ज्ञेये आणि द्रश्यांना पण प्रकाशित करू शकतो, आणि स्वतः स्वतःला पण प्रकाशित करू शकतो. इतर तत्त्वांना जाणतो आणि स्वतः ज्ञाता आणि दृष्टा पदात राहतो.

**प्रश्नकर्ता :** मग आत्मा स्वप्रकाशक कुठल्या प्रकारे?

**दादाश्री :** स्वत:च्या सर्वच गुणांना जाणतो, स्वत:च्या अनंत शक्तींना जाणतो, म्हणून स्वप्रकाशक आहे.

**प्रश्नकर्ता :** पण त्याचे भान असायला हवे ना?

**दादाश्री :** भान असल्याशिवाय तर लक्ष्य बसतच नाही ना!

**प्रश्नकर्ता :** मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार, या सर्व गोष्टी पर आहेत का?

**दादाश्री :** शुद्धात्मा सोडून साऱ्या गोष्टी पर आहेत, स्व नाहीत.

**प्रश्नकर्ता :** देहाची ज्ञेये कोणकोणती आहेत?

**दादाश्री :** ती अनेक प्रकारची आहेत. आतमध्ये अंत:करणात तऱ्हेतऱ्हेचे विचार येतात ती सर्व ज्ञेये आहेत. अपार गाठी फुटतात त्या सगळ्या आपण पाहू शकतो. कषाय होतात, अतिक्रमणे होतात, ह्या सर्व गोष्टी ज्ञेय आहेत. सर्व आवरणे दूर झाली तर संपूर्ण ब्रह्मांड प्रकाशमान करू शकेल, असे आहे. आत्मा 'इटसेल्फ' (स्वत:च) 'सायन्स' आहे. विज्ञानघन आहे.

काही लोक म्हणतात की मला ज्योती दिसते, प्रकाश दिसतो. पण तो प्रकाश ज्योतीस्वरूप नसतो. त्या ज्योतीला जो पाहतो, तो पाहणारा आत्मा आहे. तुला जे दिसते ते तर दृश्य आहे. दृष्ट्याला शोधून काढ!

## आत्मा : सूक्ष्मतम ज्योतीर्लिंग

**प्रश्नकर्ता :** ज्योतीर्लिंग असे म्हणतात, म्हणजे काय?

**दादाश्री :** आत्मा ज्योतीस्वरूप आहे. तो देहलिंग स्वरूप नाही. स्त्रीलिंग स्वरूपही नाही, पुरुषलिंग स्वरूपही नाही. जे स्थूल ज्योतीर्लिंग म्हणतात, त्याच्यापेक्षा तर लाखो मैल दूर सूक्ष्म ज्योतीर्लिंग आहे, आणि त्याहून पुढे सूक्ष्मतर आणि शेवटी सूक्ष्मतम ज्योतीर्लिंग आहे, तो आत्मा आहे.

ज्योतीस्वरूप म्हणजे जणू या लाइटचा प्रकाश, असे लोक समजतात. हे बाहेर जितकेही प्रकाश दिसतात त्यातील एकही आत्मप्रकाश नाही.

## आत्मा : प्रकाश स्वरूप

या वांद्राच्या खाडीजवळून जात असलो तर दुर्गंधी येते, पण ती दुर्गंधी मोटारीच्या प्रकाशाला थोडीच स्पर्श करते? प्रकाश तर प्रकाशस्वरूपच राहतो. आत्म्याला सुगंधही स्पर्श करत नाही आणि दुर्गंधही स्पर्श करत नाही. गंध हा पुद्‌गलाचा गुणधर्म आहे, त्याला तो स्पर्श करतो.

## आत्मा : सर्वव्यापक

**प्रश्नकर्ता :** आत्मा तर सर्वव्यापक आहे ना?

**दादाश्री :** प्रमेय प्रमाणे प्रमाता! प्रमेय म्हणजे भाजन. हा वीजेचा बल्ब जर एका माठात ठेवला तर त्याचा प्रकाश साऱ्या खोलीत पसरतो आणि खोलीच्या बाहेर ठेवला तर त्याहूनही जास्त प्रकाश पसरतो. आत्मा जेव्हा ज्ञानभावाने देहातून मुक्त होतो तेव्हा तो सर्वव्यापक पूर्ण ब्रह्मांडात व्याप्त होतो. आणि अज्ञानभावाने प्रकाशमान झाला तर ठराविक भागच प्रकाशमान होतो.

## आत्मा : एक स्वभावी

**प्रश्नकर्ता :** आत्मा तर सगळ्यांचा एकच आहे की वेगळा वेगळा आहे?

**दादाश्री :** श्रीरामचंद्र मोक्षात गेले तिथे त्यांचा आत्मा आहे की नाही?

**प्रश्नकर्ता :** हो आहे. इथे ठेवून तर जाणार नाहीत ना!

**दादाश्री :** बरोबर... आता प्रभु रामचंद्र मोक्षाचे सुख उपभोगत आहेत आणि इथे शेकडो लोक असह्य वेदना भोगत आहेत. आत्मा जर एकच असता तर एकाला सुख लाभले तर सगळ्यांना सुख लाभायला हवे, एक जण मोक्षाला गेला तर सगळेच मोक्षाला जायला पाहिजेत. म्हणजेच आत्मा एक नाही, पण एका स्वभावाचा मात्र आहे. समजा

इथे शुद्ध सोन्याचे 1 लाख शिक्के असतील, मोजले तर एक लाख भरतील पण शेवटी आपण त्या सगळ्यांना काय म्हणणार?

**प्रश्नकर्ता :** सोने.

**दादाश्री :** त्याच प्रकारे आत्म्याची गणना केली तर ते सर्व वेगवेगळे मोजता येतील, पण शेवटी हे चैतन्य तोच परमात्मा आहे. देहरहित स्थितीला परमात्मा म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे आत्म्यातूनच परमात्मा होतो, असे आहे का?

**दादाश्री :** आत्मा हाच परमात्मा आहे, फक्त त्याला त्याचे भान व्हायला हवे. 'मी परमात्मा आहे' असे भान तुम्हाला एक मिनिट जरी झाले तरी 'तुम्ही' 'परमात्मा' होऊ लागाल.

## आत्मा : स्वभावाचा कर्ता

'ज्ञानी पुरुषां'नी ज्ञानात काय पाहिले? त्यांनी असे काय पाहिले की त्यांनी आत्म्याला अकर्ता म्हटले? तर मग कर्ता कोण आहे? हे जग कशा प्रकारे चालू आहे, या क्रिया कशा प्रकारे घडत आहेत, ते त्यांनी ज्ञानात पाहिले तेव्हापासून ते सटीक झाले आहे की, संसाराचा कर्ता आत्मा नाही, आत्मा तर स्वतःच्या ज्ञानाचा कर्ता आहे, स्वाभाविक आणि विभाविक ज्ञानाचा कर्ता आहे. तो प्रकाशाचाच कर्ता आहे, याच्याबाहेर तो कधीच गेलेला नाही.

क्रियेचा कर्ता आत्मा नाही. आत्मा फक्त ज्ञानक्रिया आणि दर्शनक्रिया यांचाच कर्ता आहे. इतर कुठल्याही जागी त्याची सक्रियता नाही. फक्त आत्म्याच्या उपस्थितीमुळे इतर सर्व तत्त्वात सक्रियता उत्पन्न होते.

## आत्मा : चैतन्यघन स्वरूप

**प्रश्नकर्ता :** आत्मा चैतन्यघन स्वरूप आहे, असे म्हणतो आणि शिवाय आत्मा आकाशाप्रमाणे सूक्ष्म आहे असेही म्हणतो. तर याचा मेळ कसा घालावा?

**दादाश्री :** आकाश तत्त्व प्रत्येक ठिकाणी विद्यमान आहे. या शरीरात आणि हिऱ्यांतदेखील आकाश तत्त्व आहे, परंतु हिऱ्यात आकाशतत्त्व खूपच कमी आहे, म्हणून तो लवकर तुटत नाही. जितके आकाशतत्त्व कमी तितकी ती वस्तू अधिक सघन. आत्मा आकाशासारखा आहे याचा अर्थ तो संपूर्ण शरीरात आकाशाप्रमाणे सर्व जागी राहू शकतो. आणि शिवाय आकाशाप्रमाणे सूक्ष्म आहे, त्यामुळे डोळ्यांनी दिसत नाही पण त्याचा अनुभव घेता येतो.

**प्रश्नकर्ता :** आत्म्यात आकाश असते की नाही?

**दादाश्री :** नाही, आत्म्यात आकाश नसते आकाशासारखा म्हणजे सगळीकडे पसरू शकतो असा आहे.

चैतन्याचा अर्थ काय? ज्ञान-दर्शन यांना एकत्र केले की त्याला चैतन्य म्हणतात. इतर कोणत्याही वस्तूत चैतन्य नाही. केवळ आत्म्यातच अनंत ज्ञान आणि अनंत दर्शन आहे, म्हणून त्याला चैतन्यघन म्हटले आहे.

## आत्मा : अनंत प्रदेश

आत्म्याचे अनंत प्रदेश आहेत आणि एका एका प्रदेशात अनंत अनंत ज्ञायक शक्ती आहे. पण ज्ञेयाला ज्ञायक मानले जाते आणि त्यामुळे आत्म्याच्या प्रदेशावर कर्मकलंक लागतो. त्यामुळे स्वत:च्या अनंत शक्तींवर आवरणे पडतात. या माठात वीजेचा बल्ब ठेवला असेल आणि त्या माठाचे तोंड झाकून ठेवले तर त्या बल्बचा प्रकाश बाहेर दिसणार नाही. पिंपळाच्या झाडाच्या सालीवर जर लाख गोळा झाली तर झाडाची साल दिसत नाही, तसे आहे हे. या एकेंद्रिय जीवांना एका इंद्रियांपुरतेच छिद्र पडते, त्यामुळे त्यातून तेवढाच प्रकाश बाहेर पडतो. दोन इंद्रिय जीवांना दोन, तीन इंद्रिय जीवांना तीन आणि चार इंद्रिय जीवांना चार, एवढाच प्रकाश बाहेर पडतो. पाच इंद्रिये आणि त्यातही मनुष्याचा सर्वात अंतिम प्रकारचा विकास आहे, म्हणून तिथे सर्व प्रदेश मोकळे होऊ शकतात. सर्व जीवमात्रांना नाभिप्रदेशाच्या मध्यभागी आत्म्याचे आठ प्रदेश अनावृत्तच (खुलेच) असतात. ज्यामुळे हा जगत्-व्यवहार, ओळखी-पाळखी वगैरे

होतात. यामुळे कोणताही जीव गोंधळत नाही. ह्या आठ प्रदेशांवर जर आवरण पडले तर कोणीच कोणाला ओळखू शकणार नाही, आणि घरी पण परत येऊ शकणार नाही. पण पाहा ना, या 'व्यवस्थित शक्तीची' व्यवस्था किती सुंदर आहे! आवरणांची पण मर्यादा ठेवली आहे ना? मनुष्यात देखील वकीलामध्ये छिद्र पडलेले असते त्या आधारे त्याचे त्या लाइनीचे दर्शन खुले होते. केमिस्टमध्ये पण त्या दिशेचे छिद्र खुले झालेले असते. एका छोट्या मुंगीत पण खुले झालेले असते.

ज्ञानावरण आणि दर्शनावरण अशा आवरणांमुळे आत्म्याचा प्रकाश रोखलेला असतो. 'ज्ञानी पुरुषां'ची तर सगळी आवरणे तुटलेली असतात, म्हणूनच परमात्मा पूर्णपणे प्रकाशमान झाले आहेत! संपूर्ण निरावरण झाले तर स्वत:च परमात्मा आहे. सिद्ध भगवंतांचे सर्वच्या सर्व प्रदेश निरावरण झालेले असतात. त्यामुळे प्रत्येक प्रदेशात स्वत:चे अनंत ज्ञान, अनंत दर्शन आणि अनंत सुख असते! पण कुठे गेले ते सुख? 'स्वरूपज्ञान' मिळाल्यानंतर जसजसे आत्मप्रदेश निरावरण होत जातात तसतसा आनंद वाढत जातो.

एका आत्म्यात अनंत शक्ती आहेत. अनंत जीव आहेत. प्रत्येक जीव वेगवेगळ्या प्रकृती स्वभावाचा आहे. प्रत्येक जीवात वेगवेगळी शक्ती बाहेर निघाली आहे, तेवढी सर्व शक्ती एका आत्म्यात आहे. ज्या जीवात जी शक्ती प्रकट झाली आहे, त्या शक्तीचा उपयोग करून तो आपला उदरनिर्वाह करतो.

आत्मा अनंत प्रदेशात्मक आहे. आत्मा एकच आहे, त्याचे वेगवेगळे भाग आहेत असे नाही. पण तरी तो अनंत प्रदेशवाला आहे. त्याच्या एकेका प्रदेशावर एक एक परमाणू चिकटला आहे. जसे शेंगदाण्याला साखरेच्या पाकात हलवून हलवून हलव्याचे दाणे बनवतात ना? त्याच प्रकारे ही प्रकृती रात्रंदिवस सतत हलतच असते. तर यातसुद्धा ज्या भागावर साखर चिकटली त्या भागावर आवरण आले आणि जेवढा भाग मोकळा राहिला तेवढा (निरावरण) राहिला. सर्व काही नियमाप्रमाणेच होत असते. जिथे जिथे आवरण तुटलेले असते तिथून त्याची शक्ती

प्रकट होते. कोणाचे वाणीचे आवरण तुटलेले असते, कोणाचे बुद्धीचे आवरण तुटलेले असते तर तो वकिलीच करत असतो. आता या वकिलाला जर सांगितले, अहो साहेब, जरा एवढे शेत नांगरून द्या ना, तर तो नाही म्हणेल. कारण त्याचे ते आवरण तुटलेले नसते.

पण हे सर्व नियमबद्धच असते. असे कधीच होत नाही की सगळ्यांचे सुतारकामाचे आवरण तुटते. नाही तर सगळेच सुतार झाले असते, मग किती गोंधळ झाला असता? सगळ्यांचे शिल्पकलेचे आवरण तुटले तर सगळे जण शिल्पकारच होतील, मग शिल्पी कोणाकडे काम करणार? सगळेच 'वोरियर्स' (सैनिक) झाले असते तर? म्हणजे सगळे 'व्यवस्थित शक्ती'नुसार व्यवस्थित प्रकारे निर्माण होतात. डॉक्टर, वकील, इंजिनियर असे सगळे बनतात म्हणून प्रत्येकाचे काम चालू शकते. सगळेच जण जर पुरुष झाले तर काय होईल? स्त्रिया कुठून आणायच्या? लग्ने कोण करतील?

कोणत्याही प्रदेशात असलेल्या पुद्गल परमाणूला 'माझा' असे मानले जाणार नाही तेव्हा स्वत:चे संपूर्ण सुख वर्तेल (अनुभवास येईल).

संपूर्ण ब्रह्मांडाला प्रकाशित करण्याची शक्ती आत्म्यात आहे. त्याची स्वत:ची साऱ्या ब्रह्मांडाला प्रकाशित करण्याची जी स्वसंवेदन शक्ती आहे, तिलाच केवलज्ञान म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** स्वत:चे गुणधर्म, अनंत ज्ञान, अनंत दर्शन यांचे ध्यान केले तर ते गुण प्राप्त होतील?

**दादाश्री :** हो, निश्चितच होतील. आत्म्याचे जेवढे गुण जाणले असतील, तितक्या गुणांचे ध्यान केले तर आत्म्याचे तेवढे-तेवढे प्रदेश निरावरण होत जातील, तसतसे ज्ञान प्रकाशित होत जाईल आणि तसातसा आनंद वाढत जाईल.

महावीर भगवंतांना तीन वस्तूंचे ज्ञान होते :

(1) ते एका परमाणूला पाहू शकत.

(2) ते एका समयाला पाहू शकत.

(3) ते एका प्रदेशाला पाहू शकत.

असे तर हे वीतरागींचे विज्ञान आहे!

## आत्मा : वेदक? निर्वेदक?

**प्रश्नकर्ता :** जेव्हा दाढ दुखते तेव्हा आपण म्हणतो, 'दाढ माझी नाही.' पण तरी लक्ष तिकडेच जाते, ते का?

**दादाश्री :** 'माझी दाढ दुखत आहे,' असे बोलण्याने त्याच्यावर जबरदस्त परिणाम होतो. दु:ख एकशे पंचवीस टक्के होऊन जाते, आणि दुसरी व्यक्ती दाढ दुखत असताना देखील गप्प राहते, तिला शंभर टक्के दु:ख होते. आणि तिसरी एखादी व्यक्ती अहंकाराने बोलते की, अशी दाढ तर बरेचदा दुखत असते, त्यात काय. तर दु:ख पन्नास टक्के होऊन जाते.

वेदनेचा स्वभाव कसा आहे? जर तिला परकी आहे असे जाणले तर तो त्या वेदनेला जाणत राहतो, पण वेदत नाही. पण 'हे मला झाले आहे' असे वाटले तर मात्र तो वेदेल. आणि 'हे सहनच होत नाही' असे म्हटले तर ते दु:ख दहापट वाढेल. जर एक पाय दुखत असेल तर दुसऱ्या पायाला पण म्हणावे, तू पण दुख!

'ज्ञानींना' अहंकार नसतो, म्हणून ते दु:ख भोगत नाहीत. जोपर्यंत आत्म्याचे अस्पष्ट वेदन आहे तोपर्यंत दु:ख वेदतो, म्हणजे दाढ दुखत असताना ज्ञाता-दृष्टा पदात राहण्याचा प्रयत्न करतो; याउलट 'ज्ञानी पुरुषां'ना आत्म्याचे स्पष्ट वेदन असते म्हणून ते त्या दु:खाला वेदत नाहीत, पण फक्त जाणतात. 'स्वरूप-ज्ञान' असलेल्यांची दाढ दुखत असेल तर ते दु:ख भोगत नाहीत, पण त्यांना त्याचा भार जाणवत राहतो, त्यामुळे त्यांचे स्वत:चे सुख थांबते; याउलट आमचे (ज्ञानी पुरुषांचे) सुख थांबत नाही, येतच राहाते. लोकांना वाटते की 'दादां'ना *अशाता* वेदनीय आहे पण आमच्यावर वेदनीयचा परिणाम होत नाही! पण तरी व्यवहारात वेदनीय मानले जाते.

**प्रश्नकर्ता :** ही *शाता-अशाता* वेदनीय आत्म्याला होत नाही का?

**दादाश्री :** नाही, आत्म्याला वेदन होतच नाही. आत्म्याला जर *अशाता*चे वेदन झाले तर तो आत्माच नाही. आत्मा स्वत: अनंत सुखाचा धनी आहे! बर्फावर जर निखारे ठेवले तर बर्फ भाजेल का?

**प्रश्नकर्ता :** निखारे विझतील.

**दादाश्री :** हे तर स्थूल उदाहरण आहे, एक्जेक्ट नाही. आत्मा तर अनंत सुखाचा धनी आहे, त्याला दु:खाचा स्पर्शच कसा होईल? त्याचा फक्त स्पर्श झाला तरी सुख वाटते.

**प्रश्नकर्ता :** मग हे वेदन कोण भोगतो?

**दादाश्री :** आत्म्याला काहीच भोगायचे नसते, शरीर देखील भोगत नाही. फक्त अहंकारच करतो की, 'मला *अशाता* होत आहे.' खरे तर, अहंकार स्वत: पण भोगत नाही. तो फक्त अहंकार करतो की, 'मी भोगले.' आत्म्याने कधीच कुठलाही विषय भोगला नाही, फक्त अहंकार करतो इतकेच. 'रॉंग बिलीफ'मुळे कर्तेपणाचा अहम् निर्माण होतो. 'मी हे केले' या मान्यतेच्या फळ स्वरूप *शाता-अशाता* वेदतो.

अज्ञानी *अशाता* वेदनीय *कल्पांत* (खूप आक्रांत) करत वेदतो, 'ज्ञानी' ज्ञानात राहून त्याचा निकाल करतात, त्यामुळे नवीन कर्मे बांधली जात नाहीत. अज्ञानी कर्मे बांधतो. तो डॉक्टरावर राग (आसक्ती, मोह) करतो किंवा कोणाचा तरी द्वेष करतो, राग-द्वेष करतच राहतो. राग-द्वेष होत नाहीत ही आत्मज्ञानाची निशाणी आहे.

सर्व जग जिथे स्वत:ला 'चांगले' वाटते तिथे तन्मयाकार होते, तद्रूपच होऊन जाते. आणि स्वरूप ज्ञानानंतर मात्र तन्मयाकार होत नाही.

**प्रश्नकर्ता :** निर्वेद म्हणजे काय?

**दादाश्री :** निर्वेद म्हणजे मन, वचन, काया या तीनही 'इफेक्टिव' असूनसुद्धा स्वत: 'अन्इफेक्टिव' राहतो, वेदना होत नाहीत. (स्वत:वर त्याचा काहीच परिणाम होत नाही.) सिद्ध भगवंतांना निर्वेद म्हणता

येणार नाही. कारण त्यांना मन, वचन, काया नसतात. वेदनेच्या आधारेच निर्वेद आहे. हे द्वंद्व आहे. फक्त वेद असे बोलले जात नाही.

जाणण्याच्या बाबतीत आत्मा वेदक आहे आणि सहन करण्याच्या बाबतीत आत्मा निर्वेदक आहे.

आत्मा तर परमात्मा स्वरूपी आहे. त्याच्यावर देखील या शरीराचा परिणाम होतो. त्या परिणामाला 'पाहत' राहिलो की आपण मुक्त झालो!

## आत्मा : शुद्ध उपयोग

या देहाबरोबर जो आत्मा (व्यवहार आत्मा) आहे, त्या आत्म्याचा उपयोग असला पाहिजे. माणसे चार प्रकाराने उपयोग करत आहेत. ही जनावरे आत्म्याचा उपयोग करीत नाहीत. उपयोग फक्त अहंकारींनाच असतो. जनावरे तर सहजभावात असतात. ह्या गायी म्हशींना सहजभावाने कळते की हे खाण्यायोग्य आहे आणि हे खाण्यायोग्य नाही.

आत्म्याचे चार उपयोग आहेत. अशुद्ध उपयोग, अशुभ उपयोग, शुभ उपयोग आणि शुद्ध उपयोग.

**प्रश्नकर्ता :** आत्म्याचे उपयोग, म्हणजे ते 'शुद्धात्म्या'चे आहेत की 'प्रतिष्ठित आत्म्याचे' आहेत?

**दादाश्री :** पहिले तीन उपयोग प्रतिष्ठित आत्म्याचे आहेत आणि चौथा शुद्ध उपयोग तो शुद्धात्म्याचा आहे, आणि खरे म्हणजे तो देखील प्रज्ञेचा आहे.

या उपयोगात मूळ आत्मा स्वत: काहीच करत नाही.

अशुद्ध उपयोग म्हणजे माणसाला मारून टाकणे, माणसाचे मांस खाणे. याचे फळ नरकगती.

अशुभ उपयोग म्हणजे कपट करणे. भेसळ करणे, स्वार्थासाठी खोटे बोलणे, क्रोध, मान, माया, लोभ करणे, हा सगळा अशुभ उपयोग. याचे फळ तिर्यंच गती, जनावरगती.

शुभ उपयोग म्हणजे मनाची शक्ती, वाणीची, देहाची, अंतःकरणाची या सर्व शक्तींचा उपयोग दुसऱ्यांसाठी करणे! जो संपूर्ण शुभ उपयोगात राहत असेल तो देवगती प्राप्त करतो, आणि शुभाशुभ उपयोग असलेला मनुष्यगतीत येतो.

'शुद्ध उपयोग' म्हणजे 'मी शुद्धात्मा आहे, आणि हे मी करत नाही पण अन्य कोणी तरी करीत आहे' असे भान येणे, स्वतः शुद्धमध्ये राहतो आणि समोरच्यालाही शुद्धात्मा स्वरूपात पाहतो. कोणी शिव्या दिल्या, कोणी खिसा कापला तरी तो त्याच्या शुद्धात्म्यालाच पाहतो, ते म्हणजे शुद्ध उपयोग! यात सर्व जग निर्दोष दिसते. जेव्हापासून 'मी शुद्धात्मा आहे' असे लक्ष्य बसते तेव्हापासूनच शुद्ध उपयोगाची सुरुवात होते. आणि संपूर्ण शुद्ध उपयोग म्हणजेच केवलज्ञान.

शुद्ध उपयोगाखेरीज दुसरा कोणताही पुरुषार्थ नाही. शुद्ध उपयोग चुकणे यालाच प्रमाद म्हटले गेले आहे. क्षणभर देखील बेसावध राहता कामा नये. समोरून ट्रेन आली तर तुम्ही बेसावध राहता का? मग ही तर अनंत जन्मांची भटकंती चालू आहे, मग इथे बेसावध कसे राहू शकतो?

**प्रश्नकर्ता :** उपयोग म्हणजे नेमके कशाला म्हणतात?

**दादाश्री :** तुम्ही पैसे मोजता, शंभरा शंभाराच्या नोटा मोजता, तेव्हा तुमचा कसा उपयोग असतो? त्यावेळी उपयोग चुकता का? मी तर कधीच रुपये मोजण्यात उपयोग देत नाही. यात उपयोग देऊन कसे परवडेल? यात तर माझा महामौल्यवान उपयोग बिघडेल. उपयोग वाया जात आहे हे कोणाला कळतच नाही. आत्म्याचा उपयोग पूर्णपणे उलटाच वापरला जात आहे. जिथे उपयोग देण्याची गरज नाही, जिथे उपयोग दिला नाही तर चालेल असे आहे तिथे उपयोग देतो आणि जिथे उपयोग देण्याची आवश्यकता आहे तिथे त्याला त्याची माहितीच नाही.

झोप चांगली लागली की नाही, यासाठी उपयोग दिला तर काय होईल? झोप येणारच नाही. ही ट्रेन चालत असेल आणि जर एखादा माणूस ट्रेनच्या डब्यात घाई करत असेल, धावपळ करत असेल, तर

काय तो लवकर पोहोचेल? याच प्रकारे लोक संसारात धावपळ करत असतात! जरा शांत व्हा ना! स्थिरतेने पाहा तरी!

**प्रश्नकर्ता :** स्थिर करणे, यालाच उपयोग म्हणतात का?

**दादाश्री :** होय, तुम्ही माझ्याबरोबर बोलत असताना तुमचे चित्त इतर ठिकाणी असेल तर त्याला उपयोग म्हणत नाही. शेठजीचे शरीर इथे जेवत असेल आणि ते स्वत: गेलेले असतात गिरणीत, म्हणजे चित्त ठिकाणावर नसते! उपयोग ठेवल्याशिवायच खातात, म्हणून तर लोकांना हार्टफेइल आणि ब्लड प्रेशर असे आजार होतात!

**प्रश्नकर्ता :** उपयोगपूर्वक जेवणे म्हणजे नक्की कसे?

**दादाश्री :** घास तोंडात ठेवल्यानंतर त्याची चव जाणणे. मेथीचा, मिरचीचा, मिठाचा, मिऱ्याचा, अशा त्यातल्या सगळ्या घटकांची चव जाणणे, यास उपयोगपूर्वक जेवले असे म्हणतात.

लोभ्याला लोभाचा उपयोग राहतो, मानीला मानाचा उपयोग राहतो. या दोन प्रकारचे मोठे उपयोग संसारी लोकांना राहतात. मानी माणूस जर लग्नसमारंभात गेला आणि यजमान जर घाईगडबडीत हात जोडून नमस्कार करायचा विसरला, तर तो हिरमुसतो. आणि मी याला असे करीन, तसे करीन असे बोलायला लागतो. त्यामुळे आत अत्यंत अशुभ उपयोग होतो. लोभी माणूस भाजी घ्यायला गेला तर त्याचा उपयोग स्वस्त भाजी कुठे आहे हे शोधण्यातच असतो, तो सडकी भाजीच घेऊन येतो!

विषयविकारात उपयोग कपट करण्याकडेच असतो.

अज्ञानदशेत सुद्धा मनुष्य आत्म्याचा शुभ उपयोग करू शकतो. एखादी चूक झाली तर शास्त्रांचा आधार घेऊन 'असे करता कामा नये' असे म्हटले तर त्याला आत्म्याचा उपयोग म्हणता येईल. देवळात किंवा जैन मंदिरात जाणे, शास्त्र वाचणे, या सगळ्याला शुभ उपयोग म्हणतात.

प्रत्यक्ष 'ज्ञानी पुरुषां'च्या आज्ञेचे पालन करणे, याला 'शुद्ध उपयोग' असे म्हणतात. जिथे शुद्ध उपयोग असतो तिथे अविरति बरोबर *संवरपूर्वक*

*निर्जरा* (नवीन कर्मबीज न पडता जुनी कर्मफळे पूर्ण होणे) होत राहते. तुम्ही जर शुद्ध उपयोगात असाल तर समोरची व्यक्ती कुठल्याही उपयोगात असो, त्याचा तुमच्यावर अजिबात परिणाम होणार नाही.

'ज्ञानी पुरुष' निरंतर शुद्ध उपयोगात असतात. 'ज्ञानी' निर्ग्रंथ असतात. त्यामुळे क्षणभर देखील त्यांचा शुद्ध उपयोग कशातही अडकत नाही. मनाची एखादी गाठ फुटली तर तो पंधरा वीस मिनिटे, अर्धा तास त्याच वस्तूबरोबर रममाण होतो; 'ज्ञानी' क्षणभर देखील कशातही अडकून राहत नाहीत, म्हणून त्यांचा उपयोग निरंतर फिरतच राहतो. त्यांचा उपयोग बाहेर जात नाही. 'ज्ञानी' गृहस्थदशेत असले तरी ते 'गृहस्थ' नसतात. निरंतर वीतरागता हेच त्यांचे लक्षण! आम्हाला उपयोगावर उपयोग राहतो.

**प्रश्नकर्ता :** आम्ही तुमच्याबरोबर प्रश्नोत्तरी करतो तेव्हा तुम्ही कशात असता?

**दादाश्री :** आम्ही त्याचे ज्ञाता-दृष्टा असतो, तोच आमचा उपयोग. हे जे शब्द बोलले जातात ती रेकॉर्ड बोलत असते. त्याच्याशी आमचे काहीच देणेघेणे नाही. त्यावर आमचा उपयोग असतो म्हणून आम्हाला लगेच समजते की कुठे चूक झाली आहे आणि कुठे उपयोग राखला गेला नाही. ही 'रेकॉर्ड' ऐकलीत तर तुम्हाला कसे स्पष्ट समजते की इथे 'करेक्ट' (बरोबर) आहे आणि इथे चूक आहे?! तसेच आमच्या वाणीची 'रेकॉर्ड' वाजत असते तेव्हा आम्हाला समजत राहते.

पाचही इंद्रियांचा ॲट-ए-टाइम (एकाच वेळी) उपयोग राखणे, तोच शुद्ध उपयोग.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही ज्ञाता-दृष्टा राहता, त्यावेळी स्व-उपयोग राहिला नाही असेच म्हणायचे ना?

**दादाश्री :** ज्ञाता-दृष्टा राहणे हाच स्व-उपयोग आणि पर उपयोग कशाला म्हणतात? तर 'मी चंदुलाल आहे, मी अमुक आहे, मी ज्ञानी आहे' याला पर-उपयोग म्हणतात.

मनात तन्मयाकार परिणाम नसतात, वाणीत तन्मयाकार परिणाम

नसतात आणि वर्तनात तन्मयाकार परिणाम नसतात, यालाच शुद्ध उपयोग असे म्हणतात.

## उपयोगात उपयोग, म्हणजेच केवलज्ञान

**प्रश्नकर्ता :** तुम्ही म्हणता, आम्हाला उपयोगात उपयोग राहतो, याचा अर्थ दोन उपयोग झाले. मग कोणता उपयोग कोणत्या उपयोगात राहतो?

**दादाश्री :** पहिला उपयोग म्हणजे जो शुद्ध उपयोग आहे तो. तो उपयोग म्हणजे स्वत:ला शुद्ध पाहणे, इतरांना पण शुद्ध पाहणे, आज्ञेत राहणे, हा सगळा शुद्ध उपयोग म्हटला जातो. आणि त्या शुद्ध उपयोगावर देखील उपयोग राखणे की शुद्ध उपयोग कसा राहत आहे, याला केवलज्ञान म्हणतात. आणि पहिल्या उपयोगाला शुद्ध उपयोग म्हणतात. उपयोग उपयोगात म्हणजेच केवलज्ञान आहे.

**प्रश्नकर्ता :** त्या उपयोगाला ज्ञान स्वरूप म्हणतात का?

**दादाश्री :** शुद्ध उपयोगाला ज्ञान स्वरूप म्हणतात आणि उपयोग उपयोगात (असणे) याला विज्ञान स्वरूप म्हणतात, केवलज्ञान स्वरूप म्हणतात. शुद्ध उपयोगाची जी जागृती आहे, त्यावरदेखील जी जागृती आहे ती म्हणजे केवलज्ञानाची जागृती, अंतिम जागृती. 'ज्ञानीं'च्या जागृतीला शुद्ध उपयोग म्हणतात, आणि त्या जागृतीवरील जागृतीला, केवलज्ञानाचा उपयोग असे म्हणतात. आम्हाला जागृतीवर जागृती राहते, पण जेवढी तीर्थंकरांना असते तेवढी जागृती राहू शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** ज्यावेळी अंत:करणाच्या क्रियेत उपयोग राहतो, ज्ञेय-ज्ञाता असा संबंध राहतो, त्यावेळी स्वत: ज्ञाता आणि अंत:करण ज्ञेय स्वरूपात असते, त्यातही परत केवलज्ञानात उपयोग राहतो का?

**दादाश्री :** ह्या ज्ञेय-ज्ञाता संबंधाच्या उपयोगाला केवल ज्ञानवाला उपयोग 'जाणतो' की उपयोग किती कच्चा राहिला, किती पक्का राहिला. तीर्थंकरांना ज्ञेय-ज्ञाता यावर पण उपयोग राहतो, संपूर्ण 'केवल' असतो.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे केवलज्ञानात ज्ञेयापासूनसुद्धा वेगळा झाला आहे, असे म्हणू शकतो का?

**दादाश्री :** केवलज्ञानात ज्ञेयापासून वेगळाच असतो. पण ज्ञेय-ज्ञाता संबंधामध्ये ज्ञेयांपासून वेगळा होत नाही, तर त्याचा (ज्ञेयाशी) संबंध राहतो, आणि त्या संबंधांना तो जाणतो की असा संबंध आहे.

जेव्हा उपयोग उपयोगात राहतो तेव्हा जागृती जागृतीतच राहते, बाहेर ओढली जात नाही. बाहेर जे काही दिसते ते सहज रूपात दिसते.

सर्व जग भगवत् स्वरूप असे समजता आले तर त्याला शुद्ध उपयोग म्हणतात.

## आत्मा : केवलज्ञान स्वरूप

स्वत:, स्वत:ची संपूर्ण ब्रह्मांडाला प्रकाशित करण्याची जी स्वसंवेदनशक्ती आहे ते केवलज्ञान आहे. केवल आत्म-प्रवर्तन त्यालाच केवलज्ञान म्हणतात. ज्ञानक्रिया आणि दर्शनक्रिया याशिवाय दुसरे कोणतेही प्रवर्तन नसणे यालाच केवलज्ञान म्हणतात. अनंत प्रकारांच्या अनंत पर्यायात स्वत:च्या ज्ञानाखेरीज दुसरे काहीही नसणे, म्हणजेच केवलज्ञान होय.

ज्याने आत्मज्ञान जाणले, त्याला केवलज्ञान फार दूर नाही. आत्मज्ञान जाणले ते कारण केवलज्ञान आहे आणि ते कार्य केवलज्ञान आहे. म्हणून तर आम्ही म्हणतो, 'आत्मज्ञान जाणा.'

केवलज्ञान प्राप्त केले की मग आणखी काहीच जाणण्याचे शिल्लक राहत नाही! केवलज्ञान म्हणजे 'ॲबसोल्यूट'! केवळ स्वत:च्या सत्तेलाच जाणतो! आत्मा हा देहस्वरूप नाही, वाणी स्वरूप किंवा विचार स्वरूप नाही. आत्मा तर केवलज्ञान स्वरूप आहे! मोक्ष दूर नाही, मोक्ष स्वत: जवळच आहे. ही काटेरी झुडपे बिलगली आहेत म्हणून अनुभवात येत नाही. मोक्ष म्हणजेच संसाराचा स्पर्श होत नाही, कषाय होत नाहीत. श्रद्धेने केवलज्ञान झाले असेल तर सदेह मोक्ष आहे, आणि केवलज्ञान झाल्यावर मोक्ष होतो. श्रद्धेने केवलज्ञान म्हणजे केवलदर्शन.

**प्रश्नकर्ता :** केवलज्ञानाबद्दल सविस्तर समजावून सांगा.

**दादाश्री :** आत्मा स्वत:च केवलज्ञान स्वरूप आहे. हा जो देह आहे तो स्थूल स्वरूपाचा आहे. आतमध्ये अंत:करण वगैरे सर्व सूक्ष्म स्वरूप पण आहेत आणि आत्मा पण आहे. आत्मा तर केवलज्ञान स्वरूप म्हणजेच प्रकाश स्वरूपच आहे, प्रकाशमयच आहे. दुसरे काहीच नाही. जसेजसे परमाणू वाढत गेले आणि आपण 'मी माणूस आहे, मी असा आहे, तसा आहे' अशा मान्यता करू लागलो, तसेतसे आपण अज्ञानाच्या रस्त्याने पुढेपुढे गेलो. समकित झाल्यावर केवलज्ञानाच्या दिशेने जायचे आहे. मग हळूहळू जशीजशी ओझी कमीकमी होत जातात, संसाराच्या भानगडी सुटत जातात, तसातसा आनंद वाढू लागतो. हळूहळू स्वत: परमात्मा होतो.

केवल म्हणजे ॲबसोल्यूट, ज्यात दुसरे काहीही मिसळलेले नाही ते ॲबसोल्यूट ज्ञान.

आता जर कोणी जर्मनीवाल्यांनी विचारले की जगात 'थियरी ऑफ ॲबसोल्यूटिझम' आहे का कुठे? तर आम्ही सांगू की हे 'दादा' आहेत जे फक्त 'थियरी ऑफ ॲबसोल्यूटिझम'च नाही, तर 'ॲबसोल्यूटिझम'च्या 'थियरम' मध्ये बसलेले आहेत! तुम्हाला हवे ते विचारा. हे 'अक्रम विज्ञान' म्हणजेच 'थियरी ऑफ ॲबसोल्यूटिझम' आहे.

ज्ञानाचा स्वभावच असा आहे की ते स्वत: तद्-रूपाकार राहते. तेव्हा ते दर्शनाच्या स्वरूपात, प्रकाशाच्या स्वरूपात राहते आणि आनंदाच्या स्वरूपात राहत असते.

आतमध्ये केवलज्ञान सत्तेत आहे, पण आज ते उपयोगात येत नाही. ह्या सत्संगाने आम्ही त्याला व्यक्त करत आहोत. एक दिवस जेव्हा संपूर्ण निरावरण होईल तेव्हा संपूर्ण व्यक्त होईल! मग माझ्याप्रमाणेच तुमचा पण आनंद कधी जाणार नाही. तुम्ही जरी म्हटलात जा इथून, निघून जा, तरी तो जाणार नाही.

**प्रश्नकर्ता :** 'ॲबसोल्यूट नॉलेज' याची व्याख्या देऊ शकाल?

**दादाश्री :** आंबा गोड लागतो हे ज्ञान आहे ना? की अज्ञान आहे?

**प्रश्नकर्ता :** ज्ञान आहे.

**दादाश्री :** हे ज्ञान आहे, पण त्या ज्ञानाने तोंड गोड होईल का? म्हणजेच ज्या ज्ञानाने तोंड गोड होत नाही त्याला 'ॲबसोल्यूट' म्हणता येणार नाही. ज्या ज्ञानाने सतत सुखच वाटत राहील त्यालाच 'ॲबसोल्यूट' म्हणतात. जेव्हा 'मी शुद्धात्मा आहे' हे ज्ञान 'ॲबसोल्यूट' होईल तेव्हा बाहेरचे पाश सुटून जातील, सर्व अंतराय तुटून पडतील आणि मग सदैव स्वत:चे परमानंद स्वरूप राहील.

'ॲबसोल्यूट' सोडून इतर जे काही ज्ञान आहे ते आनंद देत नाही, ते फक्त मार्गदर्शन करते की आंबा गोड आहे. जसे 'मुंबईला जाण्याचा रस्ता' अशी पाटी असते ना, तसे. फक्त म्हणतात की 'तू लग्न केलेस की सुखी होशील' म्हणून काय तो सुखी झाला? नाही, याउलट 'ॲबसोल्यूट' ज्ञानात तर तद्रूपच होऊन जातो.

केवलज्ञान स्वरूप तेव्हाच म्हटले जाते की जेव्हा पुद्‌गल परिणती बंद होऊन जाते. सर्वथा निजपरिणती याला केवलज्ञान म्हटले जाते. केवलदर्शनात निजपरिणती उत्पन्न होते. निजपरिणती संपूर्ण झाली तर त्याला केवलज्ञान म्हणतात. केवलदर्शनात निजपरिणती उत्पन्न होते आणि केवलज्ञानात ती पूर्णत्वाला जाते. निजपरिणती उत्पन्न झाल्यावर ती क्रमा क्रमाने वाढत जाते आणि अंतिमत: केवलज्ञान स्वरूपात परिणमीत होते. निजपरिणती ही आत्मभावना आहे, 'मी शुद्धात्मा आहे' ही आत्मभावना नाही.

जोपर्यंत केवलज्ञान होत नाही तोपर्यंत आतील ज्ञेये पाहत राहावीत, मग त्यानंतर ब्रह्मांडातील ज्ञेये झळकतील. या काळात काही अंशापर्यंतच ज्ञेये आणि दृश्ये झळकतात.

शुद्धात्मा पद प्राप्त झाल्यानंतर आतमधील जी ज्ञेये आहेत की जी 'डिस्चार्ज' स्वरूपात आहेत, त्याचे आपण ज्ञाता आहोत. 'डिस्चार्ज'

आपल्या ताब्यात नाही, 'व्यवस्थित शक्ती'च्या ताब्यात आहे. आपला तर ज्ञायकभाव आहे.

शुद्धात्मा म्हणजे परमात्मा नाही. शुद्धात्मा तर परमात्म्याच्या 'यार्ड' मध्ये आलेले एक स्थान आहे. शुद्धात्मा पद प्राप्त झाल्यानंतर पुढचे पद केवलज्ञान स्वरूप हे आहे. ते अंतिम पद आहे.

**प्रश्नकर्ता :** केवलज्ञान झाल्यावर परमात्मा पदात येतो का?

**दादाश्री :** हे शुद्धात्मा पद प्राप्त झाले की मग केवलज्ञानाच्या अंशांची सुरुवात होते. आणि सर्वांश झाल्यावर केवलज्ञान होत असते. केवलज्ञानाचे काही अंश ग्रहण झाले की आत्मा एकदम वेगळाच दिसू लागतो, त्यानंतर मग 'ॲबसोल्यूट' होतो.

जागृती म्हणजेच ज्ञान, आणि संपूर्ण जागृतीला केवलज्ञान म्हणतात. सर्व प्रकाराची जागृती, एकेका अणूची, परमाणू परमाणूंची जागृती म्हणजेच केवलज्ञान. केवलज्ञानाची जी अंतिम पायरी आहे त्यात केवलज्ञान स्वरूपातच रममाणता असते.

शुद्ध ज्ञान म्हणजे 'वॉट इज रियल?' आणि 'वॉट इज रिलेटिव्ह?' (रियल काय? आणि रिलेटिव्ह काय?) या तऱ्हेने दोन भाग करून देते, आणि विशुद्ध ज्ञान म्हणजे 'थियरी ऑफ ॲबसोल्यूटिझम.' विशुद्ध ज्ञान म्हणजे परमात्मा!

**प्रश्नकर्ता :** 'रियालिटी' आणि 'रियल' या दोघांबाबत तुम्हाला काय म्हणायचे आहे?

**दादाश्री :** आम्ही काय म्हणतो की 'रियालिटी' द्वारा 'रियल'मध्ये जा. रियालिटीमुळे आतमध्ये शांती वाटते आणि अनुभव येतो.

**प्रश्नकर्ता :** भगवंतांनी स्थिप्रज्ञ दशा प्राप्त झाल्यावर एका पायावर उभे राहून तपश्चर्या केली होती, त्यानंतर त्यांना केवलज्ञान झाले होते. मग आम्हाला असे काही न करता केवलज्ञान कसे मिळेल?

**दादाश्री :** केवलज्ञान ज्ञानक्रियेद्वारा होते, आणि ही तर अज्ञान

क्रिया म्हटली जाते. एका पायावर उभे राहणे हा हठाग्रह आहे. भगवंत असे हठाग्रही नव्हते. भगवंतांना समजून घेणे खूप अवघड आहे. लोक या गोष्टींच्या आपापल्या समजुतीप्रमाणे अर्थ काढतात.

**प्रश्नकर्ता :** यथाख्यात चारित्र्य म्हणजेच केवलज्ञान का?

**दादाश्री :** यथाख्यात चारित्र्य पूर्ण झाले की त्यानंतर केवलज्ञान होते. यथाख्यात नंतर केवलचारित्र्य आहे. केवलज्ञान केव्हा होते? तर जेव्हा शेवटच्या जन्मात शेवटच्या दहा-पंधरा वर्षात किंवा निदान शेवटच्या पाच वर्षात कुठल्याही प्रकारची नाती-व्यावहारिक किंवा नाटकी काहीच राहत नाहीत तेव्हा. महावीर भगवंतांची नाटकी नाती कधी संपली? भगवंतांचा तर विवाह झाला होता, एक मुलगी पण होती. पण तरी ते नाटकी रूपात घरी राहत होते. तिसाव्या वर्षी तेही संपले. त्यांनी अनार्य देशात भ्रमण केले. तेव्हा केवलज्ञान उत्पन्न झाले. सिद्धांत काय सांगतो की केवलज्ञान होण्यापूर्वी काही वर्षे कोरी असली पाहिजेत. आणि असे नियमानेच उदयास येते, त्यासाठी त्याग करायची गरज नाही.

गजसुकुमारला नेमिनाथ भगवंतांकडून शुद्धात्मा पद प्राप्त झाले होते. गजसुकुमाराचा एका ब्राह्मण मुलीबरोबर विवाह ठरला होता. नंतर त्यांच्या मनात वैराग्य उत्पन्न झाले, म्हणून त्यांनी दीक्षा घेतली. त्यामुळे सोमेश्वर ब्राह्मणाच्या मनात गजसुकुमाराबद्दल वैरभाव उत्पन्न झाला की, याच्यामुळे माझ्या मुलीचे आयुष्य बरबाद झाले. एके दिवशी जंगलात गजसुकुमार पद्मासन घालून एका तलावाच्या काठी शुद्धात्म्याचे ध्यान करत बसले होते. क्रमिक मार्गात तर त्यांना पद्मासन घालावे लागते. आपल्या इथे जर कोणी असे पद्मासन घालून बसला तर पंधरा मिनिटात मलाच त्याचे पाय मोकळे करावे लागतील. म्हणून आम्ही सांगतो, तुम्हाला जसे जमेल तसे बसा. हे तर अक्रमज्ञान आहे! गजसुकुमार ध्यानात बसले होते तेव्हा तिथून सोमेश्वर ब्राह्मण चालला होता. गजसुकुमाराला पाहिल्याबरोबरच त्याच्या आत वैर खळबळले, त्याच्या क्रोध अनावर झाला आणि त्याने जावयाच्या डोक्यावर मातीची शेगडी बनवली आणि त्यात धगधगीत निखारे भरले. गजसुकुमारने हे पाहिले,

ओहोहो! आज तर सासरे मोक्षाची पगडी बांधत आहेत! मग त्यांनी काय केले?

भगवंतांनी त्यांना समजावले होते की, ''जर कधी मोठा उपसर्ग आला तर तेव्हा फक्त 'शुद्धात्मा, शुद्धात्मा' करू नका. शुद्धात्मा तर स्थूल स्वरूप आहे, शब्द रूप आहे. अशा वेळी तर सूक्ष्म स्वरूपात जा.'' गजसुकुमारांनी विचारले, 'सूक्ष्म स्वरूप म्हणजे काय?' तेव्हा भगवंतांनी समजावले होते, 'फक्त केवलज्ञानच आहे, इतर काहीच नाही. त्यावर गजसुकुमारांनी विचारले, 'मला केवलज्ञानाचा अर्थ समजावून सांगा.' तेव्हा भगंवत म्हणाले, केवलज्ञान आकाशासारखे सूक्ष्म आहे; याउलट अग्नि स्थूल आहे. तर स्थूल, सूक्ष्मला कधीच जाळू शकत नाही. मारा, कापा, पेटवा तरीदेखील स्वत:च्या केवलज्ञान स्वरूपाला काही परिणाम होणे शक्य नाही. जेव्हा गजसुकुमारच्या डोक्यावर निखारे पेटत होते तेव्हा ते 'मी केवलज्ञान स्वरूप आहे' असे बोलले तेवढ्यातच कवटी फुटली, पण त्यांच्यावर त्याचा परिणाम झाला नाही!

म्हणजे हे सर्व समजून घेण्याचीच गरज आहे. आत्मा स्वत: केवलज्ञान स्वरूपच आहे. केवलज्ञान बाहेरून आणावे लागत नाही.

**प्रश्नकर्ता :** गजसुकुमारने डोक्यावर पगडी (शेगडी) बांधून घेतली, तेव्हा त्यांची स्थिती काय होती? वेदनेचा परिणाम त्यांच्यावर का झाला नाही याचे कारण त्यांच्ये लक्ष्य आत्म्यातच स्थिर झाले होते म्हणून का? म्हणून बाहेर काय चालू आहे याची त्यांना काहीच जाणीव झाली नाही?

**दादाश्री :** वेदनेचा परिणाम झाला. जेव्हा वेदना सहन झाल्या नाहीत तेव्हा त्यांना भगवंतांनी सांगितलेले शब्द आठवले की, आता चला आपल्या देशात (आत्म्यात). परिणाम झाल्याशिवाय आत्मा आपल्या 'होम डिपार्टमेंट'मध्ये शिरेल असे होत नाही.

**प्रश्नकर्ता :** त्यावेळी लक्ष्य एकाच वेळी 'वेदनेत' आणि 'आत्म्यात' असे दोन ठिकाणी असते?

**दादाश्री :** सुरुवातीला अंधुकअंधुक असते. मग वेदनेतील लक्ष्य सुटते आणि फक्त आत्म्यातच शिरते. ज्याला आत्मज्ञान प्राप्त झालेले नसते त्याला अशी *अशाता* वेदनीय अधोगतीत घेऊन जाते, आणि ज्ञानीला मात्र ती मोक्षात घेऊन जाते!

केवलज्ञान स्वरूप कसे दिसते? संपूर्ण देहात आकाशाएवढाच भाग स्वत:चा दिसू लागतो. फक्त आकाशच दिसते, बाकी काही दिसत नाही. एकही मूर्त वस्तू त्यात नसते. असा हळूहळू अभ्यास (सराव) करत जायला हवे. अनादीपासून चालत आलेला अन्-अभ्यास 'ज्ञानी पुरुषां'च्या सांगण्यावरून अभ्यासात बदलत जातो, अभ्यास झाला म्हणजेच शुद्ध झाला!

**प्रश्नकर्ता :** 'मी केवलज्ञान स्वरूप आहे' असे खूप वेळा बोलण्यात काही हरकत आहे का?

**दादाश्री :** काही हरकत नाही. पण नुसते शब्दरूपाने बोलण्यात काही अर्थ नाही, समजून बोलणे अधिक चांगले. जोपर्यंत अशुद्ध गोष्टी समोर येतात तेव्हा आतील परिणामात चढ-उतार होत असेल तोपर्यंत 'मी शुद्धात्मा आहे' असे म्हणणेच चांगले. त्याच्यापुढच्या श्रेणीमध्ये 'मी केवलज्ञान स्वरूप आहे' असे तुम्ही बोलू शकता. गुणांची भजना कराल तर स्थिरता राहील! हे माझे स्वरूप आहे, आणि हे माझे स्वरूप नाही, हे जे काही होत आहे ते माझे स्वरूप नाही, असे जरी बोललात तरी आतील खालीवर होणारे परिणाम बंद होतील. आत्मा काय आहे? त्याच्या गुणांसहित बोलावे, पाहावे, तेव्हाच तो प्रकाशमान होईल.

**प्रश्नकर्ता :** केवलज्ञानी आणि ज्ञानी पुरुष यात काय फरक आहे?

**दादाश्री :** ज्यांना सर्व गोष्टी ज्ञानाने दिसते ते केवलज्ञानी. आणि 'ज्ञानी पुरुषां'ना सर्व गोष्टी समजतात पण थोड्या अस्पष्ट रूपाने. केवलज्ञानात तर सर्व पूर्ण रूपात स्पष्ट दिसते, अस्पष्ट नसते. केवलज्ञानी कार्य स्वरूप झालेले असतात आणि 'ज्ञानी पुरुष' कारण स्वरूप झाले आहेत, म्हणजेच केवलज्ञानाच्या कारणांचे सेवन करत आहेत. हे कसे

आहे की एक माणूस बडोद्याला जाण्यासाठी दादर स्टेशनवर गेला असेल आणि तेव्हा जर आपल्याला कोणी विचारले की ते गृहस्थ कुठे आहेत? तर आपण म्हणतो, 'ते बडोद्याला गेले.' म्हणजे होत राहिलेल्या कार्याचे कारणात आरोपण करू शकतो.

आम्हाला केवलज्ञान बोटाने स्पर्श करून निघून गेले, पचले नाही, चार डिग्री कमी पडल्या. केवलज्ञानात नापास झालो म्हणून तर आज तुमच्या उपयोगी पडत आहोत.

**प्रश्नकर्ता :** दादाश्री, आम्ही तुम्हाला प्रश्न विचारतो, त्याची अचूक उत्तरे तुम्ही ताबडतोब देता, पण ती कुठल्याही शास्त्रांच्या आधारे नसतात. मग ही उत्तरे तुम्ही कसे काय देता?

**दादाश्री :** मी विचार करून किंवा वाचलेले बोलत नाही, केवलज्ञानात पाहून बोलतो. तुम्ही जे ऐकता, पाहता तो केवलज्ञानाचा प्रकाश आहे. ही संपूर्ण वाणी केवल ज्ञानमय आहे. केवलज्ञानातील अमुकच ज्ञेये आम्हाला दिसत नाहीत. हे तर दूषमकाळातील केवलज्ञान आहे!!!

अज्ञानापासून केवलज्ञानापर्यंतची सर्व स्पष्टीकरणे निघाली आहेत. कोणत्याही शास्त्रात सापडणार नाहीत अशा अपूर्व गोष्टी आहेत. या स्थूल गोष्टी नाहीत, फार सूक्ष्म गोष्टी आहेत. स्थूल पूर्ण झाले, सूक्ष्म पूर्ण झाले, सूक्ष्मतरसुद्धा पूर्ण झाले आणि आता ह्या सूक्ष्मतमच्या गोष्टी आहेत. म्हणून जोपर्यंत हा बुडबुडा जिवंत आहे तोपर्यंत तुमचे (मोक्षाचे) काम साध्य करून घ्या. आहे तोपर्यंत गोष्टी ऐकायला मिळतील. ही लिहिलेली वाणी नंतर तथारूप फळ देणार नाही. ज्याने प्रत्यक्ष ऐकलेले असेल त्याला शब्द उगवल्याखेरीज राहणार नाहीत. यातला एकही शब्द वाया जाणार नाही. ज्याची जेवढी शक्ती तेवढे त्याला पचेल. ही केवलज्ञानमय वाणी आहे. जिथे बुद्धीचा अंत येतो, मतिज्ञानाचा अंत येतो तिथे केवलज्ञान उभे आहे. हा प्रकाश केवलज्ञानातूनच उत्पन्न झालेला प्रकाश आहे!!

या जगात जे काही केले जात आहे, ते जगाला परवडो किंवा न परवडो, तरी पण मी काहीच करत नाही, असे सतत लक्षात असणे ते केवलदर्शन आहे, अशी समज असणे ते केवलज्ञान आहे!

## आत्मा : असंग

मन, वचन, कायेच्या सर्व संगीक्रियांपासून 'शुद्ध चेतन' बिलकूल असंगच आहे. मन, वचन, कायेच्या सर्व संगीक्रियांचा 'शुद्ध चेतन' फक्त ज्ञाता-दृष्टा आहे. समीप राहिल्याने भ्रांती उत्पन्न होते. दोन्ही गोष्टी स्वभावाने वेगळ्याच आहेत. आत्म्याची कुठलीही क्रिया नाही, तर या सर्व संगीक्रिया कोणाच्या आहेत? तर पुद्‌गलाच्या.

पुद्‌गल त्रास देणारी गोष्ट आहे, तो शेजारी आहे. पुद्‌गल केव्हा त्रास देऊ शकत नाही? स्वत: वीर्यवान असेल तर. किंवा खूप कमी आहार घेतला, जगण्यासाठी आवश्यक एवढेच जेवले, तर पुद्‌गल त्रास देत नाही.

शुद्धात्मा निर्लेप आहे, असंग आहे, त्याला संग स्पर्शच करीत नाही. हीरा मुठीच्या आकाराचा झाला का? की मूठ कधी हिऱ्याच्या आकाराची झाली? दोनही आपले-आपले काम करतात, दोनही वेगळेच आहेत. तसेच आत्मा आणि अनात्मा यांचे आहे. आत्म्याचा स्वभाव संगतीत राहून देखील असंग आहे, त्याच्यावर कुठलाही डाग पडू शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** आत्मा असंग आहे, तर मग त्याला शरीरात का राहावे लागते?

**दादाश्री :** देहाचा संग तर तीर्थंकरांना सुद्धा असतो. त्यांच्या कानात देखील खिळे ठोसले गेले, त्यांना पण वेदना सहन कराव्या लागल्या, तो पण हिशोब आहे. देहाचे जे आयुष्यकर्म असेल ते पूर्ण करावे लागते, त्यानंतरच मोक्षाला जाता येते. देहात राहून देखील असंग आणि निर्लेप राहता येते, असे वीतरागांचे विज्ञान आहे!

जर तू शुद्धात्मा आहेस तर 'मी संसारात आहे' अशी शंकासुद्धा मनात येऊ देऊ नकोस.

## आत्मा : निर्लेप

मन, वचन, कायेचे जे सर्व लेपायमान भाव येतात, त्यापासून 'शुद्धचेतन' सर्वथा निर्लेपच आहे.

मनात जे भाव उत्पन्न होतात, विचार उत्पन्न होतात, ती सर्व अज्ञान दशेची स्पंदने आहेत. ज्ञानदशेत स्पंदने बंद झाल्यामुळे मन उत्पन्न होत नाही. वचन पण अज्ञानदशेचे स्पंदन आहे. काया पण अज्ञानदशेचे स्पंदन आहे. अज्ञानदशेत उत्पन्न झालेली स्पंदने आज 'डिस्चार्ज' स्वरूपातच आहेत. 'डिस्चार्ज' बदलता येतच नाही, त्याबद्दल 'उदासीन' भावाने राहावे. ज्ञानदशेनंतर स्पंदने होत नसल्यामुळे (नवीन) मन, वचन, काया उत्पन्न होत नाहीत. मनाने लग्न दाखविले किंवा मृत्यू दाखविला, तरी या दोनही स्थितीत 'मी' उदासीन आहे. वाणी कठोर स्वरूपात निघाली किंवा सुंदर स्वरूपात निघाली, तरी 'मी' उदासीनच आहे. वाणी कठोर स्वरूपात निघाली आणि त्यामुळे समोरच्याला दु:ख झाले तर त्या झालेल्या अतिक्रमणाचे 'मी' प्रतिक्रमण करवून घेतो.

मन, वचन, काया यांचे भाव म्हणजेच *पुद्‌गलाचे* जे भाव उत्पन्न होतात, त्यावर प्रतिष्ठित आत्मा स्वत:चे भाव निर्माण करतो, त्यातून संसार उत्पन्न होतो. मन, वचन, काया यांचे जे जे भाव होत असतात ते सर्व *पुद्‌गलाचे* भाव आहेत, शुद्ध चेतनाचे नाहीत. इतकेच ज्याला समजले त्याचे काम झाले!

सायन्स काय म्हणते की हे सोने आणि तांबे आहे, (काहीही केले तरी) सोन्याचा स्वभाव तांब्याला आणि तांब्याचा स्वभाव सोन्याला येणार नाही. दोन्ही एकत्र राहिले, तरीदेखील आपापल्या स्वभावातच राहतात.

घरदार, बायको, मुलांचा त्याग केला, हा पण *पुद्‌गल* भाव आहे आणि लग्न केले हा पण *पुद्‌गल* भाव आहे. *पुद्‌गल* भावांना 'स्वत:चे' मानून चालतो त्यामुळे संसार चालत राहतो. कारण त्याला असेच वाटते की 'माझ्याखेरीज इतर कोणी भाव करतच नाहीत, इतर सर्व तर जड आहे.' पण त्याला हे समजत नाही की या जडाचेही भाव आहेत आणि

ते भाव पण जड आहेत. 'हा चेतनभाव आहे आणि हा जडभाव आहे' एवढे समजले की तो सुटला.

*पुद्गलाचे* भाव कसे असतात? येतात आणि मग जातात. आणि जो जात नाही तो आत्मभाव आहे. पुद्गलाचा भाव म्हणजे पूरण केलेला (भरलेला) भाव आहे आणि त्याचे गलन होईल. ही खूप सूक्ष्म गोष्ट आहे आणि अंतिम दशेची गोष्ट आहे. निरपेक्ष गोष्ट आहे.

आम्ही तुम्हा महात्म्यांना जो आत्मा दिला आहे, तो निर्लेपच दिला आहे. मनात जे जे विचार येतात, जे जे भाव येतात ते सर्व लेपायमान भाव आहेत. ते आपल्यालाही लेपीत करू पाहतात. निर्लेपलाही लेपीत करतील असे आहेत. पण हे तुझे भाव नाहीत. जे पूरण झालेले भाव आहेत त्यांचे गलन होत आहे. मग त्याची तुला कशाला काळजी? चार वर्षांपूर्वीचा गुन्हा असेल आणि तो कोर्टात अडकला असेल, तर आज त्याची नोटीस येईल की नाही? अगोदर झालेल्या पूरणाचे आज गलन होत आहे. त्यात तू कशाला घाबरतोस? या मन, वचन, काया यांच्या सर्व लेपायमान भावांपासून 'मी' मुक्तच आहे. मन, वचन, काया यांच्या सर्व संगीक्रियांपासून 'मी' असंगच आहे. या सर्व संगीक्रिया स्थूल आहेत आणि आत्मा तर एकदम सूक्ष्म आहे. दोघांना एकत्र करायचे असेल तरीही ते कधीच एकत्र होणार नाहीत. हे जग तर केवळ भ्रांतीमुळे उभे झाले आहे. आत्मा क्षणभरदेखील रागी-द्वेषी झाला नाही, केवळ भ्रांतीमुळे असे वाटते. आत्मा कधीही अनात्मा झाला नाही आणि अनात्मा कधीही आत्मा झाला नाही. फक्त रॉंग बिलीफ (चुकीची मान्यता) बसली आहे की, 'हे सर्व मी करत आहे.'

आत्मा असंगच आहे, खाताना वेगळा आहे, पितांना वेगळा आहे. आत्मा त्याहून वेगळा असेल तरच तो जाणू शकेल, नाही तर तो जाणू शकणार नाही.

## मन, वचन, काया यांच्या सवयी आणि त्यांचा स्वभाव

मन, वचन, काया यांच्या सवयी आणि त्यांचा स्वभावाला 'शुद्धचेतन'

जाणतो आणि स्वतःचा स्व–स्वभावालाही 'शुद्धचेतन' जाणतो. कारण तो स्व–पर प्रकाशक आहे.

आत्म्याचा स्वभाव मोक्षगामी आहे, ज्ञाता–दृष्टा आहे. स्वरूप ज्ञानानंतर आपण आपल्या स्वभावाला जाणतो आणि या मन, वचन, काया यांच्या संवयींना पण जाणतो. मन असे आहे, वाणीची सवय अशी आहे, समोरच्याला बोचेल अशी खराब आहे, हे सगळे तुम्ही जाणता की नाही? तुम्ही हे पण जाणता आणि 'ते' पण जाणता. कारण तुम्ही स्व–पर प्रकाशक आहात. स्वतःला, म्हणजे 'स्व'ला पण प्रकाशमान करू शकता आणि 'पर'ला पण प्रकाशमान करू शकता. अज्ञानी माणूस फक्त 'पर'लाच प्रकाशमान करू शकतो, 'स्व'ला प्रकाशमान करू शकत नाही. त्यालाही असे तर वाटतेच की माझे मन खूप वाईट आहे, पण मग जाणार कुठे? तिथल्या तिथेच राहावे लागते. याउलट आत्मज्ञानवाला तर वेगळा राहू शकतो.

**प्रश्नकर्ता :** सवयी आणि त्यांचा स्वभाव हे कळले नाही.

**दादाश्री :** मन, वचन, काया यांच्या सवयी एवढेच म्हटलेले नाही, पण बरोबरच त्यांचे स्वभाव असे म्हटले आहे! स्वभाव म्हणजे एखादी सवय खूप जाड (पक्की) असते, एखादी सवय पातळ असते, नखांएवढीच पातळ असते, एक किंवा दोन वेळा प्रतिक्रमण केल्याने ती संपून जाते. आणि जी सवय खूपच जाड असते. त्यासाठी तर खूप वेळा प्रतिक्रमण करत राहिले, सतत सोलत राहिले तरच ती सवय घासून घासून नष्ट होते!

मन, वचन, काया यांच्या ज्या सवयी असतात, त्या मृत्यूनंतरच सुटतील अशा असतात, पण त्यांचा स्वभाव मात्र घासून टाकायला हवा. पातळ रसाने बांधलेल्या सवयींसाठी चार–पाच वेळा प्रतिक्रमण कराल तर त्या निघून जातील, पण घट्ट रसाने बांधलेल्या सवयींसाठी पाचशे–पाचशे वेळा प्रतिक्रमण करावे लागतात. आणि काही गाठी उदा. लोभाच्या गाठी तर इतक्या मोठ्या असतात की रोज दोन–दोन, तीन–तीन तास लोभाचे प्रतिक्रमण करत राहिलात तरी सहा वर्षांनीही गाठी संपतीलच

असे सांगता येणार नाही! आणि एखाद्याची लोभाची गाठ इतकी छोटी असते की तो एका दिवसात किंवा तीन तासातच ती गाठ संपवून टाकतो! असे तऱ्हेतऱ्हेचे स्वभाव रस असतात.

## संयोग : पर आणि पराधीन

स्थूल संयोग, सूक्ष्म संयोग आणि वाणीचे संयोग हे पर आहेत आणि पराधीन आहेत. शुद्धचेतन त्यांचा फक्त ज्ञाता-दृष्टा आहे.

स्थूल संयोग म्हणजे जे बाहेरून येतात ते. स्थूल संयोग उपाधीरूप आहेत, तरीही आपण त्यांचे ज्ञाता-दृष्टा राहू शकतो. कारण हे अक्रम विज्ञान आहे. सूक्ष्म संयोग म्हणजे जे शरीराच्या आत उत्पन्न होतात, मनाचे, बुद्धीचे, चित्ताचे आणि अहंकाराचे संयोग, ते सूक्ष्म संयोग आहेत, आणि शिवाय ते चंचल भागाचे आहेत. चंचल भाग हा सूक्ष्म आहे. वाणीचे संयोग तर प्रकटपणे समजतात. वाणी सूक्ष्म भावाने उत्पन्न होते आणि स्थूल भावाने प्रकट होते. वाणीच्या संयोगांना सूक्ष्म-स्थूल असे म्हणतात. हे सर्व संयोग पर आहेत आणि पराधीन आहेत. त्यांना प्रयत्न करून पकडताही येत नाही आणि पळविताही येत नाही. प्रत्येक संयोग ज्ञेय स्वरूप आहे आणि आपण त्याचे ज्ञाता आहोत. संयोग स्वत:च वियोगी स्वभावाचा आहे. म्हणून ज्ञाता-दृष्टा राहिला तर त्याचा वियोग इटसेल्फ (आपोआपच) होईल. यात आत्म्याला काहीच कर्तव्य नाही. तो केवळ ज्ञाता-दृष्टा स्वभावात राहू शकतो. संयोग ऐच्छिक असो किंवा अनैच्छिक असो, त्याचा वियोग होणारच असतो. आवडता संयोग धरून ठेवता येत नाही आणि नावडता संयोग हाकलून देता येत नाही. म्हणून निश्चिंत राहा. संयोग आपल्या ताब्यात नाहीत. ही 'दादां'ची आज्ञा आहे. त्यामुळे अगदी फाशीचा संयोग जरी आला तरी तो वियोगी स्वभावाचा आहे, हे जाणा. आपल्याजवळ जे नाशवंत आहे तेच घेऊन जाईल ना? आणि ते देखील 'व्यवस्थित शक्ती'च्या हिशोबानुसार आलेले असेल तर त्याला कोणी हाकलू शकणार नाही. म्हणून 'व्यवस्थित'नुसार जे घडायचे आहे ते घडो.

ही गोष्ट ज्यांनी आत्मा प्राप्त केला आहे त्यांनाच लागू आहे.

इतरांसाठी नाही. कारण आत्मदशेत आल्याशिवाय शिवी देईल आणि म्हणेल की वाणी पर आहे आणि पराधीन आहे, तर याचा दुरुपयोग होईल. मग मनात असे वाईट बोलता कामा नये असा निश्चय तो करणारच नाही. म्हणून त्याची प्रगती थांबेल. याउलट ज्याला आत्मा प्राप्त झाला आहे, तो तर स्थूल संयोग, सूक्ष्म संयोग आणि वाणीचे संयोग यांचा अत्यंत जागृतीपूर्वक ज्ञाता-दृष्टा राहील आणि जागृतीपूर्वक प्रतिक्रमण करवून घेऊन त्याचा निकाल लावील. कारण आता दुकान रिकामे करायचे आहे असा त्याने निश्चय केलेला आहे.

अक्रम विज्ञान वेगळ्याच प्रकारचे आहे. त्यामध्ये आम्ही प्रथम चार्जिंग होणे बंद करतो आणि जो डिस्चार्ज आहे त्याचा समभावाने निकाल करण्यास सांगतो, नवीन चार्ज होणार नाही अशी व्यवस्था करतो. हा सर्वात सोपा आत्यंतिक मुक्तीचा मार्ग आहे! ज्यांना तो मिळाला ते सुटले!!

## प्राकृत गुण : आत्म गुण

**प्रश्नकर्ता :** आत्मा प्राप्त करण्यासाठी, तशी पात्रता मिळवण्यासाठी चांगल्या गुणांची आवश्यकता आहे का?

**दादाश्री :** नाही. गुणांची आवश्यकता नाही. निष्कैफी (अहंकार रहित) असण्याची गरज आहे. गुणांना काय करायचे? हे सर्व तर प्रकृतीचे गुण आहेत, *पौद्‌गलिक* गुण आहेत.

**प्रश्नकर्ता :** परंतु हे सर्व गुण आत्म्याचेच आहेत ना?

**दादाश्री :** यातील एकही गुण आत्म्याचा नाही. तुम्ही प्रकृतीच्या आधीन आहात आणि प्रकृतीचे गुण आणि आत्म्याचे गुण सर्वथा वेगळे आहेत.

प्रकृतीचा एकही गुण 'शुद्धचेतना'त नाही आणि 'शुद्धचेतना'चा एकही गुण प्रकृतीत नाही, गुणांनी दोघे सर्वथा वेगळेच आहेत.



# [ 7 ]
# आत्म्यासंबंधी प्रश्नावली

## आवरणांच्या आधारे भिन्नता

**प्रश्नकर्ता :** आत्माच्या आधारे देह आहे की देहाच्या आधारे आत्मा आहे?

**दादाश्री :** आत्मा असेल तर देह राहील.

**प्रश्नकर्ता :** अज्ञानीचा आत्मा, ज्ञानीचा आत्मा आणि जे मोक्षात गेले त्यांचा आत्मा, या तिघांच्या शक्तीत काय फरक आहे? सिद्ध भगवंत काय करू शकतात? सर्वज्ञ तर हवे ते करू शकतात.

**दादाश्री :** अज्ञानीचा आत्मा बंधनात आहे असे वाटते; मात्र ज्ञानींचा आत्मा अबंध-बंध असतो, काही दृष्टीने बंधनात आणि काही दृष्टीने मुक्त. आणि सिद्ध भगवंत तर अबंधच राहतात. मोक्षातच राहतात. सिद्ध भगवंत काही करण्यासाठी राहिले नाहीत. देहधारीच हवे ते करू शकतात. सिद्ध भगवंतांची शक्ती पूर्णपणे विकसित झालेली आहे, पण ती कुणाच्या उपयोगी पडत नाही.

**प्रश्नकर्ता :** स्वभावाने, गुणधर्मांने सारख्याच आहेत, तर मग शक्तींची भिन्नता कशावर अवलंबून आहे?

**दादाश्री :** ती भिन्नता आवरणांवर अवलंबून आहे.

**प्रश्नकर्ता :** वस्तूच्या अवस्था कोणत्या शक्तीने बदलतात?

**दादाश्री :** काळतत्त्वाने बदलते. जसाजसा काळ बदलतो, तशीतशी अवस्था बदलते.

**प्रश्नकर्ता :** ज्ञान आणि हृदय यात काही संबंध आहे का?

**दादाश्री :** दोघांचा काहीही संबंध नाही. हृदय 'रिलेटिव्ह' आहे आणि ज्ञान 'रियल' आहे. पण हृदय चांगले असेल तरच ज्ञानात लवकर प्रगती करू शकतो.

**प्रश्नकर्ता :** केवलींना आत्मा दिसत असेल ना?

**दादाश्री :** केवलींना आत्मा ज्ञानाने दिसतो. दिसणे, म्हणजे, भान होणे आणि जाणणे म्हणजे अनुभव येणे. ते अरूपीपद आहे. अनुभवगम्य आहे.

**प्रश्नकर्ता :** केवली शिवाय इतरांना आत्मा दिसतो का?

**दादाश्री :** नाही.

## अज्ञानापासून मुक्ती, म्हणजेच मोक्ष

**प्रश्नकर्ता :** आत्म्याला कशापासून मुक्त व्हायचे आहे?

**दादाश्री :** प्रथम अज्ञानापासून मुक्त व्हायचे आहे आणि नंतर अज्ञानामुळे उत्पन्न झालेल्या इफेक्ट्स (परिणामां) पासून मुक्त व्हायचे आहे.

**प्रश्नकर्ता :** आत्म्याचा मोक्ष असे म्हणतात, तर मोक्ष एखादे भौगोलिक स्थान आहे का?

**दादाश्री :** ते भौगोलिक स्थान आहे हे बरोबर आहे, पण खरे म्हणजे तुम्ही स्वत:च मोक्ष स्वरूप आहात!

**प्रश्नकर्ता :** आत्मा आणि परमात्मा वेगवेगळेच आहेत. त्या दोघांचा काही तरी संबंध असेलच ना?

**दादाश्री :** ते वेगवेगळे नाहीत. तोच आत्मा आणि तोच परमात्मा आहे. फक्त दशेत फरक आहे. घरी आलात तर चंदुलाल आणि ऑफिसमध्ये असलात तर कलेक्टर साहेब असे म्हटले जाते. 'मी, बावो, आणि मंगलदास' अशासारखे आहे हे!

**प्रश्नकर्ता :** आत्मा परमात्मा एक होतात, त्याला तर अंतिम स्टेज (स्थिती) म्हणतात ना?

**दादाश्री :** हो, त्यालाच अंतिम स्टेज म्हणतात. त्यापुढे काही करणे शिल्लक राहत नाही.

## आत्म्याचे द्रव्य, क्षेत्र

**प्रश्नकर्ता :** आत्मा क्षेत्राच्या रूपाने कशा तऱ्हेने राहत आहे?

**दादाश्री :** आत्म्याचे स्वक्षेत्र म्हणजे स्वत:चा अनंत प्रदेशी भाग आहे तो. खरे तर त्याचे क्षेत्र असे मला म्हणायचे नाही. पण परक्षेत्राहून वेगळे दाखविण्यासाठी स्वक्षेत्राचे वर्णन केले आहे.

**प्रश्नकर्ता :** आत्म्याचे द्रव्य बदलते का?

**दादाश्री :** आत्म्याचे स्वद्रव्य बदलत नाही. पण आत्म्याला या संसारभावाने जी द्रव्ये लागू झाली आहेत, ती सर्व बदलत राहतात. क्षेत्र बदलत राहते, काळ बदलत राहतो आणि त्यामुळे भाव बदलत राहतात. भीतिदायक जागी गेलो तर भय उत्पन्न होते. सर्व जीवमात्रांचे भाव प्रत्येक *समयी* बदलत राहतात.

**प्रश्नकर्ता :** आत्म्याचे वेगवेगळे प्रकार असतात का?

**दादाश्री :** नाही, आत्मे एकाच प्रकारचे असतात.

**प्रश्नकर्ता :** आत्म्याला राग-द्वेष असतात का?

**दादाश्री :** नाही, राग-द्वेष हे आत्म्याचे गुण नाहीत. रॉंग बिलीफमुळे राग-द्वेष निर्माण होतात.

## आत्मा हाच परमात्मा

**प्रश्नकर्ता :** 'आत्मा तोच परमात्मा' हे समजावून सांगा.

**दादाश्री :** 'रिलेटिव्ह'मध्ये आत्मा आहे आणि 'रियल'मध्ये परमात्मा आहे. जोपर्यंत विनाशी वस्तूंचा व्यापार (व्यवहार) आहे तोपर्यंत संसारी आत्मा आहे, आणि संसारात नसेल तर परमात्मा आहे. 'रिलेटिव्ह'चीच भजना केली तर तो विनाशी आहे आणि 'रियल'ची भजना केली तर तो परमात्मा आहे. जर तुला भान असेल तर तू परमात्म्यात राहशील आणि भान नसेल तर तू चंदुभाई आहेस.

**प्रश्नकर्ता :** आत्म्याला ओळखल्यावर आम्हाला काय प्राप्त झाले असे समजावे?

**दादाश्री :** सनातन सुख.

**प्रश्नकर्ता :** आत्मा चेतन आहे. सनातन आहे, की त्याचे विलीनीकरण होत असते? त्याची स्थिती बदलते का?

**दादाश्री :** आत्मा सनातन आहे, तो तसाच्या तसाच राहतो. जसे अंगठीत सोने आणि तांबे मिसळले असेल तरी सोन्याची स्थिती बदलत नाही, त्याचे गुणधर्म बदलत नाहीत. तसेच आत्म्याचे गुणधर्म अनात्म्याबरोबर राहूनही बदलत नाहीत. आणि सोने प्रयोग करून वेगळे करता येते.

**प्रश्नकर्ता :** गव्हाच्या दाण्यात आणि पक्ष्यात चेतना वेगवेगळी आहे ना?

**दादाश्री :** नाही, चेतना तर सारखीच आहे. तुमच्यात, माझ्यात आणि गव्हाच्या दाण्यात चेतना एकाच प्रकारची आहे पण प्रत्येकाच्या आवरणात फरक आहे.

**प्रश्नकर्ता :** चेतन दुसऱ्यांना चालवते का?

**दादाश्री :** नाही, त्याच्या फक्त स्पर्शानेच सगळे चालते. संयोगांच्या

दबावामुळे 'मी करत आहे' अशी 'बिलीफ' उत्पन्न होते. त्या विभाविक भावात असूनही आत्मा 'स्वत:' स्वाभाविक भावातच असतो.

**प्रश्नकर्ता :** मृतदेहात तर सर्व तत्त्वे असतात ना?

**दादाश्री :** नाही. त्यात फक्त पुद्‌गल आणि आकाश, ही दोनच तत्त्वे राहतात. इतर सर्व उडून जातात. मग सर्व तत्त्वे वेगळी वेगळी होतात आणि आपआपल्या मूळ तत्त्वांत मिसळतात.

**प्रश्नकर्ता :** पण त्यात देखील स्पेस तर अडकवतात ना?

**दादाश्री :** मूळ पुद्‌गल तत्त्वाची स्वत:ची स्वाभाविक स्पेस तर असतेच. पण ह्या इतर परमाणूंच्या संमेलनाने जो देह निर्माण होतो, त्याला पण जागा लागतेच. आत्मा निघून गेल्यावर सर्व आपल्या मूळ तत्त्वामध्ये परत जातात.

**प्रश्नकर्ता :** मनुष्याने निश्चय केला असेल की स्वरूपात राहायचे आहे, तर तो निश्चय बुद्धिगम्य आहे का? तो मनाने होतो का? की त्यापासून तो वेगळा आहे?

**दादाश्री :** स्वरूपात राहणे हे मनाच्या, बुद्धीच्या सगळ्यांच्या पलीकडे आहे. पण स्वरूपाचे भान असले पाहिजे. मन हे 'कम्प्लीट फिजिकल' आहे.

## झोपेत चेतनाची स्थिती

**प्रश्नकर्ता :** रात्री झोपलो आणि सकाळी जागे झालो, सलग झोपेत सकाळ झाली हे कुणाला समजते?

**दादाश्री :** हे सर्व मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार अर्थात अंत:करणाचे धर्म आहेत. आत्मा चैतन्य अक्रिय भाग आहे, ज्ञाता-दृष्टा आणि अक्रिय आहे. यात अंत:करण पण अक्रिय झाले तर सुखकारक परिणाम उत्पन्न होतो. रात्री झोपतो म्हणजे तो अक्रिय होतो, तेव्हा त्याला सुख वाटत राहते. जोपर्यंत क्रिया आहे तोपर्यंत सुख कमी होते.

माणूस अहंकारामुळे झोपतो आणि अहंकारामुळेच जागा होतो. आणि सलग झोपेत सकाळ झाली म्हणतो तो पण अहंकारच आहे.

**प्रश्नकर्ता :** त्यात आत्म्याचा भास आहे का?

**दादाश्री :** नाही, नाही.

**प्रश्नकर्ता :** रात्री झोप लागल्यावर आत्म्याची स्थिती कशी असते?

**दादाश्री :** जो निरंतर शुद्धात्म्याच्या भानात राहतो, तो तर झोपेतसुद्धा त्याच स्थितीत राहतो. आणि ज्याला 'मी चंदुलाल आहे' असे भान आहे त्याचेही 'मी चंदुलाल आहे' हे भान जात नाही. म्हणून तर तो म्हणतो 'मला चांगली झोप लागली.' अरे, तू तर झोपला होतास तर मग हे कोणी जाणले? तर अहंकाराने जाणले.

**प्रश्नकर्ता :** मनोयोगी आणि आत्मयोगी यात काय फरक आहे?

**दादाश्री :** खूप फरक आहे. आकाश-पाताळ एवढा फरक आहे. पण जे देहयोगी आहेत, त्यापेक्षा मनोयोगी खूप उंच पायरीवर आहेत. मनोयोगाद्वारे आत्मयोगापर्यंत पोहोचता येत नाही.

**प्रश्नकर्ता :** अंतर्मुखी आणि बहिर्मुखी याबाबतीत जरा समजावून सांगा.

**दादाश्री :** अविनाशीचे विचार मनात आले की माणूस अंतर्मुखी होत जातो. जोपर्यंत विनाशी वस्तूंचीच रुची आहे, इच्छा आहे, वृत्ती बाहेर भटकत आहेत, तोपर्यंत माणूस बहिर्मुखी राहतो.

## आत्मा-अनात्मा यांचे भेदांकन

**प्रश्नकर्ता :** आत्मा आणि अनात्म्याला वेगळे करण्यासाठी काय करायला हवे?

**दादाश्री :** सोने आणि तांबे अंगठीत एकत्र असेल आणि अंगठीतून सोने वेगळे करायचे असेल तर काय करायला हवे? सोनाराला विचारले तर तो काय म्हणेल? 'आम्हाला अंगठी आणून द्या, म्हणजे तुमचे काम

होईल.' त्याचप्रकारे तुम्ही आम्हाला एवढेच म्हणायचे आहे की आमची सुटका करा. मग तुमचे काम होऊन जाईल. आत्मा क्षणभरदेखील अनात्मा झालेला नाही. यासाठी तर ज्ञानींना सांगण्यासारखे आहे, तुम्हाला करण्यासारखे काहीच नाही. करणे ही भ्रांती आहे. ज्याला 'ज्ञानी पुरुष' मिळाले त्याचा प्रश्न सुटला.

**प्रश्नकर्ता :** परमात्म्याला ओळखताना दु:ख आणि अशांती याचा अनुभव का येतो?

**दादाश्री :** परमात्मा तर आहेतच, पण तुम्ही परमात्म्याशी वेगळेपण राखता. आत परमात्मा बसले आहेत, त्यांची भक्ती उत्पन्न झाली की मग दु:ख उत्पन्न होणार नाही. पण ओळखल्याशिवाय भक्ती कशी उत्पन्न होईल? प्रत्यक्ष भक्तीद्वारा सुख मिळते आणि परोक्ष भक्तीद्वारा घटकेत शांती आणि घटकेत अशांती वाटते.

**प्रश्नकर्ता :** भगवंत जर सुख कर्ता आणि दु:ख हर्ता आहेत तर मग अशांती का आहे?

**दादाश्री :** भगवंत दु:खाचे हर्ता पण नाहीत आणि सुखाचे कर्ता पण नाहीत, भगवंताबद्दलची भेदबुद्धी गेली, त्यांच्याबद्दल अभेदबुद्धी उत्पन्न झाली तर दु:ख जाईल. भगवंत कोणाचेही दु:ख घेत नाहीत आणि कोणालाही सुख देत नाहीत. ते फक्त एवढेच म्हणतात माझ्याशी तन्मयाकार हो, एकरूप हो, तर दु:ख उरणारच नाही. एकही गोष्ट खऱ्या अर्थाने जाणत नाही, हीच भ्रांती आहे.

## मार्गदर्शक संपवितो संसाराची भटकंती

**प्रश्नकर्ता :** मोक्षाला जाण्याचा सरळ रस्ता कोणता?

**दादाश्री :** मार्गदर्शकाला भेटणे हाच, मार्गदर्शक भेटला म्हणजे मुक्ती मिळेल. याहून अधिक साधा आणि सरळ मार्ग कुठला असू शकेल?

भगवंतांनी सांगितले आहे की काय केल्याने मोक्ष मिळू शकतो?

समकित झाले तर मोक्ष मिळू शकतो किंवा 'ज्ञानी पुरुषां'ची कृपा लाभली तर मोक्ष मिळू शकतो. 'ज्ञानी' दोन प्रकारचे असतात. एक शास्त्रज्ञानी आणि एक अनुभवज्ञानी, यथार्थ ज्ञानी. यथार्थ ज्ञानी तर आतून, पाताळ फोडून बोलतात, ते यथार्थ ज्ञान आहे. यथार्थ ज्ञानाद्वारे आत्मज्ञान होते. नाही तर जोपर्यंत 'मी चंदुलाल आहे' असा ममताभाव आहे, तोपर्यंत समताभाव कुठून येणार? एकदा समकितला स्पर्श केला की त्यानंतरच यथार्थ समताभाव येईल. सामान्य लोक बोलतात तो तर लौकिक समताभाव आहे. शास्त्र आणि पुस्तके वाचूनवाचून पुस्तकांचा मोक्ष झाला पण त्यांचा नाही झाला!

## आत्मसुखाची अनुभूती

**प्रश्नकर्ता :** मन शांत झाले, मन त्रास देत नाही, तेव्हा कोणते सुख उत्पन्न होते? चित्त भटकत नाही तर कुठले सुख उत्पन्न होते?

**दादाश्री :** हे मनच सगळे करीत असते. मनच चित्ताला, अहंकाराला उकसवीत असते. मन शांत झाले तर सर्व काही शांत होते.

**प्रश्नकर्ता :** आत्मदशेत आत्म्याच्या सुखाची जाणीव कशी होते? हे नक्की आत्म्याचेच सुख आहे हे कसे कळेल?

**दादाश्री :** जेव्हा बाहेरून कुठल्याही वस्तूमधून सुख आलेले नसेल, काही पाहून सुख उत्पन्न झालेले नसेल, काही ऐकल्याने, खाल्ल्याने, स्पर्श केल्याने, गारव्याने सुख उत्पन्न झालेले नसेल, कुठल्याही प्रकारचे इंद्रियसुख नसेल, पैशांमुळे आलेले सुख नसेल, कोणी आदर-सत्कार करणारा नसेल, विषयसुख नसेल, तरीही अशा वेळी आतमध्ये जे सुख वर्तत असते ते आत्म्याचे सुख आहे. पण तुम्हाला त्या सुखाची खास जाणीव वाटणार नाही. जोपर्यंत विषय असतात, तोपर्यंत आत्म्याचे स्पष्ट सुख जाणवत नाही.

## देहाध्यास सुटते तेव्हाच...

**प्रश्नकर्ता :** देहाध्यास गेला असे केव्हा म्हणता येईल?

**दादाश्री :** कोणी शिव्या देवो, खिसा कापला जावो, कोणी मारो, तरी पण तुम्हाला राग-द्वेष होत नसेल, तर तुमचा देहाध्यास गेला असे म्हणता येईल. जोपर्यंत आत्मज्ञान प्राप्त होत नाही, तोपर्यंत सर्व जग देहाध्यासानेच बांधलेले आहे. जेवढे विकल्प तेवढा देहाध्यास. देह गुन्हेगारीचे बंधन बांधण्यासाठी नाही, मुक्ती मिळवण्यासाठी आहे, जन्मोजन्मीचे गुन्हे सोबत घेऊन आलो आहोत ते संपवायला तर हवेत ना? देहाध्यास गेला तर 'चारित्र्यात' आला असे म्हणता येईल.

**प्रश्नकर्ता :** या देहात आत्म्याचे स्थान कुठे आहे?

**दादाश्री :** या केसात आणि नखात नाही, बाकी सर्व ठिकाणी आत्मा आहे. जिथे जिथे निखारा लावल्यावर भाजते अशा सर्व ठिकाणी आत्मा आहे.

**प्रश्नकर्ता :** 'जड'मध्ये चेतन कसे काय ठेवता येते?

**दादाश्री :** 'हे पेन माझे आहे' असे म्हटले, म्हणजे पेनात तुम्ही माझेपणाचे चेतन टाकले, म्हणून हे पेन जर माझ्याकडून हरवले तर तुम्हाला दुःख होईल!

## देह आणि आत्मा यांचे वेगळेपण

**प्रश्नकर्ता :** आत्मा आणि देह यांचा काय संबंध आहे?

**दादाश्री :** आत्मा आणि देह यांचा काहीही संबंध नाही. जशी माणसाबरोबर त्याची सावली असते, त्या सावलीचा माणसाशी जेवढा संबंध तेवढाच आत्मा आणि देह यांचा संबंध आहे. सूर्यनारायणाच्या अस्तित्वामुळे सावली निर्माण होते, त्याच प्रकारे आत्म्याच्या उपस्थितीने हे सगळे उत्पन्न होते. हे तर परक्या वस्तूला कवटाळून बसले आहेत.

जसे या लिफ्टमध्ये उभी असलेली व्यक्ती आणि लिफ्ट, या दोन गोष्टी वेगळ्या आहेत, तसेच आत्मा आणि देह हे दोन्ही वेगळेच आहेत. लिफ्टच सगळी कार्ये पार पाडते. तुम्हाला फक्त बटणच दाबावे लागते, एवढेच काम करावे लागते. हे न समजल्यामुळे लोक भयंकर *अशाता*

(दु:ख) आणि त्रास भोगतात. म्हणजे लिफ्टला उचलून घेण्यासारखे हे वादळ आहे. मन, वचन, काया या तिन्ही लिफ्ट आहेत. फक्त लिफ्टचे बटणच दाबायचे आहे. एक आत्मा आहे आणि दुसरा अहंकार आहे. ज्याला सांसारिक पौद्गलिक वस्तू हव्या असतील त्याने अहंकारपूर्वक बटण दाबायचे आहे आणि ज्याला संसारी वस्तू नको असतील त्याने आत्म्याच्या भावाने बटण दाबायचे आहे. आत्म्याच्या भावाने का? तर सुटायचे आहे, मोक्षाला जायचे आहे. आता त्याला अहंकार करून मोक्ष लांबवायचा नाही म्हणून.

शरीराला काही लागले तर अहंकार म्हणतो, 'मला खूप लागले,' त्यामुळे खूप दु:ख सोसतो. आणि जर अहंकार म्हणाला, 'मला काहीच लागले नाही.' तर दु:ख होत नाही. म्हणजे माणूस फक्त अहंकारच करतो. वीतरागींचे गूढ विज्ञान जर समजले तर या जगात कुठल्याही प्रकारचे दु:ख होईल का!? आत्मा स्वत: तर परमात्माच आहे! आत्मा चैतन्य आहे आणि जड फक्त संबंध आहे. स्वत: संबंधी आणि जड फक्त संबंधच आहे. आपल्याला संयोगांचा संबंध झाला आहे, बंध झालेला नाही. आणि संयोग तर वियोगी स्वभावाचेच आहेत. एकदा 'ज्ञानी पुरुषां'कडून आत्मा प्राप्त केला की मग संयोग संबंध तर पूर्णपणे वियोगी स्वभावाचाच आहे.

## ...तिथे आहे खरे ज्ञान

खरे ज्ञान याची खूण काय? तर ते लहान मुलापासून ते वृद्धांपर्यंत– लहान मूल म्हणजे दीड वर्षांपासून ऐंशी वर्षांच्या वृद्धांपर्यंत, संसारी पदापासून, संन्याशी पदापर्यंतच्या, सर्व माणसांना आकर्षित करते ते खरे ज्ञान. कारण ही फॅक्ट (खरी) वस्तू आहे. बालकाला पण आत दर्शन होते. ज्या धर्मस्थानकात गेल्यावर मुलांचे डोके दुखते, तिथे खरा धर्म नाही, ते सर्व रिलेटिव्ह आहे.

जिथे वादावर विवाद होत नाही त्यालाच खरे ज्ञान म्हणतात. आणि जिथे वादावर विवाद होतो, संवाद होतो, प्रतिवाद होतो, भांडणे होतात, तिथे खरे ज्ञान नसते.

ज्ञान दोन प्रकारचे असते– एक ज्ञान संसारासाठी काय खरे आणि काय चुकीचे आहे, काय हितकर आहे आणि काय आहितकर आहे, ते सांगते, आणि दुसरे मोक्षमार्गाचे ज्ञान. त्यात जर मोक्षमार्गाचे ज्ञान प्राप्त झाले तर संसाराचे ज्ञान सहजच उत्पन्न होईल. कारण आता त्याला 'दृष्टी' मिळाली आहे ना! दिव्यदृष्टी मिळाली आहे! मोक्षमार्गाचे ज्ञान जर मिळाले नाही तर संसाराचे हिताहिताचे ज्ञान देणारे संत मिळायला हवेत. या काळात असे संत दुर्मिळ झाले आहेत.

## वज्रलेपम् भविष्यति

**प्रश्नकर्ता :** लोक देवाला धोका देऊन धर्मात भ्रष्टाचार करतात.

**दादाश्री :** ही फारच चुकीची गोष्ट आहे. म्हणून तर फार पूर्वीच ज्ञानींनी एक श्लोक सांगितला आहे :

*अन्य क्षेत्रे कृतम् पापम्, धर्मक्षेत्रे विनश्यति,*
*धर्मक्षेत्रे कृतम् पापम्, वज्रलेपम् भविष्यति.*

(इतर ठिकाणी केलेले पाप, धर्मक्षेत्रात धुतले जाते, धर्मक्षेत्रात केलेले पाप वज्रलेप होते, लाखो वर्षे जात नाही.)

वज्रलेप म्हणजे लाखो वर्षांसाठी खलास होतो! नरक मिळतो! जे स्वत:चेच अहित करत आहेत त्यांना आम्ही 'जागे असून झोपलेले' असे म्हणतो. यामुळे मनुष्यत्व तर निघून जाईलच, पण दु:खांचे डोंगर उभे राहतील. याला फक्त ज्ञानच थांबवू शकेल. खरे ज्ञान मिळाले पाहिजे. फक्त पश्चाताप करून काहीही निष्पन्न होत नाही. पश्चाताप तर धर्माची सुरुवातीची एक पायरी आहे.

**प्रश्नकर्ता :** चुकीचे काम करतो आणि पश्चाताप करतो आणि पुन्हा असेच सतत चालू राहते ना?

**दादाश्री :** पश्चाताप हार्टिली (मनापासून) व्हायला हवा.

चुकीचे ज्ञान मिळते त्यामुळे तृष्णा उत्पन्न होतात आणि या

चुकीच्या ज्ञानाच्या आराधनेमुळे दु:ख मिळते. नाही तर निसर्ग कुणाला दु:ख देण्यासाठी निर्माण झालेला नाही. माणसाव्यतिरिक्त इतर कोणत्याही प्राण्याला चिंता किंवा दु:ख नसते.

विकल्पी झाल्यानंतर माणूस अहंकारी बनतो. तोपर्यंत अहंकार नॉर्मल म्हटला जातो. साहजिक, वास्तविक अहंकार म्हटला जातो. विकल्पी झाला की तो जबाबदार झाला. आणि जबाबदार झाल्यावर दु:ख येते. जोपर्यंत विकल्पी होत नाही तोपर्यंत तो जबाबदार नसतो आणि तोपर्यंत निसर्ग कुणालाच दु:ख देत नाही.

**प्रश्नकर्ता :** माणसेच दु:ख उत्पन्न करतात?

**दादाश्री :** हो, आपणच उत्पन्न करतो, निसर्ग नाही. निसर्ग तर मदत करत असतो. ज्ञानाचा दुरुपयोग झाला की तुमच्यावर सैतानाचे राज्य सुरू होते, मग तिथे देव उभा राहत नाही.

## भगवंत स्वरूप, पण केव्हा?

**प्रश्नकर्ता :** जीव, आत्मा आणि भगवंत यात काय फरक आहे?

**दादाश्री :** स्वसत्तेत आला की त्यानंतर भगवंत म्हटला जातो. पुरुष झाल्यावर पुरुषार्थात येतो तेव्हा त्याला भगवंत म्हटला जातो, आणि जोपर्यंत प्रकृतीच्या सत्तेत आहे, तोपर्यंत जीव आहे.

'मी मरेन' असे भान ज्याला आहे तो जीव आहे आणि 'मी मरणार नाही' असे भान ज्याला आले तो आत्मा, आणि 'फुल स्टेज'ला आला तो भगवंत.

**प्रश्नकर्ता :** आत्मा भगवंत स्वरूप आहे असे कधी मानले जाते?

**दादाश्री :** स्वत:च्या स्वरूपाचे भान झाले की भगवंत स्वरूप होऊ लागतो, आणि जेव्हा कर्माचे ओझे उतरू लागते आणि शेवटी (ते ओझे संपून) पूर्ण स्वरूप होतो, तेव्हा स्वत:च परमात्मा होतो.

**प्रश्नकर्ता :** आत्मा दैहिक रूप धारण करतो तेव्हा त्याला जीव म्हणतात का?

**दादाश्री :** आत्मा दैहिक रूप धारण करत नाही. फक्त त्याची 'बिलीफ' (मान्यता) बदलते. 'मी चंदुलाल आहे' ती 'राँग बिलीफ' ठाम झाली आहे. खरोखर तर तुम्ही आत्मस्वरूपच आहात आणि आत्मस्वरूपात तुम्ही कधी मरतच नाहीत, फक्त 'बिलीफ'च मरते.

**प्रश्नकर्ता :** सगळ्यांचे आत्मे एक स्वरूपच आहेत, तरी पण प्रत्येकाचे अनुभव वेगवेगळे का असतात?

**दादाश्री :** प्रत्येक आत्मा समसरण मार्गात आहे. त्यांचे प्रवाह वेगवेगळे असल्यामुळे प्रत्येकाला वेगवेगळे अनुभव येतात.

**प्रश्नकर्ता :** शुद्धात्मा आणि अशुद्धात्मा दोन्ही आत्मा एकच आहेत का?

**दादाश्री :** अशुद्ध तर अपेक्षेच्या आधारे म्हटले जाते. 'मी चंदुलाल आहे' तर त्याला अशुद्ध म्हणतात, जीवात्मा म्हणतात. आणि ती 'राँग बिलीफ' जेव्हा फ्रॅक्चर होते आणि 'राईट बिलीफ' बसते तेव्हा 'शुद्धात्मा' म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** 'मी शुद्धात्मा आहे' असे म्हणतो त्यामुळे प्रचंड अहंकार तर निर्माण होत नाही ना?

**दादाश्री :** नाही, (हे ज्ञान मिळाल्यावर) तुम्ही स्वत: त्याच रूपाचे होऊन ते बोलता. स्वत:च्या स्वरूपातच बोलतात, त्यामुळे त्याला अहंकार म्हणता येत नाही. जिथे स्वत: नाही तिथे 'मी आहे' असे मानले तर तो अहंकार आहे.

**प्रश्नकर्ता :** खरे जीववाले कोणाला म्हणायचे?

**दादाश्री :** खरे जीववाले तर ज्याने आत्मा, शुद्धात्मा जाणला तो स्वत:च म्हटला जातो. नाही तर या देवळालाच जर देव मानले तर देव

कुठे जाणार? देवळालाच देव म्हणून त्यालाच चिकटून बसलो तर देव आपल्यावर हसेल, म्हणेल अरे, तू आंधळा आहेस की काय? मला तर ओळखत नाहीस आणि ह्या देवळालाच चिकटून बसलास! देवळालाच 'चेतन' मानत असतो.

## आत्मा मोक्षस्वरूप, तर मग मोक्ष कुणाचा?

**प्रश्नकर्ता :** आत्मा अजर आहे, अमर आहे, शरीरापासून वेगळा आहे, तर मोक्ष कुणाचा होतो?

**दादाश्री :** अहंकाराचा. अहंकाराचा मोक्ष झाला की अहंकार विलय होतो. जो उत्पन्न झाला होता त्याचा विलय होतो. अहंकारच बंधनात आहे, आत्मा बंधनात नसतोच. ज्ञानी पुरुष जेव्हा समजावून सांगतात तेव्हा अहंकाराचा मोक्ष होतो.

आत्मा शुद्धच आहे, मोक्षस्वरूपच आहे! कधी पण अशुद्ध झाला नाही किंवा बंधनात अडकला नाही!

हे सर्व जग 'इगोइजम'चे विजन (अहंकाराची दृष्टी) आहे. आकाशकुसुमवत् दाखवतो त्याचे नाव अहंकार. कधी डोळ्यावर हाताचा दाब पडला तर दोन चंद्र दिसतात. त्यात सत्य काय आहे? रहस्य काय आहे? अरे भाऊ, चंद्र तर एकच आहे, तुला हे समजत नाही म्हणून दोन दिसतात.

आरशासमोर चिमणी बसते तेव्हा काय तिथे दोन चिमण्या असतात? तरी पण तिला भ्रम होतो की आत दुसरी चिमणी आहे, म्हणून ती सारखी चोच मारत राहते. तिला लागतही असणार. तिला हाकलले तरी ती परत येते. तिला आपण विचारले, ताई कुणाला शोधत आहेस? तुझे नाही पती, नाही दीर, नाही सासू मग कोणाला शोधतेस? अशीच या लोकांना (गैरसमजूतीची) गाठ पडली आहे. हा आरसा म्हणजे एक मोठे 'सायन्स' आहे. आत्म्याचे 'फिजिकल' वर्णन करायचे म्हटले तर आरसा हे एकमात्र साधन आहे!

'मी आहे, मी आहे' असे बोलत राहतो म्हणून आत्मा म्हणतो, जा मग, तू आणि मी वेगळे! हा अहंकार संपला की 'तूच आहेस.' पण अहंकार आपलेआपण संपणार नाही, त्याला चटणीसारखे वाटता येत नाही, स्वत:च्या चुका दिसल्यावर अहंकार संपतो. अहंकार म्हणजेच चुकांचे स्वरूप.

## ब्रह्म आणि परब्रह्म याची ओळख

**प्रश्नकर्ता :** ब्रह्म आणि परब्रह्म म्हणजे काय?

**दादाश्री :** ब्रह्म म्हणजे आत्मा आणि परब्रह्म म्हणजे परमात्मा आहे. जोपर्यंत व्यक्ती देहधारी असेल तोपर्यंत तो आत्मा मानला जातो, परमात्मा मानला जात नाही. तीर्थंकर आणि ज्ञानी पुरुष यांना देहधारी परमात्मा मानले जाते.

**प्रश्नकर्ता :** हे जे ब्रह्म आहे, ते काय आहे?

**दादाश्री :** तुमचे नाव काय?

**प्रश्नकर्ता :** चंदुलाल.

**दादाश्री :** तुम्ही चंदुलाल आहात हे अगदीच चुकीचे नाही. बाय रिलेटिव्ह व्ह्यू पॉइंट यू आर चंदुभाई ॲन्ड बाय रियल व्ह्यू पॉइंट यू आर ब्रह्म! ब्रह्म म्हणजे आत्मा. पण ब्रह्माचे भान झाले पाहिजे ना?

**प्रश्नकर्ता :** मायिक ब्रह्म आणि अमायिक ब्रह्म, म्हणजे काय ते समजावून सांगा.

**दादाश्री :** असे आहे की मायिक ब्रह्माला ब्रह्म म्हणणे हा गुन्हा आहे. जो संभ्रमात पडलेला आहे त्याला ब्रह्म कसे म्हणू शकतो? मायिक म्हणजे संभ्रमात पडलेला. खऱ्या ब्रह्माला ब्रह्म म्हणू शकतो.

**प्रश्नकर्ता :** मनुष्य जर संपूर्ण ब्रह्मस्वरूप, परमात्मास्वरूप झाला तर तो बोलू शकतो का?

**दादाश्री :** जे बोलू शकत नाहीत, ते ब्रह्मस्वरूप झालेलेच नाहीत. संपूर्ण ब्रह्मस्वरूप केव्हा म्हटले जाते की ज्याला बाहेरचे संपूर्ण भान असते, संसारी लोकांपेक्षा देखील जास्त भान असते तेव्हा. देहभान निघून जाणे ती तर एकाग्रता आहे, त्या स्थितीला आत्मा प्राप्त झाला असे म्हणता येणार नाही. संपूर्ण ब्रह्मस्वरूप झाल्यानंतर वाणी असते, सर्व काही असते. कारण देह आणि आत्मा दोन्ही वेगळेच वर्ततात. हा कोट आणि शरीर जसे वेगळे आहेत तसे. दोन्ही आपल्या आपल्या निजधर्मात राहतात. ब्रह्म ब्रह्माच्या धर्मात आणि अनात्मा अनात्म्याच्या भागात राहतो. देहभान राहिले नाही ही ज्ञानाच्या पूर्णतेची, निर्विकल्प दशेची खूण नाही. एकाग्रता करणे, कुंडलिनी जागृत करणे या सर्व टेम्परारी (तात्पुरत्या) अवस्था आहेत. ती अवस्था संपल्यानंतर परत पूर्वीसारखाच होतो. या गोष्टी मदत करतात, पण ती पूर्ण दशा नाही.



# [ 8 ]
# सूझ, उदासीनता

## सूझ, समसरण मार्गाची देणगी

**प्रश्नकर्ता :** सूझ म्हणजे काय? तिला प्रेरणा म्हणून शकतो?

**दादाश्री :** प्रेरक हा डिस्चार्ज आहे. आत एकदम प्रकाश पडतो आणि त्यामुळे प्रेरणा होते. हा प्रकाश पडतो ती सूझ (दर्शन) आहे. सूझ हा एक अविरत प्रवाह आहे. पण त्यावर आवरणे आली आहेत त्यामुळे दिसत नाही. म्हणून जेव्हा काहीच सुचत नाही तेव्हा लोक जरा डोके खाजवतात की मग आत प्रकाश पडतो आणि एकदम काहीतरी सुचते. डोके खाजवतात तेव्हा काय होते माहीत आहे?

**प्रश्नकर्ता :** नाही, दादाजी.

**दादाश्री :** डोके खाजविले की ज्या चित्तवृत्ती इकडेतिकडे भटकत असतात, त्या जरा एकाग्र होतात. एकाग्रता झाली की पटकन आतून सुचते.

सूझ पडते याला जग पुरुषार्थ म्हणते. पण खरे तर हा पुरुषार्थ नाही. सूझ ही तर निसर्गाची देणगी आहे.

प्रत्येकाला सूझ असते, त्याच्या या सूझ वरून ती व्यक्ती समसरणमार्गाच्या प्रवाहात कितव्या मैलांवर आहे ते समजते. सहा

महिन्यांपूर्वीच्या आणि आताच्या सूझमध्ये फरक पडलेला असतो. ती वाढली तर तो किती मैलावर पोहोचला हे कळते. या जगात पाहण्यासारखी तेवढी एकच गोष्ट आहे. या माणसांमध्ये, शरीरामध्ये फक्त सूझच 'डिस्चार्ज' नाही. बाकी सर्व 'डिस्चार्ज' आहेत. सूझ स्वत: 'चार्ज' करत नाही पण सूझमधून 'चार्ज' उत्पन्न होतो. सूझमध्ये अहंकार मिसळला तर चार्ज उत्पन्न होतो. सूझमध्ये अहंकार नसतो पण मागून त्यात अहंकार मिसळतो.

**प्रश्नकर्ता :** सूझ आणि दर्शन एकच आहे का?

**दादाश्री :** एक आहे हे खरे, पण लोक दर्शनाला खूप खालच्या पातळीवर घेऊन जातात. दर्शन ही तर खूप उच्च गोष्ट आहे. वीतरागांनी सूझला दर्शन म्हटले आहे. भटकत असताना अकराव्या मैलाच्या पुढे गेलो तर तिथले दर्शन झाले. जसजसे पुढे चालत जातो, तशीतशी त्याची 'डेव्हलपमेंट' (प्रगती) वाढत जाते, आणि तसतसे त्याचे दर्शन वाढत जाते. आणि अखेर एक दिवस आत प्रकाश होतो की 'मी हा नाही, पण मी आत्मा आहे' म्हणजेच तेव्हा दर्शन निरावरण होते!

तुम्ही जे प्रोजेक्ट करता, ते सूझच्या आधारावर करता, मग जी प्रेरणा होते ती तुम्ही लिहिता. सूझ खूप सूक्ष्म गोष्ट आहे.

जगात अंतरसूझेला कोणी मदत केलेली नाही. योगामुळे अंतरसूझ खूप लवकर उमलते. पण योगात लोक चुकीच्या मार्गावर गेले म्हणून ते फक्त चक्रेच बघत राहतात!

सूझच्या नंतर भाव उत्पन्न होतात, जगात फारच थोडे लोक सूझमध्ये आणि भावामध्ये जागृत राहतात. सूझ आणि भाव, जे सहज प्रयत्नाने मिळतात, अप्रयास प्रयत्नाने मिळतात, तेच त्याच्यासाठी प्रकाशस्तंभ बनून जातात. एरवी ज्याला भाव जागृती असते त्याला जागृत असे म्हणतात, आणि सूझ जागृती ही तर फार उच्च कोटीची स्थिती आहे. भाव जागृतीत आला म्हणजे स्वप्नदशेतून आळोखेपिळोखे देऊन उठल्यावर थोडासा भानावर आला.

**प्रश्नकर्ता :** सूझ आणि प्रज्ञा यात काय फरक आहे?

**दादाश्री :** प्रज्ञा ही कायम स्वरूपी वस्तू आहे आणि सूझ बदलत राहते. जसाजसा पुढे जातो तशीतशी सूझ बदलत जाते. प्रज्ञा ही 'टेम्परररी परमनंट' वस्तू आहे. जोपर्यंत संपूर्णपद प्राप्त होत नाही, सिद्धदशा होत नाही तोपर्यंतच प्रज्ञा राहते. प्रज्ञा स्वरूप ज्ञानानंतरच उत्पन्न होते, मात्र सूझ ही प्रत्येकाला समसरण मार्गाच्या मैलावर उत्पन्न होणारे बक्षीस आहे.

आता जी सूझ येते ती पण संपूर्ण स्वतंत्र नसते. आत्मा परमात्मा स्वरूप आहे. तो चुकीचेही सुचवत नाही आणि बरोबरही सुचवत नाही. जेव्हा पापाचा उदय होतो तेव्हा चुकीचे सुचते आणि पुण्याचा उदय होतो तेव्हा बरोबर सुचते. आत्मा (स्वत:) काहीच करत नाही. तो फक्त स्पंदनांना पाहतच राहतो.

**प्रश्नकर्ता :** समज आणि सूझ यात फरक आहे का?

**दादाश्री :** समजला सूझ म्हणतात. समज म्हणजे दर्शन, ते दर्शन वाढत वाढत थेट केवलदर्शनापर्यंत जाते.

आम्ही तुम्हाला हे जे समजावतो त्याची तुम्हाला *गेड* बसते, म्हणून ते तुम्हाला पूर्णपणे नीट समजते. म्हणजे मी तुम्हाला जे सांगू इच्छितो ते तुम्हाला पॉइंट टु पॉइंट (मुद्देसूद)-तंतोतंत समजते. यालाच *गेड* बसली असे म्हणतात. प्रत्येकाचा व्ह्यू पॉइंट वेगवेगळा असतो, म्हणून प्रत्येकाला वेगवेगळे समजते. प्रत्येकाच्या दर्शनशक्तीच्या आधारावर गोष्ट 'फिट' होते.

**प्रश्नकर्ता :** जेव्हा सूझ येते तेव्हा ही सूझ आहे की अहंकार बोलत आहे, ते कळत नाही.

**दादाश्री :** अहंकाराची प्रतिस्पंदने चालू असतात म्हणून मनुष्य सूझेचा पूर्ण लाभ घेऊ शकत नाही. सूझ तर सगळ्यांनाच येत असते. जसाजसा अहंकार शून्य व्हायला लागतो, तशीतशी सूझ वाढत जाते.

ह्या सायंटिस्टांना (शास्त्रज्ञांना) सूझमध्ये दिसते, त्यांना ज्ञानात दिसत नाही. सूझ ही निसर्गाची देणगी आहे.

## उदासीनता कशाला म्हणतात?

मी सर्व परतत्त्वांपासून सर्वथा उदासीनच आहे.

मी सर्व परतत्त्वांपासून सर्वथा वीतरागच आहे.

उदासीन याचा अर्थ लौकिक भाषेतील उदास असा नाही, पण मी आता 'स्वतत्त्ववाला' झालो आहे म्हणून मला आता या परतत्त्वांची जरूर नाही. त्यामुळे 'त्याला' उदासीन भाव असतो. स्वत:चे सुख अनंत ऐश्वर्यवाले आहे असे भान झाल्यावर बाह्यवृत्ती होत नाहीत, त्यामुळे सर्व परद्रव्यांच्या बाबतीत वीतराग भाव असतो. स्वत:च्या स्वरूपाचे ज्ञान नसेल अशी उदासीनता आपल्याला (आत्मज्ञान प्राप्त झालेल्या महात्म्यांना) नसते, पण उल्हासित उदासीनता असते. भक्त लोकांच्या घरी तर लग्न प्रसंग असले तरीही त्यांना उदासीनता वाटते. आपल्याला तसे नसते.

आत्मस्वरूप प्राप्त केल्यानंतर प्रथम इतर सर्व जागी उदासीनता येते आणि शेवटी वीतरागता येते.

**प्रश्नकर्ता :** वैराग्य, उदासीनता आणि वीतरागता यात काय फरक आहे?

**दादाश्री :** वैराग्य हे क्षणजीवी (तात्पुरते) असते. वैराग्य उत्पन्न झाल्यापासून संपूर्ण वैराग्य वाढत राहते त्या सर्व भागाला वैराग्य म्हणतात. वैराग्य म्हणजे नावडते, नापसंद वाटू लागते ते. पण ते योग्य नाही. दु:ख आले की वैराग्य येते, आणि उदासीनता हे तर वीतरागतेचे प्रवेशद्वार आहे.

क्रमिकमार्गात उदासीनता ही फारच उच्च स्थिती आहे. क्रमिकमार्गात उदासीनता येणे म्हणजे सगळ्या नाशवंत गोष्टींबदलचा भाव (आवड) नष्ट होणे, आणि अविनाशीच्या शोधात निघाले असूनही ती प्राप्त होत नाही.

वैरागी व्यक्तीला जे 'आवडत नाही' ते त्याच्या स्वत:च्या शक्तीमुळे होत नाही. त्याला काही गोष्टी आवडतात आणि काही गोष्टी आवडत नाहीत असे असते. याउलट उदासीनता प्राप्त झालेल्या व्यक्तीला आत्मा मिळवण्याखेरीज अन्य कोणत्याच गोष्टीत रूची नसते.

**प्रश्नकर्ता :** वीतरागता वर्तत आहे की उदासीनता वर्तत आहे हे कसे समजायचे? या दोन्हीमध्ये फरक काय?

**दादाश्री :** उदासीनतेचा अर्थ राग-द्वेषावर पडदा टाकणे आणि वीतरागतेत राग-द्वेष होतच नाहीत. उदासीनतेमध्ये प्रथम सर्व वृत्ती मंद पडू लागतात आणि मग वीतरागता उत्पन्न होते. उदासीनता म्हणजे रुची पण होत नाही आणि अरुची पण होत नाही.

**प्रश्नकर्ता :** बाहेर कुठेही उल्हास वाटत नाही आणि आत राग-द्वेष होत नाहीत, याला काय म्हणतात?

**दादाश्री :** उदासीनतेमध्ये आतमध्ये उल्हास असतो पण बाहेर उल्हास दिसत नाही. मात्र वीतरागतेमध्ये आत आणि बाहेर सर्वत्र उल्हास असतो.



# [ 9 ]

# प्रतिष्ठित आत्मा : शुद्धात्मा

## जगाचे अधिष्ठान काय आहे?

'प्रतिष्ठित आत्मा' या जगाचा अधिष्ठान आहे. 'प्रतिष्ठित आत्मा' म्हणजे कोण? 'मी चंदुलाल आहे, हा देह माझा आहे, हे माझे आहे, मन माझे आहे', अशी प्रतिष्ठा केल्याने प्रतिष्ठित आत्मा बनतो. हा कशातून निर्माण झाला? तर अज्ञानातून. या मूर्तीत प्रतिष्ठा केली तर ती फळ देते, इथे तर भगवंतांच्या साक्षीने प्रतिष्ठा होत असते, मग ती कसे फळ देईल!

'प्रतिष्ठित आत्मा' हा नवीन शब्द आम्ही दिला आहे. लोकांना सोप्या भाषेत समजावे आणि भगवंतांनी सांगितलेले सहज समजता यावे, या प्रकारे तो शब्द योजला आहे.

**प्रश्नकर्ता :** 'प्रतिष्ठित आत्मा' *पुद्गल* आहे की चेतन आहे?

**दादाश्री :** *पुद्गल* आहे, पण त्याला चेतन भाव प्राप्त झाला आहे आणि आपण त्याला 'चार्ज झाला आहे' असे म्हणतो. ते विशेष भावाने परिणमीत होणारे *पुद्गल* आहे. आम्ही त्याला मिश्रचेतन म्हणतो.

**प्रश्नकर्ता :** आहार, भय, निद्रा आणि मैथुन, या चार संज्ञा ह्या गाठी आहेत की प्रतिष्ठित आत्म्याचा स्वभाव आहे?

**दादाश्री :** तो प्रतिष्ठित आत्म्याचा स्वभाव नाही, प्रतिष्ठित आत्मा

'इगोइजम'चा (अहंकाराचा) पुतळा आहे. जितके भाव त्यात भरले होते, तितके भाव उत्पन्न होतात. आहार दिसला की आहाराची गाठ फुटते. काठी पाहिली की भीतीची गाठ फुटते. आहार, भय, मैथुन, निद्रा या संज्ञा गाठीच्या रूपात आहेत. संयोग मिळाला की गाठ फुटते.

प्रतिष्ठित आत्म्यात क्रोध, मान, माया आणि लोभ यांची प्रतिष्ठा झालेली आहे, ती आता फळ देत आहे. स्वरूपाचे ज्ञान झाले की प्रतिष्ठा बंद होते.

जगातील लोक म्हणतात 'माझा आत्मा पापी आहे' हे प्रतिष्ठित आत्म्यासाठी बोलले जाते. मूळ आत्मा तर शुद्धात्मा आहे, तो क्षणभर देखील अशुद्ध झाला नाही. आत्म्याचे जे पर्याय आहेत ते अशुद्ध झाले आहेत, म्हणून प्रतिष्ठा केली जाते की 'मी हा आहे, हे माझे आहे.'

'चार्ज' होते वेळी प्रतिष्ठित आत्मा नसतो. 'चार्ज' मध्ये तर 'स्वत:'च असतो. 'डिस्चार्ज' होताना प्रतिष्ठित आत्मा असतो.

## व्यवहार आत्मा : निश्चय आत्मा

**प्रश्नकर्ता :** शुभ-अशुभ असे भाव होतात ते कुणाला होतात? प्रतिष्ठित आत्म्याला?

**दादाश्री :** असे आहे की जेव्हा प्रतिष्ठित आत्मा शुभ आणि अशुभ असे भाव करतो, तेव्हा त्याला प्रतिष्ठित आत्मा म्हणत नाहीत, तेव्हा तर त्याला 'व्यवहार आत्मा' असे म्हणतात. प्रतिष्ठित आत्मा तर ज्याला स्वरूपाचे ज्ञान मिळाले त्यानंतर जो बाकी उरला तो प्रतिष्ठित आत्मा आहे. देहात जी 'मी पणा'ची प्रतिष्ठा केली होती, त्या प्रतिष्ठेचे फळ अजून शिल्लक आहे. स्वरूप ज्ञान मिळण्यापूर्वी 'प्रतिष्ठित आत्मा' म्हणत नाहीत, तेव्हा त्याला 'व्यवहार आत्मा' म्हणतात.

**प्रश्नकर्ता :** जेव्हा व्यवहार आत्मा शुभ-अशुभ भाव करतो, तेव्हा चैतन्य आत्म्याला *वळगण* (लागण) कशी होते?

**दादाश्री :** हे शुभ, अशुभ भाव होतात, त्यात व्यवहार आत्मा

एकटाच नसतो, त्याच्या बरोबर निश्चय-आत्मासुद्धा असतो. 'त्याची' मान्यताच अशी असते की 'हाच मी आहे, एकच आहे.'

**प्रश्नकर्ता :** निश्चय आत्मा म्हणजे काय?

**दादाश्री :** निश्चय आत्मा म्हणजेच शुद्धात्मा. हा जो 'व्यवहार आत्मा' आहे तो व्यवहाराने कर्ता आहे आणि निश्चयाने अकर्ता आहे.

**प्रश्नकर्ता :** निश्चय आत्मा भावाचा तर कर्ता आहे ना?

**दादाश्री :** नाही, तो भावाचा पण कर्ता नाही. भावाचा कर्तासुद्धा स्वरूपाच्या अज्ञानतेमुळेच!

**प्रश्नकर्ता :** भाव कधी होतात?

**दादाश्री :** स्वरूपाबद्दल अज्ञानता असते तेव्हा भाव आणि अभाव होतात.

**प्रश्नकर्ता :** ज्ञान असेल तर भाव होतात का?

**दादाश्री :** ज्ञान असेल तर भाव होतच नाहीत. ज्ञान असते तिथे स्वभाव-भाव असतो आणि जिथे ज्ञान नसते तिथे भाव असतात. जिथे मिथ्यात्व आहे तिथे भाव किंवा अभाव असतो, जिथे समकित आहे तिथे ते नसतात.

**प्रश्नकर्ता :** ज्ञान हजर असेल तरच भाव-अभाव होणार ना?

**दादाश्री :** हो, आत्मा असेल तरच भाव-अभाव होतात, नाही तर या 'टेपरेकॉर्डर'ला भाव-अभाव होत नाहीत.

**प्रश्नकर्ता :** शुद्धात्म्याने परलक्ष्य केले म्हणून भाव-अभाव झाले?

**दादाश्री :** शुद्धात्मा परलक्ष्य करतच नाही. 'शुद्धात्मा' तर 'शुद्धात्मा'च राहतो. निरंतर ज्ञानासहित, संपूर्ण ज्ञानासहितच असतो. परलक्ष्याला पण तो स्वत: जाणतो की हे परलक्ष्य कोणी केले!

**प्रश्नकर्ता :** परलक्ष्य करणारा कोण आहे?

**दादाश्री :** एवढेच जरी 'ज्ञानी पुरुषां'कडून समजून घेतले तर मग या संसाराची सगळी स्पष्टीकरणे मिळतील. इथेच *'गेड'* बसली पाहिजे (नीट समजले पाहिजे) की प्रेरणा देणारा कोण आहे?

**प्रश्नकर्ता :** भाव उद्‌भवतात याला प्रेरणा म्हणतात का?

**दादाश्री :** नाही, तो आत्म्याचा गुण नाही. ते तुमच्या अज्ञानतेमुळे निर्माण झाले आहेत.

**प्रश्नकर्ता :** अज्ञानता कधी होते? ज्ञानाच्या हजेरीतच होते ना?

**दादाश्री :** हो, ज्ञान आहे तर अज्ञान आहे. जसे एखादा दारू प्यालेला माणूस, ज्याचे नाव चंदुलाल शेठ, तो जर 'मी सयाजीराव गायकवाड आहे' असे बोलू लागला तर आपल्याला समजते ना, की हा दारूचा अंमल आहे. याच प्रकारे हा अज्ञानाचा अंमल आहे.

**प्रश्नकर्ता :** अज्ञान ज्ञानमय झाले तर?

**दादाश्री :** मग त्याला अज्ञान म्हणतच नाहीत. मग तर ज्ञानमय परिणामच वर्तत असतात. आणि जोपर्यंत अज्ञान आहे तोपर्यंत अज्ञानमय परिणामच वर्तत राहतात. मग त्याने तप केले, जप केला, शास्त्रे वाचली किंवा आणखी कोणत्याही क्रिया केल्या, तरी पण त्यामुळे त्याला कर्मबंधनच होईल. पण ती कर्मे भौतिक सुख देणारी असतात.

**प्रश्नकर्ता :** आत्म्याचा यात काहीच दोष नाही मग त्याला बंधन का होते?

**दादाश्री :** स्वत:चा दोष तेव्हाच म्हटला जातो की जेव्हा तो संपूर्ण दोषी असेल. नैमित्तिक दोषाला दोष म्हणत नाहीत. माझ्या धक्क्यानेच तुम्हाला धक्का लागला आणि त्यामुळे तिसऱ्याला धक्का लागला, तर तो तिसरा तुम्हाला दोषी मानतो. याच प्रमाणे आत्मा स्वत: या भावाचा कर्ता नाही पण हे नैमित्तिक धक्क्यांमुळे, 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एव्हिडेन्सेस्'मुळे होत असते.

**प्रश्नकर्ता :** 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एव्हिडेन्स' चेतनाला लागू होते की अचेतनाला?

**दादाश्री :** मान्यतेला लागू होते, प्रतिष्ठित आत्म्याला लागू होते. प्रतिष्ठित आत्म्यात देखील खूप शक्ती आहे. तुम्ही, चंदुलालनी इथे बसल्याबसल्या शारदाताईच्या बाबतीत जरासाही वाईट विचार केला तर तो त्यांना घरी बसल्याबसल्या पोहोचेल!

**प्रश्नकर्ता :** तुमच्या आणि आमच्या प्रतिष्ठित आत्म्यात काय फरक आहे?

**दादाश्री :** काही फरक नाही. तुमच्यात अज्ञानता होती त्यामुळे चंचलता आहे. आमच्यात नाम मात्र चंचलता नाही.

## 'ज्ञानी' कोण? 'दादा भगवान' कोण?

**प्रश्नकर्ता :** 'दादा भगवान' म्हणजे नक्की काय? 'ए. एम. पटेल' यांचा आत्मा हाच 'दादा भगवान' आहे का?

**दादाश्री :** होय. दोन प्रकारचे आत्मे आहेत, एक 'मेकॅनिकल आत्मा' आणि एक 'दरअसल आत्मा' (मूळ आत्मा). 'मेकॅनिकल आत्मा' चंचल असतो आणि 'दरअसल आत्मा' तोच 'दादा भगवान' आहे.

हा जो बोलतो, खातो, पितो, व्यापार करतो, शास्त्रे वाचतो, धर्मध्यान करतो, ते सर्व 'मेकॅनिकल' आहे. तो 'दरअसल आत्मा' नाही. तुमच्यात देखील जो 'दरअसल आत्मा' आहे, तोच 'दादा भगवान' आहे, तोच 'परमात्मा' आहे.

हा जो सगळा व्यवहार करतो तो 'मेकॅनिकल आत्मा' करतो. जप, तप, ध्यान, शास्त्रांचे वाचन हे सगळे 'मेकॅनिकल आत्मा' करतो. कशासाठी? तर 'अविचल आत्मा' प्राप्त करण्यासाठी. पण मुळात चूक अशी आहे की तो 'मेकॅनिकल आत्म्यालाच' 'मी आत्मा आहे' असे मानतो. आणि त्याला सुधारण्याचा प्रयत्न करतो. क्रोध-मान-माया-लोभ

यांना दाबण्यासाठी, त्यांचा नाश करण्यासाठी अनेक उठाठेवी करतो. पण हे गुण कोणाचे आहेत? आत्म्याचे आहेत का? पण हे न ओळखल्यामुळे अनंत जन्म सतत त्रास सोसत आला आहे. क्रोध, मान, माया, लोभ हे आत्म्याचे व्यतिरेक गुण आहेत. अन्वय गुण नाहीत. अन्वय गुण म्हणजे आत्म्याचे स्वाभाविक गुण, निरंतर सोबत राहणारे गुण. याउलट व्यतिरेक गुण म्हणजे आत्म्याच्या फक्त हजेरीमुळे *'पुद्गलात'* उत्पन्न होणारे गुण!

**प्रश्नकर्ता :** 'मेकॅनिकल आत्मा' आणि 'शुद्धात्मा' यात काय फरक आहे?

**दादाश्री :** 'मेकॅनिकल आत्मा' हा आत्म्यापासून प्रतिबिंब उत्पन्न झाले आहे, तो त्याच स्वरूपात दिसतो. त्याच्यात 'दरअसल आत्म्याचे' गुणधर्म नसतात पण तशीच लक्षणे दिसतात. म्हणून पूर्ण जग यातच फसले आहे. 'मेकॅनिकल आत्म्यात' अचलता नसते.

**प्रश्नकर्ता :** तुमच्यात 'ज्ञानी' कोण आहे आणि 'दादा भगवान' कोण आहे? हे समजत नाही.

**दादाश्री :** ज्ञानाची वाक्ये जे बोलतात त्यांना व्यवहारात 'ज्ञानी' म्हणतात. आणि दादा भगवान आत प्रकट झाले आहेत, त्याशिवाय तर ज्ञानाची वाक्ये बोललीच जाणार नाहीत. आत प्रकट झाले आहेत ते 'दादा भगवान' आहेत. आम्हाला पण ते पद प्राप्त करायचे आहे, म्हणून आम्ही पण 'दादा भगवान' यांना नमस्कार करतो. काही वेळा आम्ही 'दादा भगवान' यांच्याशी अभेद स्वरूपात असतो, तन्मय असतो आणि वाणी बोलते वेळी आतमध्ये 'भगवान' वेगळे आणि 'आम्ही' वेगळे!



# [ 10 ]
# जगसंचालकाची वस्तुस्थिती

## ज्याला सर्व भगवंत मानतात...

कोणीही बाप तुमचा *उपरी* (मालक, वरिष्ठ) नाही. कोणी *उपरी* नसतोच, कोणी बॉस नसतोच. विनाकारण का घाबरतोस? अरे 'भगवंत' पण तुझा *उपरी* नाही. तू स्वतःच भगवंत आहेस, पण त्याचे भान झाले पाहिजे. आणि जोपर्यंत स्वतःच भगवंत आहे याचे भान होत नाही तोपर्यंत भगवंताला *उपरी* मानले पाहिजे, तोपर्यंत भक्त बनून राहिले पाहिजे आणि एकदा भान झाले की मग भक्तपणा सुटतो!

कोणीही बाप तुझा *उपरी* नाही, याची मी 'गॅरंटी' देतो. 'तो असे करील, तो तसे करील' अशी भिती विनाकारण तुझ्या मनात घुसली आहे. म्हणून तुला घाबरायचे काहीच कारण नाही आणि तुझ्या 'व्यवस्थित'मध्ये असले तर तुला कोणी सोडणारही नाही. साधे 'इन्कमटॅक्स' ऑफिसचे पत्र आले की शेठ घाबरतात. अरे, ते पत्र म्हणजे तुझ्या 'व्यवस्थित'चा एक संयोग आहे. 'इन्कमटॅक्स'वाला म्हणजे सरमुखत्यार नाही. म्हणून भगवंताला *'उपरी'* मानण्याची भानगड सोड ना! या भगवंताला *'उपरी'* मानण्याऐवजी आपल्या 'बायकोलाच' *उपरी* मानली तर ती भजी तरी बनवून देईल! अरे, तू स्वतःच भगवंत आहेस. पण तुला याची जाणीव नाही. जोपर्यंत याची जाणीव नाही तोपर्यंत भगवंताला *उपरी* मानत राहतोस. पण कोणते भगवंत? जर तुला भगवंतालाच *उपरी* ठेवायचे असेल तर कोणत्या भगवंताला ठेवशील? वर बसलेल्याला नाही. वर कोणीच नाही.

वर तर फक्त आकाश आहे. भगवंत तर आत बसला आहे तो आहे. जो आत बसला आहे, तोच भगवंत आहे, हीच खरी थियरी आहे. त्याचे नाव 'शुद्धात्मा'. त्याला काहीही नाव द्या, पण आत बसलेल्याचाच शोध घेतला तर काम होईल. भगवंत वर आहे, वर आहे अशा वावड्या उठवून, तिकडे पत्र पाठवून, विनंती अर्ज करून काहीही निष्पन्न होणार नाही.

लोक भगवंताचे अवलंबन घेतात पण ते कशाच्या आधारावर? भगवंताला ओळखल्याशिवाय त्याचे अवलंबन कसे काय घेता येईल? भगवंताची प्रथम ओळख व्हायला हवी. पण संपूर्ण जगच भगवंताला ओळखत नाही.

## ...ती तर 'मेकॅनिकल ॲडजस्टमेंट'

ह्या जगाला जी शक्ती चालवीत आहे तिलाच जग भगवंत मानते. पण प्रत्यक्षात जगाला चालविणारा 'भगवंत' नाही. ती तर केवळ एक 'मेकॅनिकल ॲडजस्टमेंट' आहे, 'कंप्युटर'सारखी आहे. आणि 'मशिनरी' वीतराग असते की राग-द्वेषवाली?

**प्रश्नकर्ता :** हो, ती वीतराग असते.

**दादाश्री :** तर ही जग चलविणारी शक्ती 'वीतराग' आहे. जी 'मेकॅनिकल ॲडजस्टमेंट' आहे, तिलाच लोक भगवंत असे समजतात. या शक्तीमध्ये वीतरागतेचा गुण आहे, पण ही शक्ती भगवंत नाहीच, ती तर केवळ 'सायंटिफिक सरकमस्टेन्शियल एव्हिडेन्स' आहे. पण लोकांना याचे भान नाही, बेभानपणे सगळे चालू आहे. आणि ज्याला स्वतःच्या स्वरूपाचे भान झाले की मग त्याचे एविडेन्सेस् (संयोग) बदलतात, तो सुटतो, मुक्त होतो! 'मीच चंदुलाल आहे' ही 'रॉंग बिलीफ' आहे.

'दी वर्ल्ड इज दी कम्प्लीट ड्रामा इटसेल्फ.' (हे जग स्वतःच एक नाटक आहे.) या नाटकाची व्यवस्था पण 'इटसेल्फ' (आपोआपच) निर्माण झाली आहे, आणि शिवाय ही व्यवस्था पूर्णपणे 'व्यवस्थित शक्ती'च्या ताब्यात आहे.



# [ खंड : 2 ]

# व्यवहार ज्ञान

## [ 1 ]

## जीवन जगण्याची कला

### अशा आयुष्याला काय अर्थ?

या आयुष्याचा हेतू काय असेल, हे तुम्हाला समजते का? काही तरी हेतू असेलच ना? आधी बालपण, मग म्हातारपण आणि नंतर तिरडी निघते. तिरडी निघते तेव्हा तर दिलेले नाव देखील परत घेतले जाते, येथे जन्माला आले की लगेच नाव दिले जाते ते व्यवहार चालविण्यासाठी! जसे नाटकातील नटाला भर्तृहरी नाव दिले जाते ना? नाटक संपले की नाव पण संपले. याचप्रकारे व्यवहार चालविण्यासाठी नाव देतात आणि त्या नावावर बंगला, गाडी, पैसे ठेवतात आणि जेव्हा अंत्ययात्रा निघते तेव्हा मात्र हे सगळे जप्त केले जाते. लोक आयुष्य जगतात आणि मग एक दिवस मरतात, अर्थात या सगळ्या अवस्था आहेत. आता या जीवनाचा हेतू मौज-मजा करणे असेल की मग परोपकार करण्यासाठी असेल? किंवा मग लग्न करून संसार थाटणे हा हेतू असेल? लग्न तर अनिवार्य असते. एखाद्यासाठी लग्न अनिवार्य नसेल तर लग्न होत नाही. पण सर्व सामान्यपणे लग्ने तर होतातच ना?! नाव कमावणे हा आयुष्याचा हेतू आहे का? पूर्वीच्या काळी सीता, अनुसूया अशा सती होऊन गेल्या. त्यांचे खूप नाव झाले! पण तरीही

नाव तर इथल्या इथेच राहणार आहे. मग सोबत काय घेऊन जायचे आहे? तर तुम्ही केलेला गुंता!

तुम्हाला मोक्षाला जाण्याची इच्छा असेल तर जा, आणि नसेल तर नका जाऊ. पण इथे तुम्ही केलेले सर्व गुंते सोडवून जा. इथे तर प्रत्येक प्रकारचे खुलासे होतात. वकील फक्त व्यावहारिक अडचणींवरील सल्ले देतात तरीदेखील फी आकारतात! पण हा तर अमूल्य खुलासा, याचे मोलच होऊ शकत नाही ना! जीवनात खूप गुंतागुंत आहे. फक्त तुम्हालाच आहे असे नाही, सगळ्यांनाच आहे. 'द वर्ल्ड इज द पजल इट सेल्फ' हे 'जग' स्वत:च एक कोडे झाले आहे.

धर्म तर नंतर करायचा आहे, परंतु तत्पूर्वी जीवन जगण्याची कला समजून घ्या आणि लग्न करण्याआधी बाप होण्यासाठी योग्यतापत्र मिळवा. एक इंजिन आणले, त्यात पेट्रोल टाकले आणि सतत चालवित राहिलो, पण हे असे मिनिंगलेस जीवन काय कामाचे? जीवन तर हेतूसहित असले पाहिजे. इथे तर इंजिन चालतच राहते, चालतच राहते, असे निरर्थक चालता कामा नये. इंजिनाला पट्टा जोडला तर काही दळले तरी जाईल. पण इथे तर पूर्ण आयुष्य संपत येते तरीही काही दळले जात नाही. आणि शिवाय पुढील जन्माचे गुन्हे (कर्म) बांधून घेतात.

संपूर्ण आयुष्यच फ्रॅक्चर झाले आहे. कशासाठी जगत आहोत याचे भानच उरलेले नाही. मी मनुष्यसार काढण्यासाठी जगत आहे याचे भानच नाही. मनुष्यसार म्हणजे काय? तर, पुढील जन्मी ज्या गतीत जायचे असेल ती गती मिळवणे किंवा मोक्षाला जायचे असेल तर मोक्षाला जाता येणे! या अशा मनुष्यसाराचे कोणाला भानच नाही, म्हणून तर निरर्थक भटकत राहतात.

## पण ती कला कोण शिकवणार?!

आज जगाला हिताहिताचे भानच नाही, कित्येकांना संसाराच्या हिताहिताचे भान असते, कारण कित्येकांनी ते बुद्धीच्या आधारावर ठरवलेले असते पण ते सांसारिक भान म्हटले जाते की मी संसारात कशाप्रकारे सुखी

होऊ शकेन? खरे पाहिले तर हे सुद्धा 'करेक्ट' नाही. 'करेक्टनेस' तर केव्हा म्हटले जाईल की, जेव्हा जीवन जगण्याची कला शिकला असेल. कोणी वकील झाला म्हणजे त्याला जीवन जगण्याची कला आली असे नाही. कोणी डॉक्टर झाला म्हणजे त्याला जीवन जगण्याची कला जमली असेही नाही. तुम्ही 'आर्टिस्ट' ची कला शिकली किंवा अशीच एखादी दुसरी कुठली कला शिकली पण एवढ्याने तुम्हाला जीवन जगण्याची कला आली असे म्हणता येणार नाही. जीवन जगण्याची कला शिकण्यासाठी तर एखादा मनुष्य अगदी आनंदाने चांगल्या प्रकारे जीवन जगत असेल अशा मनुष्याला आपण विचारावे की तुम्ही इतक्या आनंदाने जीवन कसे काय जगता, मलाही असे काही शिकवा. मी कसे वागू की ही कला मलाही अवगत होईल? यासाठी तर कलावंत हवा, याचा गुरु असायला हवा, पण याची तर कोणाला पर्वाच नाही. जीवन जगण्याच्या कलेची गोष्टच उडवून दिली आहे ना! आमच्याजवळ जो कोणी राहील त्याला ही कला अवगत होईल. पण तरी जगात कुणाजवळच ही कला नाही असे आपण म्हणू शकत नाही. पण जर जीवन जगण्याची कला 'कम्प्लीट' शिकलेली असेल तर लाईफ इजी (जीवन सोपे) बनते पण तरी धर्मसुद्धा सोबत पाहिजेच. जीवन जगण्याच्या कलेत धर्म ही मुख्य वस्तू आहे. आणि धर्मातसुद्धा इतर काही नाही, मोक्षधर्माचीही गोष्ट नाही, फक्त भगवंताच्या आज्ञारूपी धर्माचे पालन करायचे. महावीर भगवंत किंवा कृष्ण भगवंत किंवा तुम्ही ज्या भगवंताला मानत असाल त्यांची आज्ञा काय सांगू इच्छिते ते समजून त्याचे पालन करावे. तुम्ही सगळ्या आज्ञा पालन करू शकत नसाल तर जितक्या पाळता येतील तितक्या पाळा. जर आज्ञेत असेल की, 'ब्रह्मचर्य पाळा' आणि तुम्ही लग्न केलेत तर तो विरोधाभास म्हटला जाईल. खरे तर ते तुम्हाला असे सांगत नाहीत की, तुम्ही असे विरोधाभासाने वागा. ते तर असे सांगू इच्छितात की तुला आमच्या जितक्या आज्ञा पाळता येतील तितक्या पाळ. आपणास दोन आज्ञा पाळण्याचे जमले नाही म्हणून काय बाकीच्या सर्व आज्ञा पाळणे सोडून द्यायचे? तुम्हाला काय वाटते? समजा, दोन आज्ञा पाळता येत नाहीत पण दुसऱ्या दोन आज्ञा पाळल्या तरी खूप झाले.

लोकांना व्यवहार धर्म पण इतका उच्च प्रतीचा मिळायला हवा

की त्यामुळे लोकांना जीवन जगण्याची कला येणे सहज शक्य होईल. जीवन जगण्याची कला येणे यालाच व्यवहारधर्म म्हटले आहे. ही कला काही तप, त्याग केल्याने येत नाही, अजीर्ण झाले तर उपवास वगैरे जरूर करा. ज्याला जीवन जगण्याची कला जमली त्याला संपूर्ण व्यवहारधर्म समजला आणि निश्चय धर्म तर डेव्हलप होऊन आला असाल तेव्हा प्राप्त होते आणि या अक्रम मार्गात तर निश्चय धर्म ज्ञानींच्या कृपेमुळेच प्राप्त होत असतो! 'ज्ञानी पुरुषां' जवळ अनंत ज्ञानकला असतात आणि अनंत प्रकारच्या बोधकलाही असतात! त्या कला इतक्या सुंदर असतात की त्या आपल्याला सर्व प्रकारच्या दु:खातून मुक्त करतात.

## समज कशी? की दु:खमय जीवन जगलो

'हे' ज्ञानच असे आहे की, जे सर्व सुलट (सरळ) करते, आणि जगातील लोक तर असे आहेत की आपण सुलट टाकले असेल तरीही त्यास उलट करतील. कारण समजच चुकीची आहे. चुकीची समज असल्यामुळे ते चुकीचे करतात, नाही तर या हिंदुस्तानात कुठेच दु:ख नाही. ही जी काही दु:खे आहेत ती सर्व चुकीच्या समजुतीमुळेच आहेत आणि लोक विनाकारण सरकारला दोष देतात, देवाला दोष देतात की तू आम्हाला दु:खे देतोस! लोक फक्त दोष देण्याचेच शिकले आहेत.

समजा आता जर कोणी चुकून ढेकूण मारण्याचे औषध प्यायले तर ते औषध त्याला सोडेल का?

**प्रश्नकर्ता :** नाही सोडणार.

**दादाश्री :** का बरे? त्याने तर चुकून प्यायले होते ना? त्याने काही जाणूनबुजून प्यायलेले नव्हते, मग का नाही सोडणार?

**प्रश्नकर्ता :** नाही. औषधाचा परिणाम होणारच.

**दादाश्री :** तर मग त्याला कोणी मारले? तर ढेकूण मारण्याच्या औषधानेच त्याला मारले, देव मारत नाही. दु:ख देणे किंवा दुसरी एखादी

गोष्ट करणे, हे असे सर्व देव करत नाही. *पुद्गल* (जे पूरण आणि गलन होते)च दुःख देते. ढेकूण मारण्याचे औषध सुद्धा *पुद्गलच* आहे ना? तुम्हाला याचा अनुभव होतो की नाही? या काळातील जीव पूर्वविराधक वृत्तीवाले आहेत, पूर्वविराधक म्हटले जातात. पूर्वीच्या काळातील लोक तर खाण्या-पिण्याचे नसले, कपडे-लत्ते नसले तरीही चालवून घेत असत आणि सध्या तर कशाचीच कमी नाही, सगळी रेलचेल आहे तरी पण भांडणच भांडण! त्यातही नवऱ्याला 'सेल्स टॅक्स', 'इन्कम टॅक्सच्या' कटकटी. म्हणून तिथल्या साहेबांना नवरा घाबरतो आणि घरी बाईसाहेबांना विचारले की, तुम्ही का घाबरता? तर ती म्हणेल 'माझा नवरा खूप तापट आहे.'

जीवनाला आवश्यक असणाऱ्या चार गोष्टी मिळाल्या असतील आणि तरीही ते कुरकुर करतात, अशा सर्वांना मूर्ख, फुलीश म्हटले जाते. वेळेवर खायला मिळते की नाही मिळत? मग ते कसेही असो, तूप लावलेले किंवा बिन तुपाचे असो पण मिळते ना? वेळेवर चहा मिळतो की नाही? मग एकदा असो किंवा दोनदा असो, पण चहा मिळतोच ना? आणि कपडे मिळतात की नाही? शर्ट-पॅन्ट, थंडीत घालण्यासाठी स्वेटर वगैरे मिळतात की नाही मिळत. राहण्यासाठी निवारा आहे की नाही? एवढ्या चार गोष्टी मिळून देखील कुरबुरत असतील अशा सगळ्यांना तुरुंगातच टाकायला हवे! एवढे असूनही एखाद्याची तक्रार असेल अशा व्यक्तीने लग्न करून घेतले पाहिजे. लग्नासंबंधी तक्रार असेल तर त्याला तुरुंगात टाकत नाहीत. वय झाले असेल त्याला लग्नासाठी मनाई केली जात नाही. या चार वस्तूंसोबत लग्नाचीही आवश्यकता आहे. पण लग्न करून देखील कित्येक जण लग्न मोडतात आणि नंतर एकटे राहतात आणि दुःखांना आमंत्रण देतात. झालेले लग्न मोडतात, कसली ही माणसे? या चार-पाच गोष्टी नसतील तर आपण समजू शकतो की या भाऊंना थोडीशी अडचण आहे, पण तरी याला दुःख म्हणत नाही, अडचण म्हणतात. लोक तर संपूर्ण दिवस दुःखातच घालवतात. मनुष्य दिवसभर नवनवीन तरंग (कल्पना) करत राहतो. निरनिराळे तरंग करत राहतो!

एका व्यक्तीचा चेहरा थोडासा हिटलरसारखा होता. त्याचे नाक जरासे हिटलरसारखे होते. तो मनात असे मानू लागला की, आपण हिटलरसारखे आहोत! अरे वेडपट! कुठे हिटलर आणि कुठे तू? स्वत:ला काय मानून बसलास? हिटलरने तर फक्त एक आरोळी जरी मारली तरी पूर्ण जग हादरून जायचे! आता अशा लोकांच्या कल्पनांचा अंत कसा येईल!

अर्थात वस्तूंची गरज नाही, हे तर अज्ञानतेचे दु:ख आहे. आम्ही 'स्वरूप ज्ञान' देतो त्यानंतर दु:ख राहत नाही. आमच्या पाच आज्ञेत कुठे राहिले जात नाही तेवढेच तुम्ही पाहायचे! तुम्हाला खाणे-पिणे सगळे वेळेच्यावेळी मिळत जाईल आणि ते सुद्धा 'व्यवस्थित'च आहे. दाढी जर आपोआप उगवते मग तसेच खाणे-पिणेही नाही का मिळणार? या दाढीची इच्छा नाही तरी पण ती वाढतेच ना! आता तुम्हाला जास्त वस्तूंची गरज नाही ना? जास्त वस्तूंचा किती त्रास होतो! तुम्हाला 'स्वरूप ज्ञान' मिळण्यापूर्वी निरनिराळे तरंग येत होते ना? तरंगांना ओळखतात ना तुम्ही?

**प्रश्नकर्ता :** हो, तरंग येत होते.

**दादाश्री :** मनात निरनिराळे तरंग येतच असतात, या तरंगांना देवाने आकाशकुसुम म्हटले आहे. आकाशकुसुम कसे होते आणि कसे नव्हते? यासारखी गोष्ट आहे! सगळे लोक तरंग आणि अनंग या दोन्हीमध्येच गुंतलेले आहेत. असे सरळ थोबाडीत मारत नाहीत, सरळ थोबाडीत मारणे हे पद्धतशीरचे म्हटले जाईल. पण मनातल्या मनात सतत 'मी थोबाडीत मारेन, मी थोबाडीत मारेन' याप्रकारे अनंग थोबाडीत मारत राहतात. हे जग तरंगी भुतांमध्ये तडफडत राहते. असे झाले तर असे होईल आणि तसे झाले तर तसे होईल, सतत चालूच.

## अशा शौकाची गरजच काय?

संपूर्ण जग अनावश्यक वस्तूंचा परिग्रह (संग्रह) करण्यामध्येच गुंतलेले आहे. 'आवश्यक' वस्तूंना देवाने परिग्रह म्हटले नाही. म्हणून

प्रत्येकाने आपल्याला नेमके काय आवश्यक आहे ते ठरवायला हवे. या शरीराला मुख्यत्वे कसली गरज आहे? तर मुख्य गरज हवेची. ती तर त्याला क्षणोक्षणी हवी तेवढी मुबलक आणि मोफत मिळते. नंतर पाण्याची गरज आहे. ते पण त्याला फ्री ऑफ कॉस्ट मिळतच राहते. त्यानंतर गरज आहे अन्नाची. भूक लागते म्हणजे काय? तर आग. ही आग विझविण्यासाठी काय हवे? तेव्हा हे लोक म्हणतात श्रीखंड आणि बासुंदीच हवी आहे! अरे नाही, जे जवळ असेल ते टाक ना आत, म्हणजे भुकेची आग विझेल. कढी खिचडी टाकली तरीही विझेल. मग सेकंडरी स्टेजवर कशाची गरज आहे? घालायला कपडे आणि राहायला निवारा पाहिजे. जगण्यासाठी 'मानाची' गरज आहे का? नाही. पण हा तर मानासाठी हपापलेला असतो आणि त्यातच मूर्छित होऊन जगतो. तेव्हा हे सर्व 'ज्ञानी पुरुषां'कडून समजून घेतले पाहिजे ना?

एक दिवस जर नळामधून साखर घातलेले गोड पाणी यायला लागले तर एका दिवसातच लोकांना वीट येईल, अरे! एका दिवसातच कंटाळलात? तर म्हणेल 'हो, मला तर साधे पाणीच हवे आहे' एखादी गोष्ट जेव्हा मिळेनाशी होते तेव्हाच त्या गोष्टीची किंमत कळते. लोक फॅन्टा-कोकाकोलाच्या मागे असतात. अरे, तुला खरोखर कसली गरज आहे ते आधी समजून घे ना! तुला शुद्ध हवा, शुद्ध पाणी आणि रात्री खिचडी मिळाली तर शरीर काही तक्रार करणार आहे का? नाही. म्हणून खरोखर काय आवश्यक आहे ते प्रथम निश्चित करा. पण लोक तर एखाद्या विशिष्ट प्रकारचे आईस्क्रीमच शोधत बसतील! कबीर साहेबांनी काय म्हटले आहे?

'तेरा वेरी कोई नही, तेरा वेरी फेल!'

(तुझा शत्रू कोणीही नाही, अनावश्यक भौतिकवाद, चंगळवाद हाच तुझा शत्रू)

अनावश्यक वस्तूंसाठी विनाकारण धावपळ करत राहतो, यालाच 'फेल' म्हटले जाते. तू हिंदुस्तानात राहतोस आणि अंघोळीला पाणी मागितले तर आम्ही त्याला 'फेल' म्हणणार नाही.

'अपने फेल मिटा दे, फिर गली-गली में फिर.'

(अनावश्यक वस्तूंचा संग्रह सोडून दे, मग खुशाल इकडे-तिकडे फिर)

या देहासाठी काय आवश्यक आहे? शुद्ध दूध, शुद्ध तूप. पण ह्या शुद्ध वस्तू वापरणार नाहीत आणि पोटात कचरा भरत राहतील. या फेलची काय गरज? हे लोक डोक्याला काय लावतात बरे? शाम्पू. पाण्यासारखा दिसतो पण धड साबणही नाही असे काहीतरी डोक्याला लावणार. या अतिशहाण्यांनी असे शोध लावले की जे फेल नव्हते तेही फेल झाले! त्यामुळे अंतरिक सुख कमी झाले! भगवंताने काय सांगितले होते की, बाह्यसुख आणि अंतरसुख यांच्यात पाच-दहा टक्क्यांचा फरक असेल तर चालेल, पण इतका नव्वद टक्क्यांचा फरक असेल तर ते चालणार नाही. एवढा मोठा फरक असेल तर ते फेलच होणार! मरावेच लागेल. तसे याच्याने काही मरत तर नाही पण सहन करावे लागते. अनावश्यक गोष्टींच्या ज्या गरजा वाढवल्या आहेत त्या तर फक्त फेलच आहेत.

एक तास बाजार बंद झाला तरी लोक अस्वस्थ होतात! अरे, तुला असे काय हवे आहे की ज्यामुळे तुला एवढी बैचेनी होत आहे? तर म्हणे, मला आईस्क्रीम हवे आहे, सिगारेट हवी आहे! म्हणजे हे तर फेलच (अनावश्यक गोष्टीच) वाढविल्या ना? आत सुख नाही म्हणून लोक बाहेर शोधत राहतात. लोकांच्या आत जे अंतरिक सुख शिल्लक होते तेही आज संपून गेले आहे. अंतरसुखाचा बॅलेन्स संपवू नका. वाटेल तशी उधळपट्टी करून जवळ शिल्लक असलेलेही वापरून टाकले तर मग अंतरिक सुखाचे संतुलन कसे राहील? अस्सल जगणे चांगले की नक्कल करणे चांगले? आजकालची मुले एकमेकांची नक्कल करतात पण आपल्याला याची काय गरज? हे फॉरेनचे लोक आपली नक्कल करतात पण इथे थोडेसे विदेशी 'हिप्पी' लोक काय आले तर लगेच लोकांनी त्यांची नक्कल सुरू केली! याला काय जगणे म्हणायचे?

'गूळ मिळत नाही, साखर मिळत नाही' यासाठी लोक आरडाओरडा करतात. खाण्याच्या वस्तूंसाठी एवढा आरडाओरडा का

करावा? खाण्याच्या वस्तू तर तुच्छ् (साध्या) गोष्टी आहेत. पोट आहे म्हटल्यावर खाण्याचे मिळेलच. दात आहेत तेवढे अन्नाचे घास तर मिळतीलच. दात पण किती प्रकारचे आहेत! चिरण्याचे, फाडण्याचे, चावण्याचे, सगळे वेगवेगळे. हे डोळे, किती छान आहेत? कोटी रुपये दिले तरी असे डोळे मिळतील का? नाही मिळणार. अरे, लाखो रुपये असतील तरी देखील हा दुर्दैवी म्हणेल की, 'मी दु:खी आहे.' स्वत:जवळ एवढ्या किमती वस्तू आहेत तरीही त्याची किंमत समजत नाही. फक्त डोळ्यांची किंमत समजून घे तरी तुला कळेल की तू किती सुखी आहेस. हे दातसुद्धा कधी ना कधी पडणारच आहेत, पण हल्ली तर कृत्रिम दात बसवून त्यांना पहिल्यासारखे बनवतात, पण ते काय चांगले दिसतात? भुतासारखे दिसतात. निसर्गाला पुन्हा नवीन दात द्यायचे असते तर दिले नसते का? लहान मुलांना नवीन दात देतोच ना?

या शरीराला गहू खाऊ घातले, डाळ खाऊ घातली, तरीही शेवटी तिरडीच! सर्वांचीच तिरडी निघते! शेवटी तर तिरडीच निघणार आहे. तिरडी म्हणजे निसर्गाची जप्ती. सगळे काही इथेच सोडून जायचे, आणि सोबत काय घेऊन जायचे? तर घरातल्यांसोबतची, गिऱ्हाईकांसोबतची, व्यापाऱ्यांसोबतची गुंतागुंत! भगवंताने सांगितलेच आहे की, 'अरे मानवा! तू समज, समज, समज. 'पुन्हा मनुष्य जन्म मिळणे महादुर्लभ आहे.'

आजकालच्या या काळात जीवन जगण्याची कला उरलीच नाही. मोक्षाचा मार्ग तर सोडा पण आनंदाने जीवन जगता तरी आले पाहिजे ना?

## हित कशात? हे निश्चित करावे लागते

आमच्याजवळ व्यवहार जागृती निरंतर असते! माझ्याकडून कुठलीच घड्याळाची कंपनी, रेडियोची कंपनी पैसे घेऊन गेलेली नाही. आम्ही अशा गोष्टी खरेदीच केल्या नाही. या सगळ्या गोष्टींचा उपयोगच काय? निरर्थक गोष्टी आहेत. ज्या घड्याळाने मला त्रास दिला, ज्याला बघताच धास्ती वाटते, त्या घड्याळाचा काय उपयोग? काही मुलांना वडील दिसताक्षणीच अस्वस्थ व्हायला होते. तो अभ्यास करीत नसेल, पुस्तक एका बाजूला ठेवून खेळत असेल आणि अचानक त्याला वडील

दिसले तर त्याला वडिलांची भीती वाटते, तसेच घड्याळाकडे बघून घाबरायला होत असेल तर नको ते घड्याळ. आणि हे सर्व रेडियो, टीव्ही वगैरे तर प्रत्यक्ष वेडेपणाच आहे, प्रत्यक्ष 'मॅडनेस' आहे.

**प्रश्नकर्ता :** रेडियो तर घरोघरी आहेत.

**दादाश्री :** ती गोष्ट वेगळी आहे. जिथे ज्ञानच नाही तिथे मग काय होणार? यालाच मोह म्हणतात ना? मोह म्हणजे काय? गरज नसलेल्या वस्तू आणणे आणि गरज असलेल्या वस्तूंमध्ये काटकसर करणे म्हणजे मोह.

हे कसे आहे ते सांगू का? कोणी साखरेच्या पाकात कांदा बुडवून दिला तरी तो घेऊन येतो. असे आहे हे. अरे, तुला कांदा खायचा आहे की पाक खायचा आहे, ते आधी ठरव. कांदा म्हणजे फक्त कांदाच खायला पाहिजे. नाही तर कांदा खाण्याचा फायदाच काय? हाच सगळा मूर्खपणा आहे? स्वत:चा निर्णय नाही, समज नाही आणि कसले भानही नाही! एखाद्याला साखरेच्या पाकात कांदा बुडवून खाताना पाहिले की मग स्वत:ही खातो! कांदा अशी वस्तू आहे की त्यास साखरेच्या पाकात टाकले म्हणजे तो वाया जातो. म्हणजेच लोक बिलकुल अडाणी आहेत. कोणत्याच गोष्टीचे भानच नाही. निव्वळ बेभानपणा आहे. स्वत:विषयी मनात बाळगतो की, 'मी विशेष आहे' आणि आपण त्याला तू विशेष नाहीस असे कसे म्हणू शकतो? हे आदिवासी लोक सुद्धा स्वत:ला 'विशेष' समजतात . कारण त्याला असे वाटते की, मी तर या दोन गायी आणि या दोन बैलांचा उपरी (मालक) आहे! आणि नाही तरी तो या चार जणांचा मालकच म्हटला जातो ना? मनात येईल तेव्हा तो त्यांना मारू शकतो, तो अधिकार आहे त्याला. आणि जरी कोणाचा मालक नसला तरी शेवटी बायकोचा मालक तर असतोच. जिथे विवेकबुद्धी नाही, सार-असार याचे भानच नाही, तिथे काय करू शकतो? मोक्षाची गोष्ट तर जाऊ द्या, पण संसारिक हिताहिताचे सुद्धा भान नाही.

संसारात काय सांगितले आहे की, रेशमी चादर फुकट मिळत असेल तरी ती आणून अंथरू नका आणि सूती चादर विकत जरी मिळत

असेल तरी ती आणा. आता तुम्ही विचारले यात काय फायदा? कारण अशी फुकट आणण्याची सवय लागेल आणि मग जेव्हा फुकट मिळत नाही तेव्हा खूप त्रास होतो. तेव्हा अशीच सवय ठेवा की नेहमी मिळू शकेल. सूती चादरच विकत आणा. नाही तर एकदा जर फुकट आणण्याची सवय पडली तर हाल होतील. हे संपूर्ण जग असेच झाले आहे. *उपयोग* (ज्ञान जागृती) नावापुरतासुद्धा नाही. मोठमोठ्या आचार्य महाराजांना सांगितले की, 'साहेब तुम्ही आज या चार गाद्यांवर झोपा.' तर त्यांना महाउपाधी वाटेल, रात्रभर झोपच लागणार नाही! कारण त्यांना चटईवर झोपायची सवय झाली आहे ना! त्यांना चटईवर झोपायची सवय झालेली आहे तर काहींना चार-चार गाद्यांशिवाय झोप लागत नाही. देवाला तर दोन्ही गोष्टी मान्य नाहीत. साधू लोकांचे तप आणि गृहस्थाचे विलासी जीवन, या दोन्ही गोष्टी देवाला मंजूर नाहीत. देव तर म्हणतो की जर तुमचे उपयोगपूर्वक असेल तर ते खरे. उपयोगपूर्वक नसेल आणि अशीच सवय लावून घेतली असेल तर निरर्थक म्हटले जाईल.

या सर्व गोष्टी समजून घ्याव्यात की या वाटेने गेलो तर असे होईल आणि त्या वाटेने गेलो तर तसे होईल. नंतर (आपण) ठरवायचे की आपल्याला कोणत्या वाटेने जायचे आहे. समजत नसेल तर दादांना विचारायचे, मग 'दादा' तुम्हाला सांगतील की हे तीन रस्ते धोकादायक आहेत आणि हा चौथा रस्ता सुरक्षित आहे. मग आमचा आशीर्वाद घेऊन त्या रस्त्याने जा.

## आणि अशा व्यवस्थेमुळे सुख लाभते

एक व्यक्ती मला म्हणाली, 'मला काही समजतच नाही. मला काहीतरी आशीर्वाद द्या.' तेव्हा त्याच्या डोक्यावर हात ठेवून मी म्हणालो, 'जा, आजपासून तू सुखाचे दुकान उघड.' आणि आज तुझ्याजवळ जे दुकान आहे ते रिकामे कर.' सुखाचे दुकान म्हणजे काय? सकाळी उठल्यापासून दुसऱ्यांना सुख द्यायचे. दुसरा कुठलाच व्यापार करायचा नाही. त्या माणसाला माझी ही गोष्ट एकदम नीट समजली. त्याने तर त्याप्रमाणे वागायला सुरुवात केली. आणि त्यामुळे त्याला खूप आनंद

झाला. जेव्हा तुम्ही सुखाचे दुकान उघडाल तेव्हा तुमच्याही वाट्याला सुख येईल आणि इतरांच्या वाट्यालाही सुखच येईल. जर तुमचे मिठाईचे दुकान असेल तर जिलबी विकत घेण्यासाठी दुसऱ्यांच्या दुकानात जाण्याची गरज पडेल का? जेव्हा खावीशी वाटली तेव्हा खाऊ शकाल. दुकानच मिठाईचे असेल मग काय? म्हणून तू सुखाचेच दुकान उघड. म्हणजे मग कसली उपाधीच नाही.

तुम्हाला जे दुकान उघडायचे असेल ते उघडू शकता. जर दररोजसाठी उघडू शकत नसाल तर आठवड्यातून एक दिवस रविवारच्या दिवशी तरी उघडा! आज रविवार आहे, 'दादांनी' सांगितले आहे, 'सुखाचे दुकान उघड.' तुम्हाला सुख घेणारे गिऱ्हाईक भेटतीलच. 'व्यवस्थित शक्ती'चा नियमच असा आहे की ती गिऱ्हाईक पाठवून देते. तू जसे ठरवले असेल त्यानुसार गिऱ्हाईक पाठवून देते.

ज्याला जे आवडत असेल त्याने त्याचे दुकान टाकावे. कित्येक तर लोकांना डिवचत राहतात. मग त्यांना काय मिळेल? एखाद्याला मिठाईची आवड असेल तर तो कसले दुकान टाकेल? मिठाईचेच ना! लोकांना कशाची आवड आहे? तर सुखाची. म्हणून सुखाचेच दुकान टाक, ज्यामुळे लोकांनाही सुख मिळेल आणि घरच्या लोकांना पण सुख मिळू शकेल. खा, प्या आणि मजा करा. येणाऱ्या (भविष्यातील) दुःखांचे फोटो काढू नका. फक्त नावच ऐकले असेल की मगनभाई येणार आहेत. अजून तर आलेही नाहीत, फक्त पत्रच आले आहे, तेव्हापासूनच त्याचे फोटो काढण्याची (कल्पना करण्याची) सुरुवात होऊन जाते.

हे 'दादा' तर 'ज्ञानी पुरुष' त्यांचे दुकान कसे चालत असेल? संपूर्ण दिवस! या 'दादांचे' तर सुखाचे दुकान. मग जरी कोणी दगड फेकला असेल तरीही आम्ही त्याला गुलाबजाम खाऊ घालतो. समोरच्या व्यक्तीला थोडेच माहीत आहे की, हे सुखाचे दुकान आहे तेव्हा इथे दगड मारू नये? म्हणून तो मनात येईल तिथे दगड मारतो.

'आपण कुणालाही दुःख द्यायचे नाही' असे निश्चित केले तरी दुःख देणारा तर दुःख देऊनच जाईल ना? तेव्हा तू काय करशील?

बघ, मी तुला एक उपाय सांगतो. आठवड्यातून एक दिवस तू 'पोस्ट ऑफिस' बंद ठेवायचे. त्या दिवशी कोणाचीही मनीऑर्डर स्वीकारायची नाही आणि कुणाला मनीऑर्डर करायची पण नाही. जर कोणाची मनीऑर्डर आली तर बाजूला ठेवायची आणि सांगायचे की, आज 'पोस्ट ऑफिस' बंद आहे, उद्या बोलूया. आमचे 'पोस्ट ऑफिस' तर कायम बंदच असते.

दिवाळीच्या दिवशी लोक का चांगले वागतात? कारण त्यांची बिलिफ (मान्यता) बदलते म्हणून. ते ठरवतात की आज दिवाळी आहे आणि आजचा दिवस आनंदात घालवायचा आहे. असे ठरवल्यामुळे त्यांची बिलिफ बदलते त्यामुळे ते आनंदात राहतात. 'आपण' मालक आहोत म्हणून आपण ठरवू शकतो. समजा तू ठरवलेस की आज मला सगळ्यांशी चांगलेच वागायचे आहे तर तू निश्चितच चांगले वागू शकशील. आठवड्यातून एक दिवस आपण नियमात राहायचे. एक दिवस पोस्ट ऑफिस बंद ठेवायचे. मग लोक खुशाल ओरडू देत की आज पोस्ट ऑफिस बंद का?

## वैरभाव मिटेल आणि आनंदही वाटेल

या जगातील कोणत्याही जीवाला किंचितमात्रही दुःख न देण्याची भावना असेल, तर तीच खरी कमाई म्हणायची. दररोज सकाळी अशी भावना करावी. कोणी शिवी दिली, तुम्हाला आवडत नसेल तरी पण ती जमा करा, तपास करण्यास जाऊ नका की मी कधी बरे शिवी दिली होती? आपण लगेच ती जमा करावी म्हणजे हिशोब पूर्ण होईल. लोक तर काय करतात की समोरच्याने एक शिवी दिली तर त्याला चार शिव्या ऐकवतात! त्यामुळे हिशोब चालूच राहतो, याला ऋणानुबंध म्हणतात. हिशोब पूर्ण केला की खाते बंद! देवाने काय म्हटले आहे, जे तुला आवडते ते दुसऱ्यास दे आणि जे आवडत नाही ते दुसऱ्यास देऊ नकोस. कोणी म्हणाला 'तुम्ही खूप चांगले आहात' तेव्हा आपण सुद्धा म्हणायचे, 'भाऊ साहेब, तुम्ही पण खूप चांगले आहात.' अशा आवडत्या गोष्टी उधार दिल्या तर चालतील.

हा संसार हिशोब चुकते करण्याचा कारखाना आहे. वैरभावनेचा बदला तर कधी सासूच्या रूपात, सुनेच्या रूपात, मुलाच्या रूपात, शेवटी बैलाच्या रूपात का होईना पण चुकवावाच लागेल. बाराशे रुपये देऊन बैल विकत घेतो आणि दुसऱ्याच दिवशी तो बैल मरतो! असे आहे हे जग! अनंत जन्म वैरभावनेतच गेले! हे जग वैरभावानेच टिकून राहिले आहे! हिंदू लोक घरातल्या लोकांशी वैर बांधतात आणि या मुस्लिमांच्या बाबतीत पाहिले तर ते बाहेरच्या लोकांशी भांडतील पण घरात कधी भांडत नाहीत. त्यांना कळते की ज्यांच्यासोबत रात्रंदिवस याच खोलीत एकत्र राहायचे आहे मग त्यांच्याशी भांडून कसे चालेल? खऱ्या अर्थाने जीवन जगण्याची कला काय आहे की, 'संसारात कुणाशीही वैर न बांधता सुटून जाणे.' हे साधू-संन्याशीसुद्धा संसारातून पळूनच जातात ना? पळून जाण्यात अर्थ नाही. हा तर जीवनसंग्राम आहे. जन्मापासूनच संग्राम चालू! पण लोक मौजमजेतच गुंतले आहेत!

घरातील सर्वांशी, शेजाऱ्यांशी, ऑफिसमध्ये सगळ्यांशीच 'समभावाने निकाल' करा. ताटात जर नावडते जेवण आले तरी ते चिडचिड न करता समभावाने त्याचा निकाल करा. कोणाला त्रास न देता, जे ताटात येईल ते निमूटपणे खाऊन घ्या. जे काही घडते तो संयोग आहे आणि भगवंताने सांगितले आहे की, जर तू संयोगाला धक्का मारशील तर शेवटी तो धक्का तुलाच लागेल! म्हणून आमच्या ताटात नावडणारे पदार्थ जरी वाढले असतील तरी आम्ही त्यातले दोन पदार्थ खातोच. कारण खाल्ले नाही तर दोघांशीही भांडण केल्यासारखे होईल. एक म्हणजे ज्याने जेवण बनवून वाढले त्याच्याशी, त्याचा तिरस्कार होईल त्याला दु:ख होईल. आणि दुसरे म्हणजे खाण्याच्या पदार्थाशी (अन्नाशी). ताटातील अन्न म्हणेल यात माझा काय गुन्हा? मी तुझ्याजवळ आलो तर तू माझा अपमान का करतोस? तुला जेवढे जमेल तेवढे खा, पण माझा अपमान करू नकोस. तेव्हा आपण अन्नाचा मान राखायला नको का? आम्हाला नावडते मिळाले तरी आम्ही त्याचा मान राखतो. कारण काहीही सहजासहजी मिळत नसते आणि मिळते तेव्हा योग्य

आदर केलाच पाहिजे. कोणी काही खायला दिले त्यास आपण जर नावे ठेवली तर सुख वाढेल का कमी होईल?

**प्रश्नकर्ता :** कमी होईल.

**दादाश्री :** ज्यामुळे सुख कमी होते असा व्यापार तर करणार नाही ना? सुख कमी होईल असा कुठलाच आपण व्यापार करता कामा नये. बरेचदा माझ्या ताटात नावडत्या भाज्या असतात, तरीही मी त्या खातो आणि उलट म्हणतो आजची भाजी खूप छान झाली आहे.

**प्रश्नकर्ता :** यास मनधरणी केली असे नाही का म्हटले जाणार? आवडत नसेल तरीही आवडते असे म्हणणे म्हणजे मनाची खोटी समजूत घालणे असे नाही का?

**दादाश्री :** असे बिल्कुल नाही. एक तर 'आवडते' म्हटले की ती भाजी आपल्याकडून खाल्ली जाईल आणि आवडत नाही म्हटल्यावर भाजीला आणि भाजी बनवणारीला राग येईल. शिवाय घरातील मुलांनाही वाटेल, यांची नेहमीचीच कटकट, कायम असेच करत असतात. म्हणजे घरातल्या मुलांनाही आपली अब्रू (!) कळते.

'दादांना' काय आवडते आणि काय नाही हे आमच्या घरच्यांना माहीतच नाही. स्वयंपाक बनवणे हे काय बनवणाऱ्याच्या हाताचा खेळ आहे? ते तर खाणाऱ्याच्या 'व्यवस्थित'च्या हिशोबानुसार ताटात येते. त्यात उगीच लुडबुड कशाला करायची?

## इतकी चैन, तरी उपभोगत नाही

हॉटेलचे खाल्ल्यानंतर पोट बिघडते, पोटात मुरडा येतो. वारंवार हॉटेलमध्ये खाल्यावर हळूहळू आम एकत्र होतो आणि एकीकडे जमा होतो. नंतर जेव्हा त्याचा परिपाक होतो तेव्हा पोटात मुरडा येतो. आणि पोट पिळून निघते. मुरडा येतो तो तर कित्येक वर्षानंतर परिपाक होत असतो. जेव्हा मला असा अनुभव आला तेव्हापासून मी सगळ्यांना हेच सांगतो की, हॉटेलचे खाणे टाळा. एकदा आम्ही मिठाईच्या दुकानात

गेलो होतो. त्या मिठाई बनवणाऱ्याच्या अंगातून घाम गळत होता, कचरा पडत होता! आजकाल तर घरात जेवण बनवतात तेही शुद्ध-स्वच्छ नसते. कणिक मळतात तेव्हा हात नीट धुतलेले नसतात. नखात मळ भरलेला असतो. आजकाल नखे कापत नाहीत ना? इथे कित्येक जण असे येतात ज्यांची लांब नखे असतात त्यांना मला सांगावे लागते की, ताई यात तुमचा काही फायदा आहे का? फायदा असेल तर असू द्या. तुम्हाला ड्रॉइंगचे काम करायचे असेल तर लांब नखे असू देत. तेव्हा त्या म्हणतात, असे काही नाही, उद्या नखे कापून येईल. या लोकांना काही सेन्सच (समजच) नाही. नखे वाढवतात, आणि कानाला रेडीयो लावून फिरतात! स्वत:चे सुख कशात आहे याचे भानच नाही, आणि स्वत:चे भान तरी कुठे आहे? लोकांकडून जितके मिळाले तितकेच भान त्यांना असते.

जगात उपभोगण्यासाठी कितीतरी ऐषआरामाच्या गोष्टी आहेत! या लाख रुपयांच्या डबलडेकर बसमध्ये आपण आरामात बसून इथून चर्चगेटपर्यंत जाऊ शकतो. शिवाय त्यातल्या गाद्या तर किती मऊ! आपल्या घरी पण इतक्या सुंदर गाद्या नसतात! आता इतके चांगले पुण्यकर्म आहे तरी पण उपभोगता येत नाही. नाही तर हिंदुस्तानातील लोकांच्या नशिबात लाख रुपयांची बस कुठून येणार? जेव्हा या मोटारीतून जातात तेव्हा धूळ उडते का? नाही. रस्त्यावर धूळच नसते. चालतात तरी पायाला धूळ लागत नाही, अरे, पूर्वी बादशाहांच्या काळातही धुळीचे रस्ते होते. ते बाहेरून येत असत तेव्हा धुळीने माखलेले असत! आणि आजकालच्या पिढीला तर बादशाहापेक्षाही जास्त सुखसुविधा आहे पण उपभोगताच येत नाही ना. छान बसमध्ये बसला असेल तरी डोक्यात दुसरेच चक्कर चालू असते!

## संसार सहजपणे चालतो, तिथे...

खरे म्हणजे दु:ख नसतेच आणि जे आहे ते अज्ञानतेचेच दु:ख आहे. या जगात किती जीव आहेत? असंख्य जीव आहेत! पण कोणाचीही तक्रार नाही की आमच्याकडे दुष्काळ पडला आहे म्हणून! आणि हे मूर्ख लोक प्रत्येक वर्षी तक्रार करीत राहतात! या समुद्रात कोणी प्राणी उपासमारीने

मेला असे घडते का कधी? हे कावळे वगैरे उपासमारीने मरतात का? नाही. ते उपासमारीमुळे मरत नाहीत. ते कुठे टक्कर झाल्याने, एक्सिडन्ट झाल्याने किंवा आयुष्यकर्म पूर्ण झाले असेल तर मरतात. कोणी कावळा दु:खी दिसला का? उपासमारीने कृश झालेला दुबळा कावळा तुम्ही पाहिला आहे का कधी? या कुत्र्यांना झोपेच्या गोळ्या खाव्या लागतात का? ते तर आरामशीर कुठेही झोपतात. फक्त हा करंटा मनुष्यप्राणीच झोपेच्या वीस वीस गोळ्या खातो. झोप ही तर निसर्गाची देणगी आहे. झोपेत तर खूप आनंद वाटतो! आणि हे डॉक्टर तर बेशुद्ध होण्याच्या गोळ्या देतात. गोळ्या खाऊन बेशुद्ध होणे हे दारू पिण्यासारखेच आहे. ब्लडप्रेशर झालेला कावळा पाहिला का तुम्ही? एक हा मनुष्य नावाचा प्राणीच फक्त दु:खी आहे. फक्त मनुष्यालाच कॉलेजची गरज आहे.

या चिमण्या किती सुंदर घरटी बांधतात, त्यांना कोणी शिकवले? संसार चालविणे आपोआपच येते. हो, फक्त स्वरूपज्ञान प्राप्त करण्यासाठीच पुरुषार्थ करण्याची गरज आहे. संसार चालविण्यासाठी काहीच करण्याची गरज नाही. फक्त हा मनुष्यच अतिशहाणा आहे. या पशु-पक्ष्यांना काय बायका-मुले नसतात? त्यांना लग्न लावायला लागते का? फक्त माणसांनाच जणू बायका-मुले असतात. मनुष्यच लग्न लावण्याच्या मागे लागलेले आहेत, पैसे कमावण्याच्या मागे लागले आहेत. अरे! आत्मज्ञान प्राप्त करण्यासाठी मेहनत कर ना! इतर कशाच्याही मागे मेहनत-मजुरी करण्यासारखे नाही. आत्तापर्यंत जे काही केले ते दु:खे साजरी करण्यासारखेच केले. या मुलांना चोरी करायचे कोण शिकवते? हे सगळे बीजरूपाने त्यांना मिळालेले आहे. कडुनिंबाचे प्रत्येक पान कडू का आहे? कारण त्याच्या बीजातच कडवटपणा आहे. फक्त हा मनुष्यच सदैव दु:खी असतो; पण त्यात त्याचा दोष नाही. कारण चौथ्या आऱ्यापर्यंत सुख होते आणि हा तर पाचवा *आरा* (कालचक्राचा बारावा भाग) आहे. या आऱ्याचे नावच दूषमकाळ आहे! म्हणून प्रचंड दु:ख सोसून देखील समता उत्पन्न होत नाही. या काळाचे नावच दूषम. मग या दूषमकाळात सुषमकाळ शोधणे हे चुकीचे नाही का?



[ 2 ]

# योग उपयोग परोपकारासाठी

## जीवनात हीच दोन कार्ये महत्त्वाची

मनुष्यजन्म कशासाठी आहे? स्वत:वर असलेले हे कायमचे बंधन तोडण्यासाठी आहे. 'एब्सोल्युट' होण्यासाठी आहे. आणि हे 'एब्सोल्युट' होण्याचे ज्ञान जर तुला प्राप्त झाले नाही तर तू दुसऱ्यांसाठी जगणे शिक. या दोनच गोष्टी करण्यासाठी हिंदुस्तानात जन्म झाला आहे; पण ही दोन कामे लोक करतात का? लोकांनी तर भेसळ करून मनुष्यजातीतून जनावरगतीत जाण्याची कला शोधून काढली आहे!

## परोपकाराने पुण्य मिळते

जोपर्यंत मोक्ष मिळत नाही तोपर्यंत केवळ पुण्यच मित्रासारखे काम करते आणि पाप हे शत्रूसारखे काम करते. तर आता तुम्हाला शत्रू हवा आहे की मित्र हवा आहे? हे तुम्ही तुमच्या आवडीनुसार ठरवायचे. आणि मित्राचे संयोग कशाने जुळतील ते विचारा आणि शत्रूचे संयोग कशाने टळतील ते पण विचारा. जर शत्रू पसंत असेल तर तो कसा मिळवावा असे विचारलेत, तर त्यास आम्ही सांगू की वाटेल तेवढे कर्ज काढून तूप पी, कुठेही भटक आणि जमेल तेवढी मौजमजा कर, मग पुढे काय होईल ते नंतर बघू आणि पुण्यरूपी मित्र हवा असेल तर आम्ही सांगू, की या झाडापासून काही शिक. कोणतेही झाड स्वत:चे फळ स्वत: खाते का? किंवा कोणतेही गुलाबाचे रोप स्वत:चे फूल

स्वत: खाऊन टाकत असेल का? थोडे तरी खात असेल ना? आपण तिथे नसू तेव्हा रात्री खात असेल, नाही का? खाते की नाही?

**प्रश्नकर्ता :** नाही खात.

**दादाश्री :** झाडे-झुडपे ही ती तर मनुष्यांना फळ देण्यासाठी मनुष्यांच्या सेवेत आहेत. मग त्यात झाडांना काय मिळते? तर त्यांची ऊर्ध्वगती होत असते आणि त्यांची मदत घेऊन माणसे पुढे विकास करतात! समजा, तुम्ही एक आंबा खाल्ला, त्यात त्या आंब्याच्या झाडाचे काय गेले? आणि तुम्हाला काय मिळाले? तुम्ही आंबा खाल्ला म्हणून तुम्हाला आनंद मिळाला. त्यामुळे तुमची जी वृत्ती बदलली, त्याची किंमत अध्यात्म्यात शंभर रुपये मिळवल्यासारखी आहे. झाडाचा आंबा खाल्लात म्हणून त्यातले पाच टक्के तुमच्या वाट्यातून त्या आंब्याच्या झाडाला जातील आणि पंच्याण्णव टक्के तुमच्या वाट्याला येतील. म्हणजे ते झाड तुमच्या वाट्यातील पाच टक्के घेतात आणि बिचारे ऊर्ध्वगतीला जातात आणि तुमची पण अधोगती होत नाही, तुम्ही पण पुढे जाता. म्हणून ही झाडे म्हणतात 'आमचे सगळेकाही तुम्ही उपभोगा, प्रत्येक प्रकारची फळे-फुले उपभोगा.'

म्हणून जर हा संसार तुम्हाला आवडत असेल, पसंत असेल, संसारिक वस्तूंची इच्छा असेल, सांसारिक विषयांचीच ओढ असेल तर फक्त एवढेच करा 'योग, उपयोग परोपकाराय' योग म्हणजे मन-वचन-काया यांचा योग आणि उपयोग म्हणजे बुद्धीचा उपयोग करणे मनाचा उपयोग करणे, चित्ताचा उपयोग करणे. परोपकाराय म्हणजे या सगळ्यांचा दुसऱ्यांसाठी उपयोग करणे. समजा दुसऱ्यांसाठी खर्च केला नाही तरी आपले लोक शेवटी घरच्यांसाठी तरी वापरतातच ना! या कुत्रीला कशामुळे खायला मिळते? कारण त्या पिल्लांच्या आत परमात्मा विराजमान आहेत आणि त्या पिल्लांची ती सेवा करते त्यामुळे तिला सर्व काही मिळते. या आधारावरच सगळा संसार चालत आहे. या झाडांना जेवण कुठून मिळते? या झाडांनी काही पुरुषार्थ केला आहे? ते तर बिलकूल 'इमोशनल' नाहीत. 'इमोशनल' होतात का कधी? ते

कधीही मागे-पुढे होत नाहीत. त्यांना कधी असे वाटतच नाही की चला, एका मैलावर विश्वामित्री नदी आहे, मग तिथे जाऊन पाणी पिऊन येऊ.

## परोपकाराच्या परिणामाने लाभच

**प्रश्नकर्ता :** या संसारात सत्कृत्ये कशाला म्हणावी? त्याची व्याख्या देता येईल का?

**दादाश्री :** हो, चांगली कृत्ये तर सगळी झाडे पण करतात आणि ती अगदी चांगली कृत्येच करतात पण ते स्वत: कर्ता भावात नसतात. या झाडांमध्ये जीव असतो. ती सर्व स्वत:ची फळे दुसऱ्यांना देतात. तुम्ही पण तुमची फळे दुसऱ्यांना देऊन टाका, तुम्हाला तुमची फळे मिळत राहतील. तुम्हाला जी फळे उत्पन्न होतात, शारीरिक फळे, मानसिक फळे, वाचिक फळे ती सर्व लोकांना मोफत देत राहा. तर तुम्हाला लागणारी प्रत्येक गोष्ट तुम्हाला मिळत राहील. तुमच्या जीवनोपयोगी गरजांमध्ये किंचित देखील अडचण येणार नाही. मात्र जेव्हा ती फळे तुम्ही स्वत:च खाऊन टाकाल तेव्हा अडचण येईल. आंब्याच्या झाडाने जर स्वत:ची फळे स्वत:च खाल्ली तर झाडाचा मालक काय करेल? तो ते झाड कापूनच टाकील ना? लोक अशीच स्वत:ची फळे स्वत:च खातात. इतकेच नाही तर वरून 'फी' सुद्धा मागतात! एक अर्ज लिहायचे बावीस रुपये मागतात! ज्या देशात 'फ्री ऑफ कॉस्ट' (मोफत) वकिली करत होते, इतकेच नाही तर आपल्या घरी नेऊन जेवायला घालून वकिली करत होते, तिथे आता ही परिस्थिती झाली आहे. जर गावामध्ये भांडण झाले असेल तर नगरशेठ (सरपंच) त्या दोन्ही भांडणाऱ्यांना म्हणायचा 'चंदुलाल भाऊ, आज साडे दहा वाजता तुम्ही आमच्या घरी या आणि नगिनदास भाऊ, तुम्ही पण साडे दहा वाजता या.' आणि नगिनदासच्या ऐवजी कोणी मजूर असेल किंवा कोणी शेतकरी असेल की जे भांडत असतील त्यांनाही घरी यायला सांगायचा. दोघांना आपल्या शेजारी बसवून त्यांचात तडजोड करून दोघांना सहमत करायचा. ज्याचे पैसे चुकवायचे असतील त्याला थोडी रोख रक्कम देऊन बाकीचे पैसे हफ्त्याने मिळतील अशी व्यवस्था करायचा. आणि

मग दोघांना म्हणायचा (मिटले ना भांडण) चला आता माझ्याबरोबर जेवायला बसा. दोघांना जेवायला घालून मगच घरी पाठवायचा; आहेत का आता असे वकील? म्हणून जरा समजा, आणि काळानुसार वागा. जर तुम्ही स्वत:चा उपयोग स्वत:साठी करत राहिलात तर मृत्यूच्यावेळी दु:खाखेरीज काहीही मिळणार नाही. प्राण निघणार नाही! आणि बंगला, गाडी सोडून जायची इच्छा होणार नाही!

जर हे आयुष्य परोपकारासाठी घालविले तर तुम्हाला काहीही कमी पडणार नाही, कुठल्याही प्रकारची अडचण येणार नाही, तुमच्या ज्या काही इच्छा असतील त्या सगळ्या पूर्ण होतील. आणि विनाकारण उड्या मारत राहिलात तर एकही इच्छा पूर्ण होणार नाही. कारण ती पध्दत तुम्हाला अस्वस्थ करून झोप येऊ देणार नाही. या शेठ लोकांना झोपच लागत नाही, तीन-तीन, चार-चार दिवस झोप लागत नाही. कारण त्यांनी ज्याची त्याची लुटमारच केली आहे.

**प्रश्नकर्ता :** परोपकारी मनुष्याने लोकांच्या भल्यासाठी जरी सांगितले तरी लोक ते ऐकायला तयारच नसतात, अशा वेळी काय करायचे?

**दादाश्री :** असे आहे, की परोपकार करणारी व्यक्ती समोरच्या व्यक्तीची समज (अक्कल) बघत असेल तर ती वकिली म्हटली जाईल. म्हणून समोरच्याला किती समज आहे ते बघायचे नसते. हे आंब्याचे झाड आंबे देते. मग ते झाड स्वत:चे किती आंबे खात असेल?

**प्रश्नकर्ता :** एकही नाही.

**दादाश्री :** मग ते सारे आंबे कोणासाठी आहेत?

**प्रश्नकर्ता :** दुसऱ्यांसाठी

**दादाश्री :** हं...मग ते आंब्याचे झाड असे बघते का की, हे आंबे खाणारे चांगले आहेत की वाईट आहेत? जो येईल आणि घेऊन जाईल त्याचे ते आंबे, माझे नाही. परोपकारी जीवन तर ते झाड जगत आहे.

**प्रश्नकर्ता :** पण जो उपकार करतो, त्यालाच जर लोक दोष देत असतील, तरीही उपकार करावेत का?

**दादाश्री :** हो, तेच तर पाहायचे आहे. अपकार करणाऱ्यावर (कृतघ्न व्यक्तीवर) जो उपकार करतो तोच खरा माणूस. अशी समज लोक कुठून आणतील? अशी समज जर आली तर तुमचे कामच (कल्याणच) झाले! परोपकारी असणे ही खूप मोठी उच्च स्थिती आहे, हेच साऱ्या मनुष्य जीवनाचे ध्येय आहे. आणि हिंदुस्तानात दुसरे ध्येय, अंतिम ध्येय मोक्षप्राप्तीचे आहे.

**प्रश्नकर्ता :** परोपकाराबरोबर 'इगोईजम' (अहंकार) असतो का?

**दादाश्री :** परोपकार करतो त्याचा 'इगोईजम' नॉर्मलच असतो, वास्तविक 'इगोईजम' असतो. पण जो कोर्टात दीडशे रुपये घेऊन दुसऱ्याचे काम करत असेल त्याचा 'इगोईजम' खूप वाढलेला असतो. अर्थात जो 'इगोईजम' वाढायला नको, तो 'इगोईजम' खूप वाढतो.

या जगाचा नैसर्गिक नियम काय आहे की तुम्ही तुमची फळे जर दुसऱ्याला दिलीत तर निसर्ग तुम्हाला सांभाळून घेईल. हेच गुह्य सायन्स (गूढ विज्ञान) आहे. हा परोक्ष धर्म आहे. नंतर प्रत्यक्ष धर्म येतो, आणि शेवटी आत्मधर्म येतो. मनुष्यजन्माचा हिशोब एवढाच आहे. अर्क (सार) एवढाच आहे की मन-वचन-कायेचा उपयोग दुसऱ्यांसाठी करा.



# [ 3 ]
# वास्तवात दु:ख आहे?

## 'राईट बिलिफ' तिथे दु:ख नाही

**प्रश्नकर्ता :** दादा दु:खाविषयी काहीतरी सांगा. हे दु:ख कशातून उत्पन्न होते?

**दादाश्री :** जर तुम्ही आत्मा असाल तर आत्म्याला कधीही दु:ख होत नाही. आणि जर तुम्ही चंदुलाल असाल तर दु:ख आहे. तुम्ही आत्मा असाल तर दु:ख होणारच नाही, उलट जे दु:ख असेल तेही संपून जाईल. 'मी' चंदुलाल आहे ही 'रॉंग बिलिफ' (चुकीची मान्यता) आहे. ही माझी आई आहे, हे माझे वडील आहेत, हे माझे काका आहेत किंवा मी एक्स्पोर्ट-इम्पोर्टचा व्यापारी आहे, या सगळ्या वेगवेगळ्या प्रकारच्या 'रॉंग बिलिफ्स' आहेत. या सगळ्या 'रॉंग बिलिफमुळे' दु:ख उत्पन्न होते. जर 'रॉंग बिलिफ' निघून गेली आणि त्या जागी 'राईट बिलिफ' बसली तर जगात काही दु:ख राहणारच नाही. आणि तुमच्या सारख्या (खात्या-पित्या सुखी घरच्या) लोकांना दु:ख नसते. हे सगळे तर योग्य समज नसल्यामुळे होणारे दु:ख आहे.

## दु:ख केव्हा म्हणता येईल?

दु:ख कशाला म्हणतात? या शरीराला भूक लागली आणि मग आठ तास, बारा तास खायला मिळाले नाही, तर त्याला दु:ख मानले जाते. तहान लागल्यानंतर दोन-तीन तास पाणी नाही मिळाले तर तेही दु:खासमान

आहे. संडास लागल्यावर जर संडासला जाऊ दिले नाही तर त्याचे दु:ख वाटेल की नाही? संडासाहून जास्त अवघड मुतारीची गोष्ट आहे. या मुताऱ्या सगळ्या बंद केल्या, तर सगळे लोक आरडाओरडा करतील. लघवी रोखणे हे खूप मोठे दु:ख आहे. या सगळ्या दु:खांना दु:खे म्हणता येईल.

**प्रश्नकर्ता :** हे सगळे ठीक आहे, पण सध्या तर जगात दहापैकी नऊ लोकांना दु:ख आहे.

**दादाश्री :** दहापैकी नऊ नाही, तर हजारामागे फक्त दोन लोक सुखी असतील, त्यांना थोडीफार शांती असते. बाकीचे सर्व तर रात्रंदिवस जळतच राहतात. रताळे भट्टीत ठेवले, तर ते किती बाजूंनी भाजेल?

**प्रश्नकर्ता :** हे जे कायमचे दु:ख आहे त्यामधून फायदा कसा घेता येईल?

**दादाश्री :** या दु:खांवर विचार करायला लागलात तर दु:ख आहे असे जाणवणार नाही. दु:खाचे जर यथार्थ प्रतिक्रमण कराल तर दु:ख आहे असे वाटणार नाही. लोकांनी सरसकट हे दु:ख आहे, ते दु:ख आहे असे विचार न करताच बोलायला सुरुवात केली आहे. समजा, तुमच्याकडे खूप जुना सोफासेट आहे. आणि तुमच्या मित्राच्या घरी सोफासेट नाही म्हणून तो आज दुकानातून नवीन फॅशनचा सोफासेट घेऊन आला. तुमची बायको तो सोफा पाहून आली आणि घरी आल्यावर तुम्हाला ती म्हणाली, 'तुमच्या मित्राकडे किती सुंदर सोफासेट आहे. आणि आपला सोफा तर किती खराब झाला आहे.' तर हे असे दु:ख तयार झाले!!! घरात दु:ख नव्हते, दुसऱ्यांचा सोफासेट पाहायला गेलात आणि स्वत:च्या घरात दु:ख घेऊन आलात!

तुम्ही बंगला बांधला नसेल आणि तुमच्या मित्राने बंगला बांधला. तुमची बायको तिथे गेली आणि तो बंगला पाहून ती म्हणाली, 'तुमच्या मित्राने किती छान बंगला बांधला आहे.' आणि आपण तर बिन बंगल्याचे आहोत! हे असे दु:ख आले!!! म्हणजे हे अशाप्रकारे दु:खांना आमंत्रण दिले जाते!

मी न्यायाधीश झालो तर सगळ्यांना सुखी करून शिक्षा देईन. कुणाला त्याच्या गुन्ह्याची शिक्षा द्यायची संधी आली तर मी त्याला 'पाच वर्षापेक्षा कमी शिक्षा होऊ शकत नाही' असे सांगेन. जर वकिलाने कमी करण्याची विनंती केली तर प्रथम चार वर्ष, मग तीन वर्ष, नंतर दोन वर्ष, असे कमी करत–करत शेवटी सहा महिन्यांची शिक्षा देईल. त्यामुळे तो व्यक्ती जेलमध्ये तर जाईल, पण सुखी होईल. मनात खुश होईल की, पाच वर्षाची शिक्षा सहा महिन्यातच पूर्ण झाली. म्हणजे हे मान्यतेचेच दुःख आहे. जर त्याला पहिल्यापासूनच सहा महिने जेलमध्ये जावे लागेल असे सांगितले असते तर त्याला ती खूप मोठी शिक्षा वाटली असती.

## पेमेंट चुकवताना समभाव ठेवावा

हे तुम्हाला गादीवर बसल्यासारखे सुख आहे पण ते उपभोगताच येत नसेल तर काय करणार? हे म्हणजे ऐंशी रुपये किलोच्या बासमती तांदुळात खडे टाकण्यासारखे आहे! जर दुःख आले तर त्याला विचारता आले पाहिजे ना की, 'इथे का आला आहेस? आम्ही तर दादाजींचे आहोत. तुला इथे यायची गरजच नाही. तू दुसरीकडे जा. इथे का म्हणून आला आहेस? तुझा पत्ता चुकला आहे.' तुम्ही एवढे म्हणालात तर ते दुःख निघून जाईल. ही तर तुम्ही संपूर्ण अहिंसाच केली (!) दुःख आले तर काय त्याला येऊ द्यायचे? त्याला सरळ हाकलून लावायचे. यात अहिंसा तुटत नाही (हिंसा होत नाही) दुःखांचा अपमान केला तर ते निघून जातात. तुम्ही दुःखांचा देखील अपमान करत नाहीत. एवढे अहिंसक होण्याची गरज नाही.

**प्रश्नकर्ता :** दुःखाला विनंती करून ते जाणार नाही का?

**दादाश्री :** नाही. दुःखाला विनंती करायची नाही. विनंती करून ऐकणाऱ्यापैकी ते नसते. त्याच्यावर डोळे वटारावेच लागतील. ते नपुसंक जातीचे आहे. त्या जातीचा स्वभावच तसा आहे. त्याच्याशी लाडीगोडी कराल तर त्याला आनंदच होईल. टाळ्या वाजवील आणि सारखा आपल्या जवळ–जवळ येत राहील.

*'वारस अहो महावीरना, शुरवीरता रेलावजो,*
*कायर बनो ना कोई दी, कष्टो सदा कंपावजो.'*

(तुम्ही महावीरांचे वारस आहात, तुमच्याकडून शौर्य प्रकट होऊ दे, भित्रे कधीही होऊ नका, कष्टांनाच नेहमी घाबरवा.)

तुम्ही घरी बसला असाल आणि कष्ट (दु:ख) आले तर ते तुम्हाला पाहून थरथर कापले पाहिजे आणि त्यास वाटले पाहिजे की आपण इथे कुठे फसलो! आपण घर चुकलो असे वाटते? कष्ट आपले मालक नाहीत, ते तर आपले नोकर आहेत.

जर कष्ट तुम्हाला पाहून घाबरत नसतील तर तुम्ही दादांचे महात्मा कसे? कष्टाला म्हणावे की 'तुम्ही दोनच का आलात? पाच मिळून या. आता तुमचे सगळेच पेमेंट चुकते करून देऊ.' तुला जर कोणी शिव्या दिल्या तर आपले ज्ञान त्याला काय सांगते? की तो तर 'तुला' (शुद्धात्म्याला) ओळखतच नाही. उलट 'तूच' 'त्याला' सांगायचे की, 'बाबा, माझ्याकडूनच काही चूक झाली असेल म्हणूनच त्याने शिव्या दिल्या. तेव्हा आता शांत रहा.' एवढे केले की तुझे पेमेंट चुकते झाले! हे लोक कष्ट आले म्हणजे आरडाओरड करून सोडतात, अरेरे, 'मी मेलो!' असेही बोलतात. मरायचे तर एकदाच असते. हे तर शंभर वेळा 'मी मेलो, मेलो' असे म्हणतात! अरे, तू तर जिवंत आहेस मग 'मी मेलो' असे कसे म्हणतोस? मेल्यानंतर म्हण की 'मी मेलो म्हणून.' जिवंत माणूस कधी मरतो का? 'मी मेलो' हे वाक्य संपूर्ण आयुष्यात एकदाही बोलण्यासारखे नाही. खरोखर दु:ख कशास म्हणतात, हे नीट समजून ओळखायला हवे.

ह्या मुलाला मी मारले तरीही तो रडत नाही, उलट तो हसतो, त्याचे काय कारण? आणि तुम्ही त्याला फक्त एक टपली जरी मारली तरी तो रडायला लागेल, याचे काय कारण? त्याला लागले म्हणून? नाही त्याला लागल्याचे दु:ख नाही, त्याचा अपमान केला हे त्याचे दु:ख आहे.

यास आपण दु:ख म्हणूच कसे शकतो? दु:ख तर कशास म्हटले जाईल की, खायला मिळत नाही, शौचाला जायला मिळत नाही, लघवीला

जाता येत नाही. अशा गोष्टींना दु:खे म्हणता येईल. आता तर सरकारने घरोघरी संडास बांधून दिले आहेत, पूर्वी तर लोकांना लोटा घेऊन जंगलात जावे लागत होते. आणि आता तर बेडरूममधून निघालात की लगेच संडास! पूर्वी श्रीमंत ठाकूरांनाही नव्हत्या इतक्या सुखसोयी आजच्या सर्व सामान्य लोकांना उपलब्ध आहेत. पूर्वी ठाकूराला देखील संडासला जाण्यासाठी लोटा घेऊन जावे लागत असे! त्याने जुलाबाचे औषध घेतले असेल तर त्यालाही पळावे लागत असे! आता असे नाही, तरी लोक असे झाले, नी तसे झाले, असे ओरडत असतात. अरे, पण काय झाले ते तरी सांग. हा पडला, तो पडला, काय पडले? विनाकारण कशाला आरडाओरड करता?

ही जी दु:खे आहेत ती सर्व चुकीच्या समजुतीमुळे आहेत. जर योग्य समज फिट केली तर दु:खासारखे काही नाहीच. जर तुमच्या पायाला काही लागले असेल, इजा झाली असेल तर तपास करा की माझ्यासारखे दु:ख लोकांना आहे की नाही? इस्पितळात जाऊन पाहिले तर समजेल की ओहोहो! खरी दु:खे तर इथेच आहेत. माझ्या पायाला किरकोळ इजा झाली आणि मी विनाकारण दु:ख मानून घेत आहे. अशी तपासणी करायलाच हवी ना? तपास केल्याशिवाय दु:ख मानले तर काय होईल? तुमच्यासारख्या पुण्यवंत लोकांना दु:ख असूच कसे शकते? तुम्ही पुण्यवंतांच्या घरी जन्माला आला आहात. थोड्याशा मेहनतीनेच तुम्हाला खायला-प्यायला मिळून जाते.

**प्रश्नकर्ता :** सगळ्यांनाच आपापले दु:ख मोठे वाटते ना?

**दादाश्री :** हे तर स्वत:च निर्माण केलेले दु:ख आहे, त्यामुळे तुम्ही त्याला जेवढे मोठे कराल तेवढे ते मोठे होईल. चाळीस पट केलेत तर चाळीस पट होईल!

## ...अवश्य करण्यायोग्य 'प्रोजेक्ट'

आयुष्य कसे जगावे हेच या लोकांना कळत नाही, 'जगावे कसे' याची चावीच ते हरवून बसले आहेत. चावी पूर्णपणे हरवली होती; पण

आता इंग्रज आल्यामुळे परत थोडे चांगले घडू लागले आहे. इंग्रज आल्यामुळे यांचे कट्टर संस्कार थोडे शिथिल होऊ लागले आहेत, म्हणून ते आता दुसऱ्यांच्या व्यवहारात ढवळाढवळ करत नाहीत, आणि आता तर ते कष्ट करू लागले आहेत, पूर्वी फक्त ढवळाढवळच करत असत.

लोक उगीचच मार खात राहतात. या जगात तुमचा कोणीही *उपरी* नाही. तुम्ही पूर्णपणे स्वतंत्र आहात. तुमचा प्रोजेक्ट सुद्धा स्वतंत्र आहे, पण तुमचा प्रोजेक्ट असा असायला हवा की कोणत्याही जीवाला तुमच्याकडून किंचितमात्र पण दु:ख होणार नाही. तुमचे प्रोजेक्ट प्रचंड मोठे करा. संपूर्ण जग सामावू शकेल एवढे करा.

**प्रश्नकर्ता :** असे शक्य आहे का ?

**दादाश्री :** हो, माझा (प्रोजेक्ट) खूप मोठा आहे. कुठल्याही जीवाला दु:ख होऊ नये असे मी वागतो.

**प्रश्नकर्ता :** पण दुसऱ्यांना हे करणे शक्य नाही ना ?

**दादाश्री :** जरी शक्य नसले, पण याचा अर्थ असा नाही की सगळ्या जीवांना दु:ख देऊनच आपला प्रोजेक्ट पूर्ण करावा.

कुणालाही कमीत कमी दु:ख होईल असा काही तरी नियम तुम्ही करू शकता ना ? असा प्रोजेक्ट तर करू शकता ना. जे बिलकुल असंभवच आहे असे करायला मी तुम्हाला सांगतच नाही.

## ...फक्त भावनाच करायची

**प्रश्नकर्ता :** कुणालाच दु:ख नाही, मग आम्ही जेव्हा दुसऱ्यांना दु:ख देतो तेव्हा त्यांना का दु:ख होते ?

**दादाश्री :** त्यांच्या मान्यतेतून अजून दु:ख गेले नाही. तुम्ही मला थोबाडीत माराल तर मला दु:ख होणार नाही पण दुसऱ्यांना मारले तर त्याला दु:ख होईलच, कारण मारल्याने दु:ख होते, असे त्याच्या मान्यतेत आहे. 'रॉंग बिलिफ' अजूनपर्यंत गेलेली नाही. 'कोणी मला मुस्कुटात मारली तर मला दु:ख होते,' त्याचप्रमाणे समोरच्यालाही दु:ख होत असेल, या

पातळीवरून तुम्ही विचार केला पाहिजे. कुणाला मुस्कुटात मारताना मनात हा विचार आला पाहिजे की, मला मुस्कटात मारले तर मला कसे वाटेल?

तुम्ही कुणाकडून दहा हजार रुपये उसने आणले, पण दुर्दैवाने आपले दिवस फिरले तर मनात विचार येतील की, 'मी पैसे परत केले नाही तर त्यांना काय फरक पडणार आहे!' अशा वेळी न्यायपूर्वक विचार केला पाहिजे की 'माझ्याकडून कोणी पैसे घेतले आणि परत केले नाहीत तर मला कसे वाटेल?' असे झाले तर मला खूप दुःख होईल, त्याचप्रमाणे समोरच्यालाही दुःख होईल. म्हणून मलाही त्यांचे पैसे परत करायचेच आहेत, असा निश्चय केला पाहिजे आणि असा निश्चय केला तर तुम्ही पैसे परत करूही शकाल.

**प्रश्नकर्ता :** मनात असा विचार येतो की त्याच्याजवळ तर दहा करोड रुपये आहेत, मग आपण त्याला दहा हजार रुपये परत केले नाहीत तर त्याला काही अडचण येणार नाही.

**दादाश्री :** त्याला अडचण येणार नाही असे तुम्हाला वाटते, परंतु प्रत्यक्षात तसे नसते. तो करोडपती असला तरी स्वतःच्या मुलासाठी एक रुपयाची वस्तू घेताना सुद्धा खूप विचार करून-करून घेतो. कोणत्याही करोडपतीच्या घरी तुम्हाला असे उघड्यावर पैसे पडलेले आढळले का? प्रत्येकाला पैसा प्राणाइतकाच प्रिय असतो.

आपल्या मनात सतत असा भाव असायला हवा की माझ्या मन-वचन-कायेने या जगातील कुठल्याही जीवाला किंचितमात्र पण दुःख न होवो.

**प्रश्नकर्ता :** पण सर्वसामान्य माणसाला असे वर्तन करणे फार कठीण आहे ना?

**दादाश्री :** मी तुम्हाला आजपासूनच असे आचरण करा असे म्हणत नाही. केवळ भावनाच करायला सांगत आहे. भावना म्हणजे तुमचा निश्चय.



[ 4 ]

# फॅमिली ऑर्गनायजेशन

## हे कसले 'आयुष्य'?

फॅमिली ऑर्गनायजेशन (कुटंब व्यवस्था) चे काही ज्ञान आहे का तुमच्याजवळ? आपल्या भारतात 'कुटुंब कसे चालवावे' याचे ज्ञान फार कमी आहे. विदेशात तर ते फॅमिली वगैरे काही मानतच नाहीत. जेम्स वीस वर्षाचा झाला म्हणजे त्याचे आई-वडील विलियम आणि मेरी जेम्सला म्हणतील, तू तुझे बघ आणि आम्ही दोघे पोपट आणि पोपटीण आमचे बघून घेऊ! (तू वेगळा आणि आम्ही दोघे वेगळे) त्यांना कुटुंब व्यवस्था सांभाळायची जास्त सवयच नाही. त्यांच्या कुटुंबात सरळ स्पष्टच बोलून टाकतात. मेरी आणि विलियमचे पटले नाही तर लगेच घटस्फोट घेऊन मोकळे होतात! आपल्या इथे अजून लगेच घटस्फोटाच्या निर्णयापर्यंत पोहोचत नाही. आपल्या इथे तर कायम सोबतच राहायचे. रोज भांडण करायचे आणि परत त्याच खोलीत झोपायचे!

जीवन जगण्याचा हा (योग्य) मार्ग नाही. याला फॅमिली लाईफ (कौटुंबिक जीवन) म्हणत नाहीत. अरे! आपल्या इथल्या म्हाताऱ्या आजींना जीवन जगण्याचा मार्ग विचारला तर त्या सांगतील, 'आरामशीर खा, प्या, घाई कसली आहे?' माणसाच्या प्राथमिक गरजा कोणत्या आहेत, आधी त्या नीट ओळखून घ्याव्यात. त्या सोडल्या तर बाकी सर्व अनावश्यक गोष्टी आहेत. या अनावश्यक गोष्टीच माणसाच्या जीवनात अडचणी आणतात. आणि मग झोपेच्या गोळ्या खाव्या लागतात!

घरात भांडणे का होतात? मुलांशी वादविवाद का होतो? हे सगळे जाणून घ्यायला नको का? मुलगा उलट उत्तर देत असेल? आणि यावर उपचार म्हणून डॉक्टरला विचारले तर डॉक्टर तरी काय सांगणार? अरे, घरी डॉक्टरची बायकोच डॉक्टरचे ऐकत नसते ना!

इथे कोणी आयुष्यभर कापसाचे सर्वेक्षण करतो, तर कोणी लवंगाचे सर्वेक्षण करतो, असे काही ना काही सर्वेक्षण चालूच असते; परंतु आतील सर्वेक्षण मात्र कोणी कधी करत नाही!

शेठ घरात तुमचा सुगंध दरवळतो का?

**प्रश्नकर्ता :** सुगंध दरवळतो म्हणजे काय?

**दादाश्री :** तुमच्या घरात तुम्ही सर्वांना खुश ठेऊ शकता का? घरात भांडण-तंटे होत नाहीत ना?

**प्रश्नकर्ता :** भांडण तर होतच असते, रोजच होते.

**दादाश्री :** अरे, असे कसे तुम्ही शेठजी? बायकोला सुख दिले नाही, मुलांना सुख दिले नाही, अरे स्वत:ला देखील सुखी करू शकला नाहीत! तुम्हाला मोक्षाला जायचे असेल तर मला तुमच्यावर रागवावेच लागेल. आणि तुम्हाला देवगतीत जायचे असेल तर दुसरा सरळ रस्ता पण मी तुम्हाला दाखवीन. मग मी तुम्हाला 'या शेठजी या, या' असे म्हणेल. मला दोन्ही भाषा बोलता येतात. ही अशी भ्रांतीची भाषा मी काही विसरलेलो नाही. पूर्वी 'तुन्डे तुन्डे मतिर्भिन्ना' होती म्हणजे, कुटुंबाकुटुंबात मतभेद असत; पण आज तर घरातल्या घरातच एकमेकांशी कलह असतात! तुंड गेले आणि तुमडे राहिले! संसाराच्या हिताहिताचे कोणाला भानच नाही.

## असे संस्कार घडविणे शोभते का?

आई-वडील म्हणून कसे वागावे याचेही भान नाही. एक गृहस्थ होते त्यांनी त्यांच्या बायकोला हाक मारली, 'अरे बाळाची आई कुठे गेली?' मग बाळाची आई आतून बोलते 'काय काम आहे?' तेव्हा ते

म्हणतात 'इकडे ये, लवकर ये, लवकर ये, बघ, तुझ्या बाळाला! कसा पराक्रम करतोय ते बघ तरी!! बाळाने पाय उंच करून माझ्या खिशातून कसे दहा रुपये काढले! कसा हुशार झाला आहे बाळ!'

अरे मूर्खा, असा कसा रे तू निपजलास! बाप झाला आहेस! लाज नाही का वाटत? या बाळाला कसले प्रोत्साहन मिळाले ते समजले का तुला? मुलाला वाटेल की आपण खरोखर खूप मोठा पराक्रम केला! हे असे शोभते का? काही तरी नियम असावेत की नाही? या हिंदुस्तानाचे मनुष्यपण असे लूटले गेले तर शोभेल का? काय बोलले तर मुलाला चांगले उत्तेजन मिळेल आणि काय बोलले तर त्याचे नुकसान होईल, हे तुम्हाला समजायला नको का? 'अनटेस्टेड फादर' आणि 'अनटेस्टेड मदर' आहात. बाप मुळा आणि आई गाजर, तर मग सांगा मुले कशी असतील? सफरचंद थोडेच बनतील?!

## प्रेमाने वागा - मुले सुधारतीलच

एक बाप त्याच्या मुलाला काहीतरी टाकून बोलला, त्यामुळे मुलगा खूप चिडला, आणि बापाला म्हणू लागला, 'तुमचे आणि माझे जमणार नाही.' तेव्हा बाप मुलाला म्हणाला, 'मी तुला अजिबात खराब बोललेलो नाही, तू एवढा कशाला चिडतोस? तेव्हा मी त्या बापाला म्हणालो, आता कशाला मलमपट्टी करतोस? प्रथम तू त्याला चिडण्यासारखे बोललासच का? कोणालाही डिवचू नका. ही पिकलेली फळे आहेत. नाजूक आहेत. म्हणून काही बोलूच नका. 'मेरी भी चूप आणि तेरी भी चूप. खा-प्या आणि मजा करा.'

**प्रश्नकर्ता :** मुले वाईट मार्गाला गेलीत तर त्यांना योग्य मार्गाला आणावे हे आई-वडिलांचे कर्तव्य नाही का?

**दादाश्री :** बरोबर आहे, पण आई-वडिलांसारखे वागून तसे बोलले पाहिजे, पण आजकाल आई-वडील आहेतच कुठे?

**प्रश्नकर्ता :** आई-वडील कुणाला म्हणायचे?

**दादाश्री :** आई-वडील त्यांना म्हणायचे की जरी मुलगा वाईट

मार्गावर गेला असेल तरी सुद्धा, एखाद्या दिवशी आई-वडील त्याला म्हणतील, 'बेटा, हे आपल्याला शोभत नाही, हे तू काय केलेस?' त्यावर लगेच दुसऱ्या दिवसापासून तो सगळे वाईट मार्ग बंद करून टाकेल! असे प्रेमच कुठे आहे? हे तर प्रेम नसलेले आई-वडील! हे जग प्रेमानेच वश होते. आजच्या आई-वडिलांचे मुलांवर किती प्रेम आहे? तर गुलाबाच्या रोपट्यावर माळ्याचे जेवढे प्रेम असते तेवढे! त्यांना आई-वडील कसे म्हणायचे? 'अनसर्टिफाईड फादर आणि अनसर्टिफाईड मदर'! मग मुलाची काय अवस्था होईल? खरे तर प्रथम टेस्टिंग करवून, 'सर्टिफिकेट' मिळवल्यानंतरच लग्नाची परवानगी दिली पाहिजे. जसे परीक्षेत पास झाल्याशिवाय, सर्टिफिकेट मिळवल्याशिवाय 'गव्हर्नमेंट' सुद्धा नोकरी देत नाही. तर मग इथेही सर्टिफिकेट मिळवल्याशिवाय लग्न कसे करू शकतो? आई आणि वडील बनण्याची जबाबदारी देशाच्या पंतप्रधानाच्या जबाबदारीपेक्षाही मोठी आहे. पंतप्रधानापेक्षाही उच्च पद आहे.

**प्रश्नकर्ता :** 'सर्टिफाईड' आई-वडील यांची व्याख्या काय?

**दादाश्री :** 'अनसर्टिफाईड' (अपात्र) आई-वडील म्हणजे त्यांची मुले त्यांच्या म्हणण्यानुसार वागत नाहीत, त्यांची मुले त्यांचा आदर करीत नाहीत, हैराण करतात! अशा आई-वडिलांना 'अनसर्टिफाईड' असेच बोलावे लागेल ना!

## ...नाही तर मौन धरून 'पाहत' राहा

एक सिंधी भाऊ आले होते, ते सांगत होते की, 'माझा एक मुलगा असे करतो आणि दुसरा मुलगा तसे करतो, त्यांना कसे सुधारता येईल?' मी म्हणालो, 'तुम्ही अशी मुले का आणलीत? निवडून निवडून चांगली मुले का नाही आणलीत?' सगळे हापूस आंबे सारखेच दिसतात, तरी पण आपण निवडून आणतो ना? पण तुम्ही दोन आंबट आणलेत, दोन खराब आणलेत, दोन बेचव आणलेत, आणि दोन गोड आणलेत. आता या आंब्याचा रस चांगला लागेल का? मागाहून भांडण-तंटा करण्यात काय अर्थ आहे? आंबट आंबे आणलेत, मग आंबटला आंबट

आहे हे ओळखणे म्हणजे ज्ञान. चवीला आंबट आहेत ते फक्त पाहत राहायचे. तसेच या प्रकृतीला (स्वभावाला) पाहत राहायचे आहे. कोणाच्याही हातात काही सत्ता नाही. प्रत्येक अवस्था नैसर्गिक रचना आहे. यात कोणाचे काही चालत नाही, काहीही बदलत नाही, आणि शिवाय हे 'व्यवस्थित' आहे.

**प्रश्नकर्ता :** मारल्याने मुले सुधारतात का?

**दादाश्री :** कधीच सुधारत नाहीत, मारून कधीही सुधारत नाहीत. या मशीनला मारून पाहा बरे! ती मोडून जाईल. तसेच या मुलांच्या बाबतीत आहे. वरवर सुधारलेले वाटतात पण आतून तुटतात (निराश होतात.) दुसऱ्यांना एन्करेज (प्रेरित) करता येत नसेल तर मग मौन राहा ना, चुपचाप चहा प्या ना! सगळ्यांचे चेहरे पाहत राहा, हे दोन पुतळे भांडत आहेत त्यांना पाहत राहा. कारण ते आपल्या ताब्यात नाही. आपण फक्त यांना जाणणारेच आहोत.

ज्याला हा संसार वाढवायचा असेल त्याने संसारात भांडण-तंटे करावे, सर्व काही करावे. ज्याला मोक्षाला जायचे असेल त्याला आम्ही एवढेच सांगतो की, 'जे काय घडत आहे' त्यास फक्त 'पाहात' राहा.

या जगात रागावून काहीही सुधारणार नाही, उलट मनात अहंकार करतो की मी खूप रागावलो. रागावल्यानंतर पाहिले तर समोरच्या व्यक्तीत काहीही बदल झालेला नसतो. पितळ पितळच राहील आणि कांसे कांसेच राहील. पितळाला मारत राहिलात तर त्याला गंज लागल्याशिवाय राहील का? नाही. याचे काय कारण? तर गंज लागणे हा त्याचा स्वभावच आहे. म्हणून मौनच राहायचे. चित्रपटातील एखादे नावडते दृश्य आले तर आपण चित्रपटगृहातील पडदा फाडतो का? नाही ते दृश्य पण बघायचे. सगळीच दृश्ये आवडतील अशी थोडीच असतात? काही जण तर थियेटरमध्ये बसून ओरडतात. 'अरे, तो मारून टाकेल, तो मारून टाकेल!' जणू हे सगळे दयेचे पुतळेच आलेत! हे सर्व तर पाहायचे आहे. खा, प्या, बघा आणि मजा करा!!

## ...स्वतःलाच सुधारण्याची गरज

**प्रश्नकर्ता :** काही मुले शिक्षकांना उलटून बोलतात, ती कधी सुधारतील?

**दादाश्री :** जो चुकांचे परिणाम भोगतो त्याचीच चूक. या गुरुंचीच योग्यता नसेल म्हणून शिष्य उलटून बोलतात. ही मुले तर समजदारच आहेत; पण गुरु आणि आई–वडीलच चक्रम आहेत! आणि ही म्हातारी माणसे जुन्या गोष्टींना चिकटून बसतात, मग मुले उलटून बोलणारच ना? आजकालच्या आई–वडिलांचे चारित्र्यबळ कमी झाले आहे म्हणून मुले अशी वागतात. आचार, विचार, आणि उच्चार यात जर सकारात्मक बदल घडवता आले तर तुम्ही परमात्मा बनू शकता आणि नकारात्मक बदल घडले तर तुम्ही राक्षसही बनू शकता.

लोक समोरच्याला सुधारण्याच्या प्रयत्नात सगळेच मोडून टाकतात. आधी स्वतः सुधारेल तर दुसऱ्यालाही सुधारू शकेल. पण स्वतःला सुधारल्याशिवाय समोरची व्यक्ती कशी सुधारेल? म्हणून प्रथम आपली बाग सांभाळा मग दुसऱ्यांच्या बागा बघायला जा. स्वतःची बाग सांभाळली तरच फळे–फुले मिळतील.

## ढवळाढवळ नाही, 'ॲडजस्ट' होण्यासारखे आहे

संसाराचा अर्थच समसरण मार्ग, त्यामुळे त्यात सतत बदल होत असतात; पण ही जुनी म्हातारी माणसे परंपरांना चिकटून बसतात. अरे, काळानुसार वाग, नाही तर मार खाऊन मरशील! काळानुसार ॲडजस्ट होता आलेच पाहिजे. मी चोराबरोबर, खिसेकापूबरोबर, सगळ्यांबरोबर ॲडजस्ट होऊ शकतो. चोराशी मी बोललो तर त्यालाही जाणवते की हे करुणामय आहेत. मी चोराला 'तू चुकीचा आहेस' असे म्हणत नाही. कारण तो त्याचा दृष्टीकोन आहे. लोक त्याला नालायक म्हणून शिव्या देतात. मग हे वकील लोक काय खोटारडे नाहीत? साफ खोटी केस असेल तरी मी जिंकून देईन असे म्हणतात, मग ते लबाड नाहीत का? तुम्ही चोराला धूर्त म्हणता, मग या खोट्याचे खरे करणाऱ्यांवर विश्वास

का ठेवायचा ? पण तरी त्यांचेही चालतेच ना ? आम्ही कोणालाही चुकीचे म्हणत नाही. तो त्याच्या दृष्टीकोनातून बरोबरच आहे. पण आम्ही त्याला खरी गोष्ट समजावून सांगतो की, तू चोरी करतोस त्याचे फळ तुला काय मिळेल ?

ही म्हातारी माणसे घरात आली की म्हणणार, 'हे लोखंडाचे कपाट ? हा रेडियो ? हे असेच का ? हे तसेच का ? अशी प्रत्येक गोष्टींवर टिप्पणी करणार ? अरे, एखाद्या तरुणाशी मैत्री कर. हे जग तर सतत बदलतच राहणार आहे. त्याशिवाय हे कसे जगू शकतील ? काहीतरी नवीन पाहिले की मोह होतो. नवीन नसेल तर जगतील कसे ? अशा नव्या गोष्टी अनंत आल्या आणि अनंत गेल्या. त्यात तुम्ही ढवळाढवळ करायची नसते. जे तुम्हाला आवडत नसेल ते करू नका. हे आईस्क्रीम तुम्हाला आवडत नसेल तर नका खाऊ. ते थोडेच तुमच्या मागे लागले आहे, 'मला खा, मला खा म्हणून.' तुम्हाला खायचे नसेल तर नका खाऊ. पण ही म्हातारी माणसे त्याचा तिरस्कार करतात. हे जे काही मतभेद होतात ते नव्या पिढीला समजून न घेतल्यामुळेच होतात. नवीन पिढी त्यांच्या पिढीनुसारच वागणार. मोह म्हणजे नवनवीन गोष्टी उत्पन्न होतात आणि नवनवीन दिसत राहते. आम्ही लहानपणापासूनच बुद्धीने खूप विचार करून समजून घेतले की हे जग उलट होत आहे की सुलट होत आहे, आणि हे पण लक्षात आले होते की, जगाला बदलण्याची सत्ता कोणाच्याही हातात नाही. म्हणून आम्ही काय सांगत असतो की, जमान्याप्रमाणे ॲडजस्ट व्हा ! मुलगा नवीन टोपी घालून आला तर त्याला असे म्हणू नये की ही कसली टोपी घेऊन आलास ? तर त्याला म्हणावे 'वाह !' किती छान टोपी आहे, कुठून आणलीस ? कितीला आणलीस ? खूप स्वस्त मिळाली ? अशाप्रकारे ॲडजस्ट व्हा.

ही मुले दिवसभर कानाला रेडियो लावून बसत नाहीत का ? कारण त्या बिचाऱ्यांच्या जीवनात हा नवीन रस उदयास आला आहे. हे यांचे नवीन डेव्हलपमेंट आहे. जर तो 'डेव्हलप' (प्रगतशील) झालेला असता तर कानाला रेडियो लावून फिरला नसता. एकदा बघितल्यानंतर पुन्हा त्याने हातच लावला नसता. नवीन वस्तू एकदा बघायची असते,

त्याचा कायम अनुभव घेण्याची गरज नसते. त्याला कानाचे नवीनच इंद्रिय मिळाले आहे, म्हणून तो दिवसभर रेडियो ऐकत राहतो! आता त्याची मनुष्यजन्माची सुरुवात झाली आहे. मनुष्यगतीत हजारो वेळा आलेला मनुष्य असे काही करणार नाही.

**प्रश्नकर्ता :** मुले सारखी बाहेर फिरत राहतात.

**दादाश्री :** मुले काही तुमच्या बंधनात नाहीत. सगळे आपापल्या बंधनात आहेत. तुम्ही त्यांना एवढेच म्हणायचे की, 'वेळेवर ये' मग तो जेव्हा येईल ते 'व्यवस्थित.' व्यवहार सगळाच करा, पण कषायरहित करा. व्यवहार कषायरहित झाला तर मोक्ष, आणि कषाय सहित व्यवहार तर संसार.

**प्रश्नकर्ता :** माझा पुतण्या रोज नऊ वाजता उठतो आणि त्यामुळे काही काम होत नाही.

**दादाश्री :** आपण त्याला पांघरूण घालावे आणि म्हणावे आरामशीर झोप भाऊ. त्याची प्रकृती वेगळी आहे म्हणून तो उशीरा उठतो. पण काम जास्त करतो. आणि काही मूर्ख पहाटे चार वाजता उठतात तरी काही काम करत नाहीत. मी सुद्धा प्रत्येक कामात उशीर करायचो. शाळेत जाताना सुद्धा शाळेतील घंटा वाजल्यानंतर घरून निघायचो आणि रोज गुरुजींचे बोलणे खायचो! आता गुरुजींना काय माहीत की माझी प्रकृती कशी आहे? प्रत्येकाचे (इंजिन) 'रस्टन' वेगळे, आणि 'पिस्टन' ही वेगवेगळे असते.

**प्रश्नकर्ता :** पण उशीरा उठण्यात शिस्त राहत नाही ना?

**दादाश्री :** तो उशीरा उठतो म्हणून तुम्ही जी कटकट करता तीच खरी शिस्त नाही. तुम्ही कटकट करणे बंद करा. तुम्हाला ज्या-ज्या शक्ती हव्या आहेत त्या या दादांजवळ रोज शंभर वेळा मागा, सर्व मिळतील.

आता या भाऊला समजावले म्हणून त्यांनी माझ्या आज्ञांचे पालन करणे सुरू केले आणि घरातील सगळ्यांनीच पुतण्याला बोलणे बंद

केले. परिणाम असा आला की, आठवड्याभरातच पुतण्या सात वाजता उठू लागला आणि घरात सगळ्यांपेक्षा जास्त चांगले काम करू लागला!

## दुसऱ्यांना सुधारण्यासाठी 'बोलणे' बंद करा

आजकालच्या काळात कमी बोलण्यासारखे उत्तम काहीच नाही. या काळात मनुष्याचे बोल हे दगड मारण्यासारखे निघत असतात, प्रत्येकाचे बोल तसेच असतात. म्हणून 'बोलणे' कमी करणे चांगले. कोणाला काहीही सांगण्यासारखे नाही. सांगितल्याने उलट जास्त बिघडते. आपण त्याला सांगितले की, गाडीवर लवकर जा, तर तो उशीरा जाईल. आणि जर काहीच सांगितले नाही तर वेळेवर जाईल. आपण नसलो तरी सर्व काही चालूच राहणार आहे. हा तर स्वतःचा खोटा अहंकारच आहे. ज्या दिवसापासून तुम्ही मुलांवर ओरडणे बंद कराल त्या दिवसापासून मुले सुधारू लागतील. तुमचे बोल चांगले निघत नाहीत म्हणून समोरच्याला द्वेषभाव होतो. तुमचे शब्द तो स्वीकारत नाही, उलट ते बोल परत तुमच्याकडे येतात. तुम्ही मुलांना खायचे, प्यायचे बनवून द्या आणि तुमचे कर्तव्य पार पाडा. दुसरे काही सांगण्यासारखे नाही. सांगून फायदा नाही असा निष्कर्ष काढला आहे का तुम्ही? मुले मोठी झाली आहेत, ती काय आता शिडी वरून खाली पडतात? तुम्ही तुमचा 'आत्मधर्म' कशाला विसरता? या मुलांशी तर रिलेटिव्ह धर्म आहे. तिथे डोकेफोड करण्यात काही अर्थ नाही. भांडण करण्याऐवजी मौन बाळगलेले जास्त चांगले. भांडण केल्याने स्वतःचेही बिघडते आणि दुसऱ्यांचेही बिघडते.

**प्रश्नकर्ता :** मुलांना आपली जबाबदारी समजत नाही.

**दादाश्री :** जबाबदारी 'व्यवस्थित शक्ती'ची आहे. तो तर त्याची जबाबदारी समजलेलाच आहे. त्याला समजावून सांगणे तुम्हाला जमत नाही म्हणून गडबड होते. समोरच्याला आपले म्हणणे पटले तर आपले सांगितलेले कामाचे. इथे तर आई-वडीलच वेड्यासारखे वागतात मग मुले पण वेडेपणा करणारच ना?

**प्रश्नकर्ता :** मुले उद्धट बोलतात.

**दादाश्री :** हो, पण तुम्ही ते कसे बंद कराल? तुम्ही सुद्धा तुमच्या बाजूने तसे बोलणे बंद केले तर सगळ्यांचे चांगले होईल.

एकदा जर मनात फूट पडली, मन कलुषित झाले की मग त्याची लिंक चालू होते. नंतर मनात त्यांच्याविषयी अभिप्राय बनून जातो की ही व्यक्ती अशीच आहे. अशा वेळी आपण मौन (गप्प) राहून समोरच्याचा विश्वास संपादन करणे गरजेचे आहे. फक्त बडबड केल्याने कुणाचे काही सुधारत नाही. सुधारण्याचे सामर्थ्य तर केवळ ज्ञानी पुरुषांच्या वाणीतच आहे. मुलांसाठी तर आई-वडिलांची जोखीमदारी आहे. तुम्ही बोलले नाही तर नाही का चालणार? चालेल. म्हणूनच भगवंतानी म्हटले आहे की जिवंत असूनसुद्धा मेल्यासारखे वागा. बिघडलेल्याचे मन तोडू नये. बिघडलेल्याला सुधारू शकतो. बिघडलेल्याला सुधारणे हे आमचे काम आहे, तुम्ही ते करू नका. तुम्ही आमच्या आज्ञेनुसार वागा. जो स्वतः सुधारलेला असेल तोच दुसऱ्यांना सुधारू शकतो. जो स्वतःच सुधारलेला नसेल तो दुसऱ्यांना काय सुधारणार?

मुलांना सुधारायचे असेल तर आमच्या आज्ञेनुसार वागा. घरात सहा महिने मौन बाळगा. मुलांनी विचारले तरच बोला आणि तरी देखील त्यांना सांगून ठेवा की मला नाही विचारले तर उत्तम. आणि मुलांबद्दल उलटसुलट विचार आले तर ताबडतोब प्रतिक्रमण करून टाकावे.

## 'रिलेटिव्ह' समजून वरपांगी राहावे

मुलांना तर नऊ महिने पोटात ठेवायचे, मग लहान असे पर्यंत त्यांना चालवायचे, फिरवायचे, नंतर सोडून द्यायचे, या गायी-म्हशी देखील त्यांच्या वासरांना सोडून देतात ना? मुलांना पाच वर्षांपर्यंत रागवावेही लागते. नंतर रागावणेही बंद करा आणि वीस वर्षानंतर त्याची बायकोच त्याला सुधारेल. मग आपल्याला सुधारण्याची गरजही नाही.

मुलांबरोबर वरवरचा व्यवहार करा. खरे पाहिले तर कोणीच कोणाचे नाही. या देहाच्या आधारे मुले आपली आहेत असे वाटते. हा देह जळून जाईल तेव्हा सोबत येतो का कोणी? माझा-माझा म्हणून

छातीशी कवटाळतात, त्यांना खूप सोसावे लागते. अतिशय भावूक विचार कामी येत नाहीत. मुले तर व्यवहाराच्या आधाराने आहेत. मुलाला दुखले, भाजले तर जरूर उपचार करावा पण त्यासाठी रडण्याची काय गरज आहे?

सावत्र मुलांना मांडीवर घेऊन दूध पाजतात का? नाही. मग तसे ठेवा. हे 'कलियुग' आहे. सर्व रिलेटिव्ह संबंध आहेत. 'रिलेटिव्ह'ला रिलेटिव्हच्याच जागेवर ठेवा 'रियल'मध्ये आणू नका. जर 'रियल' संबंध असता तर मुलाला म्हटले असते, 'तू जोपर्यंत सुधारत नाहीस तोपर्यंत वेगळा रहा.' परंतु हा तर रिलेटिव्ह संबंध आहे म्हणून 'ॲडजस्ट एव्हरीव्हेर.' तुम्ही दुसऱ्यांना सुधारण्यासाठी जन्माला आलेले नाहीत, तुम्ही तर कर्माच्या तावडीतून सुटण्यासाठी आला आहात. सुधारण्यापेक्षा त्याच्यासाठी चांगली भावना करा. बाकी, कोणी कोणाला सुधारू शकत नाही. ज्ञानी पुरुष स्वतः सुधारलेले असतात तेच फक्त दुसऱ्यांना सुधारू शकतात. म्हणून त्यांच्याकडे घेऊन जा. मुले का बिघडतात? तर त्यांना सतत डिवचल्यामुळे. संपूर्ण जगाचे कामच डिवचल्यामुळे बिघडले आहे. या कुत्र्याला देखील डिवचले तर तो चावेल, लचका तोडेल. म्हणून तर लोक कुत्र्याला डिवचत नाहीत. मग मनुष्यांना डिवचाल तर काय होईल? ते पण चावतीलच. तेव्हा कोणाला डिवचू नका.

या आमच्या एक-एक शब्दात अनंत-अनंत शास्त्र सामावलेली आहेत! हे जर समजून घेतले आणि त्याप्रमाणे सरळ झालात तर तुमचे कल्याणच होऊन जाईल! एकावतारी होऊ शकाल असे हे अदभूत 'विज्ञान' आहे! लाखो जन्म कमी होऊन जातील!! या विज्ञानामुळे राग समाप्त होईल आणि द्वेषही समाप्त होईल आणि वीतराग होता येईल. अगुरु-लघु स्वभाववाले व्हाल, म्हणून या विज्ञानापासून जेवढा लाभ घेता येईल, तेवढा कमीच.

## सल्ला द्यावा पण अनिवार्यपणे

माझ्यासारखे 'अबुध' झालात तर कल्याणच झाले समजा. बुद्धी वापरली म्हणून परत संसार उभा झाला. घरातील लोक विचारतील तेव्हाच उत्तर द्या, आणि त्यावेळी देखील मनात वाटले पाहिजे की यांनी

काही विचारले नाही तर खूप बरे होईल. असा नवस धरावा. कारण त्यांनी विचारलेच नाही तर बुद्धीचा वापर करावा लागणार नाही. असे आहे, की आपले सर्व जुने संस्कार आता संपुष्टात आलेले आहेत. हा दूषमकाळ सगळीकडे जबरदस्त व्यापलेला आहे. याच्या प्रभावाने आपले सर्व संस्कार संपुष्टात आले आहेत. या माणसांना कोणाला समजावून सांगताच येत नाही. वडिलांनी मुलास काही सांगितले तर मुलगा म्हणतो की, 'मला तुमच्या सल्ल्याची' गरज नाही. मग सल्ला देणारा कसा आणि घेणारा कसा? काय ही माणसे?! हे लोक तुमचे म्हणणे का ऐकत नाहीत? कारण तुमचे म्हणणे खरे नाही म्हणून. खरे असेल तर ऐकतीलच ना? लोक असे का म्हणतात? आसक्तीमुळे असे म्हणतात? या आसक्तीमुळे तर लोक स्वत:चे पुढील जन्म बिघडवून घेतात.

## आता, या जन्मात तर सांभाळून घ्यावे

'व्यवस्थित शक्ती'च सगळे चालवीत असते, त्यामुळे बोलण्यासारखे काहीच नाही. 'स्वत:चा धर्म' करून घेण्यासारखा आहे. या पूर्वी तर असेच समजत होते की, 'आपणच चालवीत आहोत' म्हणून आपल्यालाच (भांडण) मिटवावे लागेल. पण आता तरी आपल्याला चालवायचे नाही ना? आता तर हा (स्वत:) सुद्धा भोवरा आणि तोसुद्धा भोवरा. मग सोड ना सगळी भानगड! ग्लास फुटो, कढी सांडो किंवा बायको मुलाला रागवत असो, असे होत असल्यावर देखील तुम्ही कुश बदलून तसेच पडून राहा. तुम्ही पाहिले तर बायको म्हणेल, तुम्हाला दिसत असून गप्प का बसला आहात? किंवा मग हातात माळ घेऊन माळ जपत राहा, मग बायकोला वाटेल की ते तर मंत्रजाप करीत आहेत. अरे, सोडा ना. आपले काय देणेघेणे? स्मशानात जायचे नसेल तर कटकट करा! तात्पर्य काहीही बोलण्यासारखे नाही. या गायी, म्हशीसुद्धा त्यांच्या वासरांजवळ त्यांच्या पद्धतीने थोडेसेच भो–भो करतात, जास्त बोलत नाहीत! आणि फक्त हा एक मनुष्यच शेवटपर्यंत बडबड करत राहतो. जे बोलतात ते मूर्ख म्हटले जातात, पूर्ण घराला बरबाद करून टाकतात. याचा अंत कधी येणार? अनंत जन्म संसारात भटकले. स्वत:चेही भले

केले नाही आणि दुसऱ्यांचेही भले केले. जो माणूस स्वत:चे भले करू शकतो तोच दुसऱ्याचेही भले करू शकतो.

## नाती खरी की ओढवून घेतलेली पीडा?

मुलगा आजारी असेल तर उपचार वगैरे अवश्य करा; पण सर्व वरवर. आपल्या मुलांना कसे समजावे? तर सावत्र समजावे. मुलांना आपली मुले म्हणता आणि मुलगा सुद्धा माझी आई आहे असे म्हणेल, पण आतून फार मोठा संबंध नाही. या काळात सगळी नाती सावत्र आहेत असेच समजा, नाही तर फार त्रास होईल. मुले कुणाला मोक्षाला नेणार नाहीत. जर तुम्ही समंजस झालात तर मुलेही समंजस होतील. मुलांचे अति लाड करणे चांगले आहे का? हे लाड-कौतुक तर गोळीबार करतात. या लाड-कौतुकाचे रूपांतर द्वेषामध्ये होते. नाईलाजास्तव करावे लागेल असे प्रेम करावे. त्यांच्यासमोर 'तू प्रिय आहेस' असे म्हणावे पण आतून ही जाणीव कायम ठेवावी की ही वरवरची गोष्ट आहे, बळजबरीने करावी लागलेली आहे. ही नाती खरी नाहीत. मुलांबराबरचे खरे नाते केव्हा कळते की जेव्हा तुम्ही त्याला तासभर मारले, शिव्या दिल्या, तेव्हा त्याचे तुमच्यावर किती प्रेम आहे ते कळेल. तो तुमचा खरा मुलगा असेल तर मार खाऊन देखील तो तुमचे पाय धरेल आणि म्हणेल, 'बाबा, मला मारून तुमचे हात खूप दुखले असतील!' असा म्हणणारा मुलगा असेल तर मात्र खरे नाते ठेवा. पण हे तर तासभर मुलांना रागावले तर उलट वडिलांनाच मारायला धावतील! मोहामुळे ही आसक्ती होत आहे. 'रियल' मुलगा कोणास म्हटले जाईल की बाप मेल्यानंतर मुलगाही स्मशानात जाऊन म्हणेल, 'आता मला जगण्याची इच्छाच उरली नाही, मलाही मरायचे आहे.' तुमच्या मुंबईत बाप मेल्यानंतर एखादा मुलगा जातो का बापासोबत?

ही सगळी स्वत:हून ओढवून घेतलेली पीडा आहे. मुलगा असे म्हणतच नाही की सगळे माझ्यासाठी खर्च करा. पण बापच सगळे मुलावर उधळतो. ही बापाचीच चूक आहे. तुम्हाला वडिलांची सगळी कर्तव्ये पार पाडायची आहेत. योग्य ती सगळीच कर्तव्ये पार पाडायची

आहेत. एका बापाने मुलाला इतके कवटाळले की मुलगा बापाला चावला! कोणीही आत्मा कोणाचा पिता किंवा पुत्र होऊ शकतच नाही. या कलियुगात तर जास्त करून मागणारे, घेणेदारच मुलाच्या रूपात आलेली असतात! आपण गिऱ्हाईकाला म्हटले की, मला तुमच्याशिवाय करमत नाही, तुमच्याशिवाय करमत नाही, तर गिऱ्हाईक काय करेल? तुम्हाला मारेल. ही सगळी रिलेटिव्ह नाती आहेत, यातूनच कषाय (क्रोध-मान-माया-लोभ) उत्पन्न होतात. या राग कषायातूनच द्वेष कषाय उत्पन्न होतो. जास्त उड्या मारण्याची गरजच नाही. खीर उतू गेली तर चुलीतून लाकूड बाहेर काढावे लागते. तसेच हे आहे.

## ...मग योग्य व्यवहार कोणता?

**प्रश्नकर्ता :** मुलांच्या बाबतीत योग्य काय आणि अयोग्य काय ते समजत नाही.

**दादाश्री :** जेव्हा आपण स्वत:हून देत सुटतो तोच अतिशहाणपणा आहे. पाच वर्षाचा होईपर्यंत ते ठीक आहे. मग पुढे मुलगा म्हणेल की, 'पप्पा मला फीसाठी पैसे द्या' तेव्हा त्याला सांगा, 'पैसे नळातून येत नाहीत. दोन दिवस अगोदर सांगायला हवे होतेस. मला उधार आणावे लागतील.' असे सांगून दुसऱ्या दिवशी पैसे द्यावे. मुलांना असे वाटू लागते की, नळाला पाणी येते तसे बाबा पैसे देतात. म्हणून मुलांशी असे संबंध ठेवा की नाती तर टिकतील पण मुलगा डोक्यावर बसणार नाही, बिघडणार नाही. सध्या तर मुलांचे इतके जास्त लाड करतात की ती बिघडतात. जास्त लाड करायची काय गरज? या बकरीवर प्रेम वाटते का? बकरीत आणि मुलात काय फरक आहे? दोघांतही आत्मा आहे. जास्त लाड पण नाही आणि अगदी नि:स्पृह पण होऊ नये. मुलाला सांगावे की काही अडचण असेल तर सांग. जोपर्यंत मी जिवंत आहे तोपर्यंत काही अडचण असेल तर जरूर सांग. अडचण असेल तरच, एरवी नाही. हे तर मुलाच्या खिशातून पैसे पडले तर वडील ओरडतात, 'अरे चंदु, अरे चंदु!' अहो, तुम्ही कशाला ओरडता? तो विचारील तेव्हा सांगा. तुम्ही यात कशाला गोंधळ घालता? तुम्ही नसाल तेव्हा कोण

पाहणार आहे? सगळे 'व्यवस्थित शक्तीच्या' ताब्यात आहे. विनाकारण ढवळाढवळ करीत राहता. शौचाला जाणे सुद्धा 'व्यवस्थित शक्तीच्या' ताब्यात आहे आणि तुमचे तुमच्यापाशी आहे. स्वत:च्या स्वरूपात स्वत: असेल तर तो पुरुषार्थ आहे, आणि स्वत:ची स्वसत्ता आहे. या पुद्‌गलामध्ये काही पुरुषार्थच नाही. पुद्‌गल प्रकृतीच्या ताब्यात आहे.

मुलांचा अहंकार जागृत झाला मग त्यांना बोलण्यात काही अर्थ नाही, आणि तुम्ही कशाला बोलायचे? ठोकर लागल्यावर स्वत:च शिकेल. मुलगा पाच वर्षाचा होईपर्यंत त्याला सांगण्याची सूट आहे. पाच ते सोळा वर्षांपर्यंतच्या मुलांना काही कारणास्तव दोन थोबाडीत द्याव्या पण लागतात. पण एकदा का वीस वर्षाचा तरूण झाला की त्याचे नाव पण घेऊ शकत नाही, त्याला एक अक्षर सुद्धा बोलू शकत नाही. तो मोठा गुन्हा होईल. मग तो बंदुकीची गोळी सुद्धा झाडेल.

**प्रश्नकर्ता :** हे 'अनसर्टिफाईड' 'फादर' आणि 'मदर' (अपात्र आई-वडील) आहेत म्हणून हे 'कोडे' उभे झाले आहे का?

**दादाश्री :** हो, नाही तर मुले अशी होणारच नाहीत. तुम्ही सांगाल तशीच ती वागतील. आई-वडिलांमध्येच काही दम नाही. जमीन खराब आहे, बी खराब आहे म्हणून माल पण खराब आहे! आणि असे असूनही यांना वाटते की आपला मुलगा महावीरांसारखा होईल. महावीरांसारखा मुलगा कसा होऊ शकेल? महावीरांची आई तर कशी असते?!! वडील एक वेळ कमी पात्र असतील तरी चालेल पण आई, ती तर कशी असावी!

**प्रश्नकर्ता :** मुलांना घडविण्यासाठी, त्यांच्यावर संस्कार घडविण्यासाठी आपण काही विचारच करू नये का?

**दादाश्री :** विचार करण्यास काही हरकत नाही.

**प्रश्नकर्ता :** अभ्यास तर शाळेत होतो; पण संस्कार घडविण्याचे काय?

**दादाश्री :** घडवायचे काम सोनाराकडे सोपवा. घडविणारेच त्यांना

घडवतील. मुलगा पंधरा वर्षांचा होईपर्यंत तुम्ही त्याला सांगू शकता. तोपर्यंत तुम्ही जसे आहात तसा त्याला बनवा. त्यानंतर त्याची बायकोच त्याला घडवील. घडवता येत नसेल तरीही लोक घडवतच राहतात ना?! म्हणून घडण चांगली होत नाही. मूर्ती चांगली होत नाही. नाक अडीच इंचाचे हवे तिथे साडे चार इंचाचे होते. मग बायको येईल ती त्याचे नाक कापून बरोबर अडीच इंचाचे करेल. नंतर तो पण तिचे नाक कापेल आणि म्हणेल, 'ये आता, बघतो तुला.'

## कर्तव्यात नाटकीय राहा

हे नाटक आहे! नाटकातील पत्नी-मुलांना कायमची स्वतःची मानाल तर चालेल का? हो, नाटकात बोलतात तसे बोलण्यास हरकत नाही.' हा माझा मोठा मुलगा, शतायू होवो.' पण सर्व वरवर, 'सुपरफ्लुअस', नाटकीय. या सगळ्यांना खरे (स्वतःचे) मानले त्यासाठीच प्रतिक्रमणे करावी लागतात. जर खरे मानले नसते तर प्रतिक्रमणे करावीच लागली नसती. जिथे खरे मानू लागतो तिथे राग-द्वेष सुरू होतात, आणि प्रतिक्रमण केल्यानेच मोक्ष मिळतो. या दादांनी दाखवले त्या आलोचना-प्रतिक्रमण-प्रत्याख्यानानेच मोक्ष आहे.

हा संसार तर '*तायफा*' (फजिती) आहे, मोठी चेष्टाच आहे. तासभर जर मुलांशी भांडण केले तर मुलगा काय म्हणेल? 'तुम्ही इथे राहाणार असाल तर मी इथे राहाणार नाही.' त्यावर जर बाप म्हणाला, 'मी तुला माझी संपत्ती देणार नाही.' तेव्हा मुलगा म्हणेल, 'तुम्ही कोण आले मला न देणारे?' ते मारून-ठोकून घेतील असे आहेत. अरे, कोर्टात एक मुलगा वकिलांना म्हणाला, 'माझ्या वडिलांचे नाक कापले जाईल असे काही तरी करा.' मी तुम्हाला तीनशे रुपये जास्त देईन.' वडील मुलाला म्हणाले, 'तू असा निघशील असे मला माहीत असते तर तुला जन्मतःच मारून टाकले असते! तेव्हा मुलगा म्हणाला की, 'तुम्ही मला मारले नाही हेही आश्चर्यच आहे ना!!' असेच नाटक घडायचे होते मग कसे माराल?! अशी नाटके तर अनंत प्रकारची घडलेली आहेत. अरे! ऐकताच कानाचे पडदे फाटतील!! याहीपेक्षा तऱ्हेतऱ्हेचे असंख्य

किस्से या जगात घडलेले आहेत, म्हणून जगापासून सावध राहा. आता 'स्वतःच्या' देशाकडे (आत्म्याकडे) वळा. स्वदेशात परता. परदेशात तर भुतेच भुते आहेत. जाल तिथे भुते!

कुत्री पिल्लांना दूध पाजते ते तिचे कर्तव्य आहे, ती काय उपकार करत नाही, म्हशीच्या रेडक्याने जर दोन दिवस दूध प्यायले नाही तर म्हशीला खूप वेदना होतात. हे तर स्वतःच्या गरजेने दूध पाजतात. बाप मुलांना मोठे करतो तेही स्वतःच्या गरजेनेच. त्यात नवीन काय केले? ते तर कर्तव्यच आहे.

## मुलांबरोबर 'ग्लास विथ केअर'

**प्रश्नकर्ता :** दादा घरात मुले-मुली ऐकत नाहीत. मी खूप रागावतो तरी पण काहीच परिणाम होत नाही.

**दादाश्री :** या रेल्वेच्या पार्सल्सवर लेबल लावलेली तुम्ही पाहिली आहेत का? 'ग्लास हॅन्डल विथ केअर' (काच आहे, सांभाळा) असे लिहिलेले असते ना? तसेच घरात पण 'ग्लास हॅन्डल विथ केअर' वागावे. आता काच असेल आणि त्याला तुम्ही हातोड्याने मारत राहिले तर काय होईल? त्याच प्रमाणे घरातील माणसांना काचेप्रमाणे सांभाळले पाहिजे. तुम्हाला त्या बंडलवर (काचेच्या वस्तूंवर) कितीही चीड आली तरी तुम्ही त्यास खाली फेकाल का? लगेच वाचाल की, 'ग्लास हॅन्डल विथ केअर'! घरी काय होत असते की, काही झाले तर लगेच तुम्ही मुलींवर ओरडता 'अशी कशी पर्स हरवली, कुठे गेली होतीस? लक्ष कुठे होते तुझे?' असे तुम्ही हातोडे मारता. हे 'ग्लास हॅन्डल विथ केअर' समजून घेतले तर स्वरूपज्ञान दिले नसेल तरीही समजू शकेल.

या जगाला सुधारण्याचा रस्ताच प्रेम आहे. जग ज्याला प्रेम म्हणते ते प्रेम नाही, ती तर आसक्ती आहे. या मुलीवर प्रेम करता; पण जेव्हा तिच्या हातून ग्लास फुटतो तेव्हा प्रेम राहते का? तेव्हा तर तुम्ही चिडता म्हणून ती आसक्ती आहे.

मुले-मुली आहेत त्यांच्याशी तुम्हाला पालकाप्रमाणे, ट्रस्टीप्रमाणे

राहायचे आहे. त्यांच्या लग्नाची चिंता करण्याचे कारण नाही. घरात जे काही घडते त्याला 'करेक्ट' आहे असे म्हणा. 'इनकरेक्ट' म्हणाल तर काहीही फायदा होणार नाही. चुकीचे पाहणाऱ्यांना संताप होईल. ज्याचा एकुलता एक मुलगा मेला असेल त्याला करेक्ट आहे असे म्हणू नये. तिथे तुम्ही 'खूप वाईट झाले' असे म्हणा. असा देखावा करावाच लागेल. नाटक करावे लागेल. बाकी आतून तर करेक्ट आहे असे समजूनच चालावे. काचेचा ग्लास जोपर्यंत हातात आहे तोपर्यंत ग्लास आहे! नंतर तो निसटला आणि फुटला तर करेक्ट आहे असे म्हणावे. मुलीला सांगावे 'जरा जपून चालत जा, परंतु आत करेक्ट आहे असेच म्हणावे.' रागीट वाणी निघाली नाही तर समोरच्याला टोचत नाही. फक्त क्रोधाने तोंडावर बोलणे यालाच क्रोध म्हटले जात नाही, तर आतल्या आत कुढणे तोही क्रोधच आहे. आणि सहन करणे हे तर दुप्पट क्रोध आहे. सहन करणे म्हणजे दाबत राहणे, हे तर जेव्हा स्प्रिंग उसळेल तेव्हा समजेल. सहन कशाला करायचे? त्याचे समाधान तर ज्ञानाने करावे. उंदराने मिशा कुरतडल्या तर ते 'पाहायचे' आणि 'जाणायचे' त्यात रडारड कशासाठी? हे जग पाहण्यासाठी आणि जाणण्यासाठी आहे!

## घर, एक बाग

एक भाऊ मला म्हणाला की, 'दादा, घरात माझी बायको असे करते, तसे करते.' त्यावर मी त्याला म्हणालो, 'बायकोला विचारा ती काय म्हणते?' ती म्हणते की 'माझा नवरा एकदम बेकार आहे. बिनअकली आहे.' मग आता यात तुम्ही स्वत:साठी एकतर्फी न्याय कशाला शोधता? तेव्हा तो भाऊ म्हणाला, 'माझे पूर्ण घर बिघडले आहे. मुले बिघडली आहेत, बायको बिघडली आहे.' मी म्हणालो, 'काहीही बिघडलेले नाही. तुम्हाला ते बघता येत नाही. तुम्हाला तुमचे घर बघणे जमले पाहिजे.' तुमचे घर तर एक बाग आहे. सतयुग, व्दापारयुग आणि त्रेतायुगातील घरे शेतासारखी असत. एखाद्या शेतात फक्त गुलाब, एखाद्या शेतात फक्त चमेली, एखाद्या शेतात फक्त मोगरा असे होते. आता या कलियुगात शेते उरली नाहीत, फक्त बागा आहेत.

म्हणजे (बागेत) एक गुलाब, एक मोगरा, एक चमेली! आता घरात तुम्ही वडीलधारी गुलाब आहात आणि घरातील सर्वांना गुलाब करू इच्छिता. तुम्ही दुसऱ्या फुलांना म्हणता की 'तू माझ्यासारखा नाहीस, तू तर पांढरा आहेस. तुला पांढरे फूल का आले? गुलाबी फूल उगव. अशाप्रकारे समोरच्याला टोचून बोलत राहतात! अरे, फुलाला पाहायला (ओळखायला) तर शिका. तुम्हाला फक्त एवढेच जाणून घ्यायचे आहे की समोरच्या व्यक्तीची प्रकृती कशी आहे? कुठल्या प्रकारचे फूल आहे. फळे-फुले येईपर्यंत रोपट्याला पाहत राहायचे की हे रोपटे कसले आहे? मला तर काटे आहेत याला नाहीत. माझे गुलाबाचे रोपटे आहे, याचे गुलाबाचे नाही. मग फूल आल्यावर आपल्याला कळेल की, 'ओहोहो! हा तर मोगरा आहे!' मग त्याच्याबरोबर मोगऱ्याप्रमाणे वागणूक ठेवावी. चमेली असेल तर चमेलीप्रमाणे वागावे, समोरच्याच्या प्रकृतीस्वभावानुसार वागणूक ठेवावी. पूर्वीच्या काळी वडिलधाऱ्यांच्या मतानुसार मुलांना, सुनांना वागावे लागे. आता कलियुगात निरनिराळी प्रकृती (स्वभाव), तेव्हा कुणाचे एकमेकांशी जुळत नाही, म्हणून या काळात तर घरातील सगळ्यांची प्रकृती ओळखून ॲडजस्ट होऊन राहता आले पाहिजे. ॲडजस्ट होणे जमले नाही तर नाती बिघडतील. म्हणून बागेला सांभाळा आणि माळी व्हा. बायकोचा प्रकृतीस्वभाव वेगळा असेल, मुलांचा, मुलींचा सगळ्यांचाच प्रकृतीस्वभाव वेगवेगळा असतो. प्रत्येकाच्या प्रकृतीस्वभावाचा लाभ घ्या. हे तर रिलेटिव्ह (आधारित) संबंध आहेत, बायको सुद्धा रिलेटिव्ह आहे! अरे, हा देहच रिलेटिव्ह आहे ना! रिलेटिव्ह म्हणजे यांच्याशी नीट वागला नाहीत तर ते तुम्हाला सोडून जातील!

कुणालाही सुधारण्याची शक्ती या काळात संपलेली आहे. म्हणून सुधारण्याची आशा सोडूनच द्या. कारण (तुमच्यात) मन,वचन,कायेची एकात्मवृत्ती असेल तरच तुमच्याकडून समोरचा सुधारू शकेल. जसे मनात असेल तसेच वाणीत निघेल आणि तसेच वागणुकीत असेल तरच समोरचा सुधारेल. आता हे राहिलेले नाही. घरात प्रत्येकासोबत असा व्यवहार ठेवा की ज्यामुळे सगळ्यांशी नॉर्मल संबंध राहू शकतील.

## त्यात मूर्च्छित होण्यासारखे आहेच काय?

मुले 'आजोबा, आजोबा' असे म्हणतात तेव्हा आजोबा मनात खुश होतात! अरे, मुले 'आजोबा, आजोबा' म्हणणार नाहीत तर काय 'मामा, मामा' म्हणणार?! ही मुले 'आजोबा, आजोबा' म्हणतात पण मनात समजून असतात की आजोबा म्हणजे जे थोड्या दिवसानंतर मरणार आहेत. जे आंबे आता बेकार झाले आहेत, फेकायच्या लायकीचे झाले आहेत त्यांचे नाव आजोबा! आणि आजोबा आतल्या आत खुश होतात की मी आजोबा झालो! असे हे जग आहे!

अरे, पप्पांनाच मुलगा जर गोड, बोबड्या भाषेत म्हणाला, 'पप्पाजी चला, आई चहा प्यायला बोलवते.' तेव्हा तो पप्पा आतून इतका खुश होतो, इतका गद्गद होतो की विचारू नका! एक तर बोबडे बोल, गोड बोल, त्यातही जर पप्पाजी म्हटले... म्हणजे तिथे तर मोठा पंतप्रधान असेल त्यांची पण काही किंमत नाही. तो मनातल्या मनात असे मानून बसतो की या जगात माझ्याशिवाय दुसरा कोणी पप्पाच नाही. अरे मूर्खा, ही कुत्री, मांजरे, गाढवे सुद्धा त्यांच्या पिल्लांचे पप्पाच आहेत ना? कोण पप्पा होत नाही? ही सगळी भांडणे त्यामुळेच तर आहेत ना? समजून-उमजून कोणी पप्पा बनला नाही, असे चारित्र्य जर कोणाच्या उदयात आले असेल त्याला तर ओवाळले पाहिजे. नाहीतर सगळे बाप बनतातच ना? ऑफिसमध्ये साहेबाने फटकारले आणि घरी मुलगा पप्पा पप्पा करत आला तर पप्पा सगळे विसरून खुश होतो कारण ही पण एक प्रकारची दारूच आहे, ती सगळे विसरायला लावते!

एकही मूलबाळ नसेल आणि जर मूल जन्माला आले तर ते खूप हसवते, बापाला खूप आनंद देते. जेव्हा तेच मूल सोडून जाते तेव्हा तितकेच दुःखही देते. म्हणून एक गोष्ट आपण लक्षात ठेवली पाहिजे की जे आले आहेत ते जाणारही, मग तेव्हा काय-काय होईल? म्हणून आजपासूनच हसायचे नाही, म्हणजे नंतर कसली भानगडच नाही ना! नाही तर कोणत्या जन्मात मुले नव्हती? कुत्री, मांजरी, सगळ्याच

ठिकाणी पिल्ले, पिल्ले आणि पिल्लांनाच कवटाळून धरले ना! या मांजरीच्याही मुली असतातच ना!

## व्यवहार नॉर्मालिटीपूर्वक असावा

म्हणून प्रत्येकात नॉर्मालिटी आणा. एका डोळ्यात प्रेम आणि एका डोळ्यात सक्ती ठेवा. सक्तीने समोरच्याला जास्त दु:ख होत नाही. क्रोध केल्याने फार नुकसान होते. सक्ती म्हणजे क्रोध नाही पण फुत्कार. आम्ही पण धंद्यावर जातो तेव्हा फुत्कार मारतो, 'तुम्ही असे का करता? काम का करत नाही?' व्यवहारात ज्या ठिकाणी जो भाव असायला हवा तो भाव उत्पन्न होत नसेल तर तो व्यवहार बिघडेल.

एक माणूस माझ्याजवळ आला, तो बँकेचा मॅनेजर होता. तो मला म्हणाला की, 'मी माझ्या घरी बायकोला आणि मुलाला एक अक्षर देखील बोलत नाही. मी एकदम शांत राहतो.' त्यावर मी त्यांना म्हणालो, 'तुम्ही अगदी शेवटच्या प्रकारचे बेकार मनुष्य आहात. या जगात तुम्ही काहीच कामाचे नाहीत.' त्या माणसाला मनात असे वाटत होते की, मी असे सांगेन तर दादा मला खूप मोठे बक्षीस देतील. अरे मूर्खा, याचे काय बक्षीस दिले जाते? मुलगा काही चुकीचे करीत असेल त्यावेळी त्याला 'असे का केलेस? आता असे होता कामा नये' असे वरवर नाटकीय बोललेच पाहिजे. नाही तर मुलाला असेच वाटेल की आपण जे काही करीत आहोत ते योग्यच करीत आहोत. कारण बापाला ते मान्य आहे. वेळप्रसंगी त्यांना टोकले नाही म्हणून तर तुमची मुले तुमच्या डोक्यावर बसली आहेत. बोलायचे सर्व परंतु नाटकीय! मुलांना रात्री जवळ बसवून शांतपणे समजवावे, चर्चा करावी. घरातील सगळेच कानेकोपरे साफ करावे लागतील ना? मुलांना थोडेसेच हलवण्याची गरज असते. तसे संस्कार तर असतातच पण थोडे कडक व्हावे लागते. त्यांना असे हलवण्यात काही गुन्हा आहे का?

**प्रश्नकर्ता :** दादा, माझा मुलगा पंधराशे रुपये कमावतो. मी रिटायर्ड (सेवानिवृत्त) आहे, मी त्याच्यासोबत राहतो. तर आता मुलगा

आणि सून मला सारखे टोकत राहतात की, 'तुम्ही असे का करता? बाहेर का जाता?' म्हणून मी आता त्यांना सांगूनच टाकणार की, मी घर सोडून जातो.

**दादाश्री :** तुम्हाला खायला-प्यायला नीट देतात ना?

**प्रश्नकर्ता :** हो दादा.

**दादाश्री :** तर मग घर सोडून जातो असे अजिबात बोलू नका. जर असे बोलूनसुद्धा तुम्ही जाऊ शकला नाहीत, तर तुमचे शब्द तुम्हालाच गिळावे लागतील.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे मग मी त्यांना काहीच सांगू नको का?

**दादाश्री :** फार तर हळूवारपणे त्यांना एवढेच सांगावे की, 'तुम्ही असे केलेत तर बरे होईल, मग ऐकणे न ऐकणे हे तुमच्या मर्जीची गोष्ट आहे.' तुमची चापट समोरच्याला लागेल अशी असेल आणि त्यामुळे त्याच्यात काही परिवर्तन होणार असेल तर काही बोला. पण जर पोकळ चापट मारली तर तो उलट जास्त उद्धटपणा करेल. त्यापेक्षा न मारणे हेच उत्तम (न बोलणेच बरे.)

घरात चार मुले असतात त्यापैकी दोघांची काहीच चूक नसते तरीही बाप त्यांना रागवत असतो आणि ती दुसरी दोन मुले की जी नेहमीच चुका करतात त्यांना काहीच बोलत नसतो. असे सर्व घडते ते पूर्वीच्या रूटकॉजमुळे आहे.

## अशी आशा तर बाळगूच नका

**प्रश्नकर्ता :** मुलांना चिरंजीव का म्हणत असतील?

**दादाश्री :** चिरंजीव लिहिले नाही तर दुसरे शब्द घुसतील. आपला मुलगा मोठा व्हावा, सुखी व्हावा आपल्या मृत्युपूर्वी तो सुखी असलेला पाहावा, अशी भावना असते ना? तरी देखील मनात कुठेतरी अशी आशा असतेच की, म्हातारपणी त्याने माझी सेवा करावी. हे आंब्याचे रोपटे

कशासाठी लावतात? आंबे खाण्यासाठी. पण आजकालची मुले, ही आंब्याची झाडे कशी आहेत? त्यांना दोनच आंबे येतील आणि बापाकडून दुसरे दोन आंबे मागतील. म्हणून (मुलांकडून) आशा-अपेक्षा ठेवूच नका.

एक गृहस्थ मला म्हणाले की माझा मुलगा मला सांगतो की 'तुम्हाला दर महिन्याला शंभर रुपये पाठवू का?' तेव्हा ते भाऊ म्हणाले 'मी तर त्याला सरळ सांगितले की, 'बेटा मला तुझ्या बासमती तांदुळाची गरज नाही, माझ्या इथे बाजरी पिकते त्याने माझे पोट भरते. हा (घेण्याचा) नवीन व्यवहार कशाला सुरू करू? जे आहे त्यात मी संतुष्ट आहे.'

## मैत्री ती सुद्धा एक 'ॲडजस्टमेंट'

**प्रश्नकर्ता :** मुलांना पाहुणे समजायचे का?

**दादाश्री :** पाहुणे समजण्याची गरज नाही. या मुलांना सुधारण्याचा हा एक मार्ग आहे, त्यांच्याशी मैत्री करा. आम्ही तर लहानपणापासूनच हा मार्ग निवडला होता. म्हणून माझी एवढ्याशा छोट्या मुलांबरोबर पण मैत्री आणि पंच्याऐंशी वर्षाच्या म्हाताऱ्याशी पण मैत्री! मुलांशी मैत्रीचा व्यवहार करायला हवा. मुले प्रेम शोधतात पण ते त्यांना मिळत नाही. म्हणून त्यांच्या अडचणी तेच जाणतात. ते सांगूही शकत नाही आणि सहनही होत नाही. आजच्या तरुणांसाठीचा मार्ग आमच्याजवळ आहे. या जहाजाची दिशा कुठे वळवावी, याचा मार्ग आम्हाला आतूनच सापडतो. माझ्याजवळ असे प्रेम उत्पन्न झाले आहे की जे वाढतही नाही आणि कमीही होत नाही. जे वाढते, कमी होते त्यास आसक्ती म्हटली जाते. जे कमी-अधिक होत नाही ते परमात्म प्रेम आहे. या प्रेमाने कुठलीही व्यक्ती वश होऊन जाते. मला कोणालाही वश करायचे नाही, तरी देखील प्रेमामुळे प्रत्येकजण आपोआपच वश होतो. आम्ही तर निमित्त आहोत.

## आता खऱ्या धर्माचा उदय

**प्रश्नकर्ता :** या नव्या पिढीतून धर्माचा लोप का होत चालला आहे?

**दादाश्री :** धर्माचा लोप तर झालेलाच आहे, लोप (नाश) व्हायचे

काहीच शिल्लक राहिलेले नाही. आता परत धर्माचा उदय होऊ लागला आहे. जेव्हा एकीकडे लोप होऊ लागतो त्याचवेळी दुसरीकडे उदयाची सुरुवात होत असते. जशी या समुद्राची ओहोटी पूर्ण होते आणि अर्ध्या तासात भरतीला सुरुवात होते. त्याचप्रमाणे हे जग चालत राहते, भरती-ओहोटीच्या नियमाप्रमाणे. धर्माशिवाय तर मनुष्य जगूच शकत नाही. धर्माशिवाय मनुष्याला दुसऱ्या कशाचा आधार आहे?

ही मुले तर आरशासारखी आहेत. मुलांवरून समजते की 'आपल्यात किती चुका आहेत!' बाप रात्रभर झोपत नाही आणि मुलगा आरामशीर झोपतो, यात बापाची चूक आहे. मी बापाला म्हटले, 'यात तुझीच चूक आहे.' मागील जन्मात तूच मुलाला डोक्यावर चढवले होतेस, बिघडवले होतेस, आणि ते देखील स्वतःच्या फायद्यासाठी. म्हणजे हे समजण्यासारखे आहे. या अशा अनसर्टिफाईड फादर आणि अनसर्टिफाईड मदरच्या पोटी ही मुले जन्मलेली आहेत, त्यात ते काय करतील? वीस-पंचवीस वर्षाचा झाला की बाप होऊन जातो. अजूनपर्यंत तर त्याचाच बाप त्याच्यावर ओरडत असतो! तो तर रामभरोसे बाप बनतो. मग यात मुलाचा काय दोष? ही मुले आमच्याजवळ सगळ्या चुका मान्य करतात, चोरी केली असे तर तेही मान्य करतात. आलोचना तर जे अद्वितीय, अजोड असतील तिथेच केली जाते. हिंदुस्तानाचे अद्भुत स्टेजमध्ये परिवर्तन होईल!

## संस्कार प्राप्तीसाठी, तसे चारित्र्य हवे

**प्रश्नकर्ता :** दादा, घरात वातावरण शांत राहील आणि आध्यात्मिक प्रगतीही करू शकू असे काही करून द्या.

**दादाश्री :** फक्त घरातच शांतता राहील एवढेच नाही; पण मुले सुद्धा आपले बघून अधिक संस्कारी होतील. हे तर आई-वडिलांचे वेड्यासारखे वागणे पाहूनच मुलेही वेडी झाली आहेत. कारण आई-वडिलांचेच आचार, विचार, पद्धतशीर नाहीत. नवरा-बायको जर स्वतःच्या मुलांच्या उपस्थितीत वेडे चाळे करीत असतील तर मुले बिघडणार नाहीत तर काय होणार? मुलांवर कसे संस्कार पडतील?

काही मर्यादा तर असायला हवी? या निखाऱ्याचे तेज कसे असते? लहान मुले देखील या निखाऱ्यांना घाबरतात ना? आई-वडिलांचेच मन विचलित झालेले आहे. वाटेल तसे, समोरच्याचे मन दुखावले जाईल असे ते बोलतात, म्हणून मुले बिघडतात. तुम्ही असे बोलता की नवऱ्याला दुःख होते आणि नवरा असे बोलतो की तुम्हाला दुःख होते. असे हे सर्व 'पझल' (कोडे) तयार झाले आहे. हिंदुस्तानात असे होत नसते, पण या कलियुगाचा हा परिणाम आहे, म्हणून असेच असते. त्यातही हे एक आश्चर्यकारक विज्ञान उदयास आले आहे. हे विज्ञान जो प्राप्त करेल त्याचे कल्याण होईल!!

## ...म्हणून सद्भावनांकडे वळवा

**प्रश्नकर्ता :** मुले वाकडी वागतात अशा वेळी काय करावे?

**दादाश्री :** मुले वेडी-वाकडी वागतात, तेव्हा देखील तुम्ही फक्त पाहत राहा आणि जाणत राहा. मनात त्यांच्यासाठी भावना करावी. आणि परमेश्वराजवळ प्रार्थना करावी की त्यांच्यावर कृपा करा.

आपण तर जे घडले तोच न्याय म्हणावे. जो भोगतो त्याची चूक आहे. जे घडले तेच बरोबर म्हणून चालतात तर समाधान होईल, भगवंत म्हणाले की 'तू स्वतः सुधार म्हणजे तुझ्या हजेरीने सर्व सुधारेल'

लहान मुला-मुलींना समजवावे की सकाळी अंघोळ वगैरे करून सूर्यपूजा करावी आणि थोडक्यात बोलावे की मला आणि साऱ्या जगाला सद्बुद्धी द्या, जगाचे कल्याण करा. एवढे बोलले तरी त्यांना संस्कार मिळाले असे म्हटले जाईल. आणि आई-वडीलही त्यांच्या कर्मबंधनातून सुटतील. हे सर्व कर्तव्यच आहे. आई-बापाने पाच हजाराचे कर्ज करून मुलाला शिकवले असेल तरी सुद्धा एखाद्या दिवशी मुलगा उद्धटपणे वागला तेव्हा आई-वडिलांनी त्याला आम्ही (कष्ट करून) तुला शिकवले अशी उपकाराची भाषा बोलून दाखवू नये. ते तर तुम्ही 'ड्युटी बाउंड' होते, तुमचे कर्तव्यच होते, कर्तव्य होते म्हणूनच केले. आपण फक्त आपले कर्तव्य करत राहावे.



# [ 5 ]
# समजदारीने शोभेल गृहसंसार

## मतभेदात समाधान कशा प्रकारे

काळ विचित्र येऊ राहिला आहे. वादळा पाठोपाठ वादळे येणार आहेत! म्हणून सावध राहा. जशी वाऱ्याची वादळे येतात ना तशीच निसर्गाची वादळे येणार आहेत. मनुष्याच्या डोक्यावर महासंकटे आहेत. रताळे जसे भट्टीत भाजले जाते त्याचप्रमाणे लोक भाजले जात आहेत! कशाच्या आधारावर जगत आहोत, याचे स्वत:ला भान नाही. स्वत:वर असलेला आत्मविश्वास पण ढळला आहे! तेव्हा आता काय होईल? घरात बायकोशी मतभेद होतात ते दूर करता येत नाहीत. मुलांशी वाद होतात त्याचेही समाधान करता येत नाही आणि आतल्या आत गोंधळत राहतो.

**प्रश्नकर्ता :** नवरा तर असेच म्हणतो ना की, बायकोनेच तडजोड करावी, मी नाही करणार!

**दादाश्री :** हं..., म्हणजे 'लिमिट' संपली. बायको तडजोड करू शकते आणि नवरा करू शकत नाही म्हणजे नवऱ्याची 'लिमिट' संपली. खरा पुरुष असेल तो तर असे बोलेल की ज्यामुळे बायको खुश होईल. आणि असे करून गाडी पुढे चालवत राहील. आणि तुम्ही तर पंधरा-पंधरा दिवसापर्यंत, महिनाभर गाडी उभी करून ठेवता. असे नाही चालणार. जोपर्यंत समोरच्याच्या मनाचे समाधान होत नाही तोपर्यंत तुम्हाला अडचण होणार. म्हणून त्याचे समाधान करावे.

**प्रश्नकर्ता :** समोरच्याचे समाधान झाले असे कशावरून म्हटले जाईल? एकवेळ समोरच्याचे समाधान होईलही, पण त्यात त्याचे अहित असेल तर?

**दादाश्री :** ते तुम्ही पाहू नका. समोरच्याचे अहित असेल ते तर त्याचे त्यालाच पाहायचे आहे. तुम्हाला समोरच्याचे हित पाहायचे, पण त्याचे हित पाहण्याची शक्ती आहे का तुमच्यात? तुम्ही तुमचेच हित ओळखू शकत नाही मग दुसऱ्याचे हित कसे ओळखणार? प्रत्येकजण आपापल्या क्षमतेप्रमाणे हित पहातात, तेवढे हित पाहावे. पण समोरच्याचे हित पाहता-पाहता संघर्ष निर्माण होईल असे होता कामा नये.

**प्रश्नकर्ता :** समोरच्याचे समाधान करण्याचा आपण प्रयत्न करू पण त्याचा परिणाम काही वेगळाच होणार आहे अशी आपल्याला खात्री असेल तर मग काय करावे?

**दादाश्री :** परिणाम काहीही येवो, पण तुम्ही समोरच्या व्यक्तीचे समाधान करायचे आहे हा भाव निश्चित ठेवायचा. 'समभावाने निकाल' करायचा आहे असे निश्चित करा, मग निकाल होणार की नाही, याचा विचार आधीपासून करू नये. आणि निकाल निश्चित होणारच! आज नाहीतर दुसऱ्या दिवशी, तिसऱ्या दिवशी. खूपच चिकट असेल तर दोन वर्ष, तीन वर्ष किंवा पाच वर्षही लागतील. बायकोचे ऋणानुबंध खूप गाढ (चिकट) असतात म्हणून तिथे थोडा जास्त वेळ लागतो. हे सगळे आपल्यासोबतच असतात, तिथे निकाल हळूहळू होतो. पण आपण ठरवले आहे की, कधी ना कधी आपल्याला समभावाने निकाल करायचाच आहे तर त्याचा निकाल होईलच, त्याचा अंत येईलच. जिथे चिकट ऋणानुबंध असतात तिथे फार जागृत राहावे लागते, अगदी छोटासा साप असला तरी देखील सतत सावध राहावे लागते. बेसावध राहिलो तर समाधान होणार नाही. समोरची व्यक्ती बोलली आणि तुम्ही सुद्धा बोललात, बोलण्यातही हरकत नाही, पण बोलण्यामागे 'समभावाने निकाल करायचा आहे' असा तुमचा निश्चय आहे, म्हणून द्वेष राहत नाही. बोलले जाणे हा पुद्‌गल स्वभाव आहे आणि द्वेष ठेवणे यामागे

तुमचा आधार आहे. म्हणून आपल्याला तर समभावाने निकाल करायचा आहे असा ठाम निश्चय करून काम करीत राहायचे मग हिशोब चुकता होणारच. मागणाऱ्याला आज नाही देऊ शकलो तर उद्या देऊ. होळी आल्यावर देऊ, नाही तर दिवाळी आल्यावर देऊ. पण मागणारा घेऊनच जाईल.

या जगातील लोक हिशोब चुकवल्यानंतर तिरडीवर जातात. या जन्माचे हिशोब कसेही करून चुकते करतात पण या जन्मात नवीन बांधतात ते वेगळे. आता आपण नवीन (हिशोब) बांधत नाही आणि जुने आहेत ते या जन्मात चुकते होणारच. सगळे हिशोब संपले म्हणून भाऊ चालले तिरडीवर! आणि जिथे हिशोब अपूर्ण राहिले असतील तिथे आणखी काही दिवस जास्त राहावे लागेल. या जन्माचे सगळे हिशोब या शरीराच्या माध्यमाने चुकतेच होऊन जाणार. आणि या जन्मात जितका गुंता केला असेल तो सोबत घेऊन जातो, मग पुढील जन्मात नव्याने हिशोब सुरू होतो.

## ...म्हणून संघर्ष टाळा

म्हणून कोणत्याही परिस्थितीत संघर्ष टाळा. या संघर्षामुळे या जन्माचे तर बिघडवतातच परंतु पुढील जन्माचे सुद्धा बिघडवतात! जो या जन्माचे बिघडवतो तो पुढच्या जन्माचे बिघडवल्याशिवाय राहत नाही! ज्याचा हा जन्म सुधारतो त्याचा पुढचा जन्म सुद्धा सुधारतो. या जन्मात जर आपल्याला कोणत्याच प्रकारची अडचण आली नाही तर समजावे की पुढील जन्मासाठी पण काहीच अडचण नाही. आणि इथे केलेल्या सर्व अडचणी पुढच्या जन्मात सोबतच येणार आहेत.

**प्रश्नकर्ता :** संघर्षाचा सामना संघर्षाने केला तर काय होते?

**दादाश्री :** डोके फुटते! एक माणूस मला संसार पार करण्याचा मार्ग विचारत होता. त्यास मी सांगितले की, 'संघर्ष टाळ.' त्याने मला विचारले की, 'संघर्ष म्हणजे काय' तेव्हा मी म्हणालो की आपण सरळ चालत असू आणि रस्त्यात खांब आला तर आपण त्या खांबाला वळून

जायला पाहिजे की, त्या खांबाला धडक दिली पाहिजे?' तो म्हणाला की 'नाही! धडक दिली तर डोके फुटेल.'

वाटेत जर दगड पडलेला असेल तर आपण काय करायला हवे? तर दगडाला वळून जायला हवे. रस्त्यात जर म्हशीचा भाऊ (रेडा) आडवा आला तर तुम्ही काय कराल? म्हशीच्या भावाला ओळखता ना तुम्ही? तो समोरून येत असेल तर त्याच्यापासून लांब जावे लागेल नाही तर शिंगे मारून आपले डोके फोडून टाकेल. त्याचप्रमाणे जर अशा प्रकारचा मनुष्य येत असेल तर लांबून जावे लागते. असेच संघर्षाचेही आहे. एखादा मनुष्य आपल्यावर रागावण्यासाठी आला, त्याचे शब्द तोफेच्या गोळ्यासारखे निघत असतील, तेव्हा आपण समजून घ्यायला हवे की, आपल्याला संघर्ष टाळायचा आहे. ध्यानी मनी नसताना जर अचानकच आपल्या मनावर काही परिणाम होऊ लागला तर अशा वेळेस आपण हे समजावे की, समोरच्याच्या मनाचा परिणाम आपल्यावर झाला आहे. म्हणून आपण तिथून निघून जावे. हे सगळे संघर्ष आहेत. हे जसजसे तुम्ही समजू लागाल तसतसे तुम्ही संघर्ष टाळू शकाल, संघर्ष टाळल्याने मोक्ष प्राप्त होतो! हे जग एक संघर्षच आहे. स्पंदन स्वरूप आहे. 1951 साली मी एका 'व्यक्तीला हे एक सूत्र दिले होते. संघर्ष टाळ' असे त्याला सांगितले होते आणि अशाप्रकारे त्याला समजावले होते. म्हणजे मी शास्त्र वाचत होतो तेव्हा तो येऊन मला म्हणाला की, 'दादा, मला काहीतरी द्या.' तो माझ्या इथे नोकरी करत होता, तेव्हा मी त्याला म्हणालो, 'तुला काय देणार? तू तर सर्व जगाशी, सगळ्यांशीच भांडून येतोस, मारामारी करून येतोस. रेल्वेत सुद्धा दोन हात करून येतोस, असे तर पैसे पाण्यासारखे खर्च करतोस, आणि रेल्वेत जे नियमानुसार पैसे भरायला हवे ते भरत नाहीस आणि वरून त्यांच्याशी भांडण करतोस.' हे सर्व मला माहीत होते म्हणून मी त्याला म्हणालो की तू संघर्ष टाळ. तुला इतर काही शिकण्याची गरज नाही. तो आज सुद्धा पाळत आहे. आता जरी तुम्ही त्याच्याशी संघर्ष करण्याच्या कितीही नव्या-नव्या पद्धती शोधून काढल्या, तऱ्हेतऱ्हेच्या शिव्या दिल्या तरीही तो संघर्ष न करता तिथून निसटून जाईल.

म्हणजे संघर्ष टाळा, संघर्षानेच हे जग टिकून आहे. यालाच भगवंताने 'जग वैरभावाने निर्माण झाले' असे म्हटले आहे. प्रत्येक मनुष्य, फक्त मनुष्यच नव्हे तर प्रत्येक जीव वैर बांधत असतो. प्रमाणापेक्षा जास्त झाले म्हणजे वैर बांधल्याशिवाय राहतच नाही. मग तो साप असो, विंचू असो, बैल असो की रेडा असो कुणीही असो पण शेवटी वैर बांधतोच. कारण प्रत्येकात आत्मा आहे. आत्मशक्ती प्रत्येकात सारखीच आहे, पण या पुद्‌गलाच्या निर्बळतेमुळे सहन करावे लागते. आणि सहन करण्याबरोबर तो वैर बांधल्याशिवाय राहत नाही. किंबहुना तो पुढच्या जन्मी या वैराचा बदलाही घेतो!

## सहन? नाही, सोल्यूशन आणा

**प्रश्नकर्ता :** दादा, संघर्ष टाळायचे तुम्ही जे सांगितले याचा अर्थ सहन करणे असाच झाला ना?

**दादाश्री :** संघर्ष टाळायचा म्हणजे सहन करणे नव्हे. सहन कराल तर किती करू शकाल? सहन करणे आणि स्प्रिंग दाबणे हे दोन्ही सारखेच आहे. स्प्रिंग दाबून ठेवलेली किती दिवस राहील?! म्हणून सहन करण्याचे शिकूच नका, गोष्टीवर समाधान शोधण्याचे शिका.

अज्ञान दशेत सहनच करण्याचे असते. नंतर एक दिवस स्प्रिंग इतकी जोरात उसळते की सर्व उध्वस्त करून टाकते. निसर्गाचा नियमच हा असा आहे.

कुणामुळे आपल्याला सहन करावे लागेल असा जगाचा नियमच नाही. दुसऱ्यांमुळे आपल्याला जे काही सहन करावे लागते तो खरोखर तर आपलाच हिशोब आहे, पण आपल्याला हे समजत नाही की हा कुठला आणि कोणत्या खात्याच्या माल आहे? म्हणून आपल्याला असे वाटते की या व्यक्तीने नवीन माल द्यायला सुरुवात केली. नवीन कोणी देतच नाही, आपण पूर्वी दिलेलाच परत येतो. आपल्या या ज्ञानात सहन करण्याचे नसतेच. ज्ञानाने खुलासा करून घ्यावा की समोरचा 'शुद्धात्मा' आहे. हे जे काही दु:ख आले आहे ते माझ्याच पूर्वकर्माच्या उदयामुळे

आले आहे, समोरची व्यक्ती तर मात्र निमित्त आहे. मग हे ज्ञानच आपल्याला कोडे सोडवून देईल.

**प्रश्नकर्ता :** याचा अर्थ असाच झाला ना की आपण आतल्या आत मनाचे समाधान करून घ्यायचे की आपण पूर्वी पाठवलेलाच माल पुन्हा परत आला आहे असेच ना?

**दादाश्री :** तो स्वत: शुद्धात्मा आहे आणि ती त्याची प्रकृती आहे. प्रकृती फळ देत आहे. आपण शुद्धात्मा आहोत, तो पण शुद्धात्मा आहे. आता या दोघांची वायर कुठे जोडली जाते? तुमची प्रकृती, आणि त्याची प्रकृती, दोन्ही समोरासमोर सर्व हिशोब चुकवतात. यात तुमच्या प्रकृतीच्या कर्माचा उदय आहे म्हणून तो तुम्हाला काही तरी देत आहे. म्हणून तुम्ही असे म्हणा की हा आपल्याच कर्माचा उदय आहे आणि यात समोरचा तर निमित्त आहे, तो परत करून गेला म्हणून आपला हिशोब मिटला. जिथे हे सोल्युशन असेल तिथे मग सहन करण्याचे राहतच नाही ना?

सहन केल्याने काय होईल? असे स्पष्टीकरण केले नाही तर एके दिवस ती स्प्रिंग जोरात उसळेल. स्प्रिंग उसळताना पाहिली आहे का? माझी स्प्रिंग खूप उसळत होती. मी खूप दिवस सहन करायचो आणि ज्या दिवशी ती स्प्रिंग उसळत असे त्या दिवशी सगळे तोडफोड करून टाकायचो. हे सर्व अज्ञानदशेत होत असे, याची मला जाणीव आहे. ते माझ्या लक्षात आहे. म्हणूनच मी सांगतो ना की सहन करण्याचे शिकू नका. सहन करायचे तर अज्ञान दशेत असते. आपल्या इथे तर विश्लेषण करून द्यायचे की याचा परिणाम काय, याचे कारण काय हे आपल्या हिशोब खात्यात पद्धतशीरपणे पाहून घ्यायचे. कोणतीही वस्तू आपल्या खात्याच्या बाहेरची नसते.

## हिशोब चुकता झाला की नवीन कॉजेस पडलीत?

**प्रश्नकर्ता :** नवीन देणेघेणे होऊ नये हे कसे शक्य आहे?

**दादाश्री :** नवीन देणेघेणे कशास म्हणतात? तर कॉजेस-कारणे,

यांना नवीन देणेघेणे म्हणतात. घडत आहे तो सर्व परिणाम आहे आणि कारणे अदृश्य आहेत (ती दिसत नाहीत) इंद्रियांद्वारे कॉजेस दिसत नाहीत, पण दिसतात ते सर्व परिणामच आहेत. म्हणून तुम्ही हे समजले पाहिजे की हिशोब पूर्ण झाला. नवीन जे होत असते ते आत होत असते, ते आत्ता दिसणार नाही, ते तर जेव्हा परिणाम येईल तेव्हा दिसेल. आत्ता कच्च्या हिशोबात लिहिले जात आहे नंतर ते पक्क्या हिशोबात नोंदविले जाईल.

**प्रश्नकर्ता :** मागील पक्क्या हिशोबात नोंद झालेले ते आता उदयास येते का?

**दादाश्री :** हो.

**प्रश्नकर्ता :** हा जो संघर्ष होतो तो 'व्यवस्थित शक्ती'च्या आधारामुळेच होतो ना?

**दादाश्री :** हो. हा संघर्ष होतो तो 'व्यवस्थित शक्तीच्या' आधारामुळेच होत असतो, पण असे केव्हा म्हणायचे? तर संघर्ष झाल्यानंतर. आपल्याला संघर्षात पडायचे नाही असा आपला निश्चय असतो. समोर खांब दिसला तेव्हा आपण समजतो की रस्त्यात खांब येणार आहे, वळून जावे लागेल. धडक टाळायची आहे. आणि तरी देखील धडकलो, तेव्हा आपण म्हणू शकतो की 'व्यवस्थित' आहे. आधीच आपण 'व्यवस्थित' आहे असे मानून चाललो तर तो 'व्यवस्थित शक्तीचा' दुरुपयोग म्हटला जाईल.

## 'न्याय स्वरूप', तिथे उपाय तप

**प्रश्नकर्ता :** संघर्ष टाळायचा, समताभावाने निकाल करायचा, अशी आपली वृत्ती (इच्छा) असेल, तरीसुद्धा समोरचा मनुष्य आपल्याला हैराण करत असेल, अपमान करत असेल मग अशावेळी आपण काय करावे?

**दादाश्री :** काहीच नाही. हा आपला हिशोब आहे म्हणून त्याचा

समभावाने निकाल करायचा आहे असा तुम्ही निश्चय करा. तुम्हाला तुमच्या नियमातच राहायचे आणि तुमच्या परीने प्रश्न सोडवत राहायचे.

**प्रश्नकर्ता :** समोरच्या व्यक्तीने माझा अपमान केला आणि मला अपमान वाटला, याचे कारण माझा अहंकार आहे ?

**दादाश्री :** खरे तर, समोरचा अपमान करतो तेव्हा तो तुमचा अहंकार विरघळवत असतो. आणि तोसुद्धा ड्रॅमॅटिक अहंकार. जितका एक्सेस अहंकार असतो तोच विरघळतो, त्यात काय बिघडेल ? ही कर्मे आपल्याला सुटू देत नाहीत. आपण तर लहान मूल समोर असले तरी म्हटले पाहिजे 'ये बाबा, आता सुटका कर.'

तुमच्यावर कोणी अन्याय केला आणि तुम्हाला असे वाटले की माझ्यावर हा अन्याय का केला तर तुमचे कर्म बांधले जाईल. कारण तुमच्या चुकीमुळे समोरच्याला तुमच्यावर अन्याय करावा लागत आहे. आता बुद्धीला हे कसे काय समजणार ? त्यामुळे सगळे लोक भांडतच बसतात. भगवंताच्या भाषेत कोणी न्याय पण करत नाही आणि अन्याय पण करत नाही, योग्य तेच करतात. आता या लोकांची बुद्धी इथपर्यंत कशी पोहोचेल ? घरातील मतभेद कमी होतील, भानगडी कमी होतील, आजूबाजूच्या लोकांना आपल्याविषयी प्रेम वाटेल तर आपण समजू की ज्ञान समजले म्हणून. नाही तर ज्ञान समजलेले नाही.

ज्ञान सांगते की, तू न्याय शोधत राहिलास तर तू मूर्ख आहेस ! म्हणून त्याच्यावर उपाय आहे तप !

कोणी तुमच्यावर अन्याय केला असेल तर भगवंताच्या भाषेत ते करेक्ट आहे आणि संसारी भाषेत त्यास चुकीचे केले असे म्हणतील.

हे जग पूर्णपणे न्यायस्वरूप आहे. ही काही नुसती थाप नाही. एक मच्छर देखील तुम्हाला विनाकारण स्पर्श करू शकेल असे होत नाही. मच्छर चावला म्हणजे यामागे काही कारण आहे. नाही तर एक स्पंदनसुद्धा तुम्हाला विनाकारण स्पर्श करू शकत नाही. तुम्ही पूर्ण स्वतंत्र आहात. तुमच्या आड कोणीही येऊ शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** संघर्षात मौन ठेवणे हितकारी आहे की नाही?

**दादाश्री :** मौन तर खरोखर खूप हितकारी आहे.

**प्रश्नकर्ता :** पण दादाजी बाहेर मौन असेल पण आत तर आकांडतांडव चालत असेल त्याचे काय?

**दादाश्री :** असे मौन काहीच कामाचे नाही. मौन तर सर्वात प्रथम मनाचे असले पाहिजे.

## सर्वात उत्तम ॲडजस्ट एव्हरीवेर

**प्रश्नकर्ता :** जीवनात स्वभाव जुळत नाहीत म्हणूनच संघर्ष होतात ना?

**दादाश्री :** संघर्ष होणे, याचेच नाव संसार आहे!

**प्रश्नकर्ता :** संघर्ष होण्याचे कारण काय?

**दादाश्री :** अज्ञानता.

**प्रश्नकर्ता :** फक्त शेठजींबरोबरच संघर्ष होतो असे नाही, तर सगळ्यांशीच होत असतो, त्याचे काय?

**दादाश्री :** हो, सगळ्यांशीच होतो. अरे, या भिंतीबरोबरही होतो.

**प्रश्नकर्ता :** त्यावर उपाय काय?

**दादाश्री :** आम्ही समजावतो त्यानंतर या भिंतीबरोबरसुद्धा संघर्ष होणार नाही. या भिंतीवर तुम्ही आपटता त्यात कोणाचा दोष? ज्याला लागले त्याचा दोष. त्यात भिंतीचे काय देणेघेणे? चिकट मातीत तुमचा पाय सरकला तर चूक तुमचीच. चिकट माती तर फक्त निमित्त आहे. तुम्ही निमित्त समजून मातीत पायाची बोटे रुतवून घ्यावी. चिकट माती तर असतेच आणि घसरवणे हा तर तिचा स्वभावच आहे.

**प्रश्नकर्ता :** पण भांडण होण्याचे कारण काय? एकमेकांचे स्वभाव जुळत नाही म्हणून?

**दादाश्री :** अज्ञानता आहे म्हणून. संसार त्यासच म्हटले जाते ज्यात कोणाशीच कोणाचा स्वभाव जुळत नाही. हे ज्ञानच त्यावर एकमात्र उपाय आहे, 'ॲडजस्ट एव्हरीवेर' कोणी तुला मारले तरीही तुला त्याच्याशीही ॲडजस्ट होऊन जायचे.

**प्रश्नकर्ता :** बायकोशी बऱ्याचदा भांडणे होतात. अगदी वीट येतो.

**दादाश्री :** नुसता वीट येतो असे नाही, कित्येक तर समुद्रात जाऊन जीव देतात, दारू पिऊन येतात.

सर्वात मोठे दु:ख कशाचे आहे? तर 'डीसॲडजस्टमेंट' चे. तिथे 'ॲडजस्ट एव्हरीवेर' केले तर काय वाईट आहे.

**प्रश्नकर्ता :** यासाठी तर पुरुषार्थ हवा.

**दादाश्री :** पुरुषार्थाची गरज नाही. फक्त माझी आज्ञाच पाळायची की, 'दादांनी' ॲडजस्ट एव्हरीवेर असे सांगितले आहे. मग ॲडजस्ट होता येईल. बायको म्हणाली की 'तुम्ही चोर आहात.' तर म्हणायचे की, 'यू आर करेक्ट' आणि थोड्यावेळाने म्हणाली की, 'नाही, तुम्ही चोरी केली नाही.' तेव्हा सुद्धा म्हणा की 'यू आर करेक्ट.'

ब्रह्मदेवाचा एक दिवस म्हणजे आपले संपूर्ण आयुष्य! ब्रह्मदेवाच्या एका दिवसाइतकेच जगायचे आहे, मग कशाला एवढा वैताग? ब्रह्मदेवाच्या शंभर वर्षाएवढे जगायचे असेल तर आपण समजू शकतो की ठीक आहे, मग आपण कशाला ॲडजस्ट व्हायचे? खटला चालव असे सांगू. पण ज्याला संसार चक्रातून लवकर सुटायचे असेल, त्याला काय करावे लागेल? ॲडजस्ट व्हायचे की मग खटला चालव असे सांगायचे? आपल्याला तर एकच दिवस काढायचा आहे, आणि लवकर आवरते घ्यायचे आहे. जे काम लवकर संपवायचे असेल त्यासाठी काय करावे लागेल? 'ॲडजस्ट' होऊन थोडक्यात मिटवायचे, नाहीतर ते लांबतच जाईल. हो की नाही?

बायकोशी भांडलात तर रात्री झोप लागेल का? आणि सकाळी नाश्ता पण चांगला मिळणार नाही.

आम्ही या संसाराचे खूप सूक्ष्म संशोधन केले आहे. अगदी अंतिम प्रकारचे संशोधन करून या सर्व गोष्टी सांगत आहोत! व्यवहारात कसे वागावे हे पण सांगतो आणि मोक्षाला जाण्यासाठी काय करावे तेही सांगतो. तुमच्या अडचणी कमी कशा होतील हे समजावणे हाच आमचा उद्देश आहे.

## घरातले वर्चस्व सोडावेच लागेल ना?

घरात आपण आपले वर्चस्व ठेवू नये. जो मनुष्य वर्चस्व ठेवतो त्याला भटकावे लागते. आम्ही पण हीराबां (दादाश्रींच्या पत्नी)ना सांगितलेले होते की आम्ही खोटे नाणे आहोत. आम्हाला भटकायचे परवडणार नाही ना! न चालणाऱ्या नाण्याने काय करावे? त्याने देवाजवळ बसून राहावे घरात तुमचे वर्चस्व गाजवायला जाल तर संघर्ष होईल ना? आपण तर आता समभावाने निकाल करायचा. घरात बायकोसोबत फ्रेंड (मित्रा) सारखे राहावे. ती तुमची फ्रेंड आणि तुम्ही तिचे फ्रेंड! इथे कसल्या नोंदी ठेवायच्या नाहीत की सत्ता तुझी होती की त्याची होती! म्युनिसिपालिटीत पण नोंद होत नाही आणि देवाकडेही नोंद होत नाही. तुम्हाला नाश्त्याशी काम आहे की सत्तेशी काम आहे? म्हणून चांगला नाश्ता कशाप्रकारे मिळेल तेवढेच बघा. म्युनिसिपालिटीवाले जर नोंद करत असतील की घरात कोणाची सत्ता आहे तर मी पण ॲडजस्ट झालो नसतो, पण वास्तवात अशी नोंद कोणीच करत नाही!

तुमचे पाय दुखत असतील आणि बायको तुमचे पाय चेपत असेल आणि त्यावेळी कोणी आले आणि हे पाहून म्हणाले की, ओहोहो! तुमची तर घरात चांगलीच सत्ता आहे. तेव्हा तुम्ही म्हटले पाहिजे की, 'छे, छे, सत्ता तर तिचीच आहे.' आणि तुम्ही जर असे म्हटले की हो, माझीच सत्ता आहे, तर ती पाय चेपायचे सोडून देईल. त्यापेक्षा तुम्ही म्हणा की, नाही, घरात तिचीच सत्ता आहे.

**प्रश्नकर्ता :** यास मस्का लावले असे नाही का म्हणता येणार?

**दादाश्री :** नाही, याला स्ट्रेट वे (सरळ रस्ता) म्हटले जाते,

आणि दुसरे सगळे आडवळणाचे रस्ते म्हटले जातात. या दूषमकाळात सुखी होण्यासाठी मी जो रस्ता सांगतो तो वेगळा रस्ता आहे. मी या काळासाठी सांगत आहे. आपण आपला नाश्ता का बरे बिघडवायचा? सकाळचा नाश्ता बिघडेल, दुपारचे जेवण बिघडेल, पूर्ण दिवस बिघडेल!!

## रिॲक्शनरी प्रयत्नच करूच नये

**प्रश्नकर्ता :** सकाळी झालेले भांडण दुपारी विसरूनही जातो आणि संध्याकाळी पुन्हा नवीन भांडण होते.

**दादाश्री :** भांडण कुठल्या शक्तीमुळे होते ते आम्ही जाणतो. ती वेडेवाकडे बोलते त्यात कोणती शक्ती काम करत आहे तेही आमच्या लक्षात येते. बोलून पुन्हा ॲडजस्ट होतो, हे सर्व ज्ञानाने समजेल असे आहे, तरी देखील जगात वावरताना ॲडजस्ट व्हायचे. कारण प्रत्येक गोष्ट 'अंत येणारी' असते. आणि कदाचित ती दीर्घ काळापर्यंत टिकली तर तुम्ही त्यात मदत करत नाही, उलट जास्त नुकसान करता. तुमचे स्वत:चेही नुकसान करता आणि समोरच्याचेही नुकसान होते! त्याला कोण सुधारू शकेल? जो स्वत: सुधारलेला असतो तोच सुधारू शकेल? स्वत:च धड नाही तो दुसऱ्याला काय सुधारणार?

**प्रश्नकर्ता :** आपण सुधारलो असू तर दुसऱ्याला सुधारू शकतो ना?

**दादाश्री :** हो सुधारू शकतो.

**प्रश्नकर्ता :** सुधारलेल्याची व्याख्या काय?

**दादाश्री :** तुम्ही समोरच्या व्यक्तीला रागावले तरीही तुमच्या रागावण्यात समोरच्याला प्रेम वाटेल. तुम्ही त्याला खडसावले तरीही तुमच्याविषयी त्याला प्रेमच वाटेल की, ओहोहो! माझ्या वडिलांचे माझ्यावर किती प्रेम आहे! रागवा, पण प्रेमाने रागावले तर तो सुधारेल. या कॉलेजमध्ये प्रोफेसर विद्यार्थ्यांना रागवू लागले तर विद्यार्थी प्रोफेसरांना देखील मारतील!

समोरचा सुधरावा यासाठी आपण प्रयत्न केले पाहिजेत, पण जे प्रयत्न 'रिॲक्शनरी' असतील असे प्रयत्न करू नयेत. आपल्या रागावल्यामुळे त्याला दु:ख होत असेल तर त्याला प्रयत्न म्हणत नाहीत. आतून प्रयत्न केले पाहिजेत, सूक्ष्म रीतीने! स्थूल रीतीने प्रयत्न करणे आपल्याला जमत नसेल तर सूक्ष्म रीतीने प्रयत्न करावा. जास्त रागावल्याने बिघडत असेल तर थोडक्यात सांगावे की, 'आपल्याला हे शोभत नाही.' बस, एवढेच सांगून गप्प बसावे. सांगावे तर लागते पण सांगण्याचीही एक पद्धत असते.

## नाही तर प्रार्थनेची 'ॲडजस्टमेंट'

**प्रश्नकर्ता :** समोरच्याला समजावण्यासाठी मी पुरुषार्थ केला मग त्याला समजेल किंवा न समजेल तो त्याचा पुरुषार्थ म्हणायचा का?

**दादाश्री :** त्याला समजावण्याचा प्रयत्न करणे एवढीच तुमची जबाबदारी. मग त्याला समजले नाही तर तुम्ही काय करणार? त्याला उपाय नाही. तुम्ही फक्त एवढेच म्हणा की, 'हे दादा भगवान! याला सद्बुद्धी द्या.' एवढे तुम्हाला म्हणावे लागेल. त्याला तुम्ही अधांतरी सोडू शकत नाही, ही काही थाप नाही. हे दादांचे ॲडजस्टमेंटचे विज्ञान आहे, आश्चर्यकारक ॲडजस्टमेंट आहे ही. आणि जिथे तुम्ही ॲडजस्ट होत नाही तिथे तुम्हाला ते समजून येईलच ना? डीसॲडजस्टमेंट म्हणजेच मूर्खपणा. कारण त्याला वाटते की माझा नवरेपणा मी सोडणार नाही, आणि माझेच वर्चस्व राहिले पाहिजे! मग आयुष्यभर उपाशी मरशील आणि एक दिवशी ताटात विष पडण्याची वेळ येईल! सहज चालत आहे, त्यास चालू दे ना! हे तर कलियुग आहे! वातावरणच कसे झाले आहे!! म्हणून बायको जर म्हणाली की, 'तुम्ही नालायक आहात.' तर म्हणावे 'खूप छान.'

**प्रश्नकर्ता :** माझी बायको मला नालायक म्हणाली की डोक्याचा पारा चढतो.

**दादाश्री :** मग तुम्ही कोणता उपाय कराल? तू डबल नालायक

आहेस असे म्हणणार का? असे केल्याने तुमची नालायकी पुसली जाईल का? तुमच्यावर एक शिक्का मारला म्हणून काय तुम्ही दोन शिक्के मारायचे? मग नाश्ता बिघडेल आणि पूर्ण दिवसही बिघडेल.

**प्रश्नकर्ता :** ॲडजस्टमेंटची जी गोष्ट आहे, त्यामागील भाव काय आहे? मग कुठे पोहोचायचे आहे?

**दादाश्री :** भाव शांतीचा आहे, शांती मिळवणे हा हेतू आहे. अशांती वाटू नये यासाठी एक युक्ती आहे.

## ज्ञानीकडून 'ॲडजस्टमेंट' शिका

एक भाऊ होते. ते रात्री दोन वाजता बाहेरून काय-काय कारनामे करून येत असतील त्याचे वर्णन करण्यासारखे नाही. तुम्हीच समजून घ्या. मग घरातल्या सगळ्यांनी निश्चय केला की एक तर याला घरातच घेऊ नये किंवा चांगली खरडपट्टी काढावी. काय करावे यातले? सगळ्यांनी त्याचा अनुभव घेतला. मोठा भाऊ सांगायला गेला तेव्हा तो मोठ्या भावाला म्हणाला, 'तुम्हाला मारल्याशिवाय सोडणार नाही.' नंतर घरातील सगळेजण मला विचारायला आले की, 'आम्ही काय करावे? हा तर असे बोलतो.' तेव्हा मी त्यांना सांगितले की, कुणी त्याला एक अक्षरही बोलू नका. तुम्ही बोलाल तर तो जास्त उर्मट होईल, आणि घरात घेतले नाही तर तो बंडखोर होईल, बाहेर तमाशा करेल. त्याला वाटेल तेव्हा येऊ दे आणि जायचे तेव्हा जाऊ दे. तुम्ही त्याला बरोबर पण म्हणायचे नाही आणि चुकीचे पण म्हणायचे नाही. त्याच्यावर राग पण ठेवायचा नाही आणि द्वेषपण करायचा नाही. समता ठेवायची, करुणा ठेवायची. असे केल्यावर तीन-चार वर्षांनी तो भाऊ सुधारला! आज तर तो धंद्यात खूप मदत करतो. जगात कोणी निरुपयोगी नाही, पण काम करवून घेता आले पाहिजे. सगळेच परमात्मा आहेत. आणि प्रत्येकजण वेगवेगळे काम सांभाळत आहे, म्हणून कुणाबद्दल नापसंत भाव ठेऊ नका.

## आश्रित असलेल्याला छळणे, घोर अन्याय

**प्रश्नकर्ता :** माझ्या बायकोशी माझे अजिबात जमत नाही. कितीही

निर्दोष गोष्ट केली, माझे खरे असले तरीही ती उलटच अर्थ काढते. बाहेरचा जीवनसंघर्ष तर चालू आहे, पण या व्यक्तीसंघर्षांचे काय करणार ?

**दादाश्री :** असे आहे, की मनुष्य आपल्या हाताखालील माणसांना इतका छळतो, की काही बाकीच ठेवत नाही. एकदा का स्वत:च्या हाताखाली कोणी माणूस सापडला, मग ती स्त्री असो की पुरुष असो, स्वत:च्या सत्तेत आलेल्या माणसावर अधिकार गाजवून त्याला छळण्यात काहीच बाकी ठेवत नाही.

घराच्या माणसांशी कधीही भांडू नये. तिथेच जर राहायचे आहे मग भांडण–तंटे कशासाठी ? दुसऱ्यांना त्रास देऊन स्वत: कधीही सुखी होऊ शकत नाही, आणि आपल्याला तर दुसऱ्यांना सुख देऊन सुखी व्हायचे आहे. आपण घरात सुख दिले तरच आपल्याला सुख मिळेल आणि चहापाणी पण चांगले बनवून देतील नाहीतर चहा–पाणी सुद्धा नीट देणार नाहीत. कमजोर नवरा बायकोवर शूरवीर. ज्यांचे रक्षण करायला पाहिजे त्यांचे भक्षण कसे करू शकतो ? जो आपला आश्रित आहे त्याचे रक्षण करायला हवे, हेच सर्वोच्च ध्येय असले पाहिजे. त्याच्याकडून गुन्हा झाला असेल तरीदेखील त्याचे रक्षण करायला पाहिजे. हे पाकिस्तानचे सैनिक आता आपल्या इथे (भारतात) कैदेत आहेत तरीही त्यांचे रक्षण केले जाते ना ! मग हे तर आपल्या घरातलेच आहेत ना ! बाहेरच्यांसमोर मांजरीसारखे होतात, तिथे भांडत नाहीत आणि घराच्यांवरच शूरता दाखवतात ! स्वत:च्या हाताखालच्या माणसांना तुडवत राहतात आणि वरिष्ठांना साहेब, साहेब करतात. पोलीसवाल्याने धमकावले तर त्याला 'साहेब, साहेब' म्हणेल आणि घरी बायको खरे बोलत असेल तरी ते तुम्हाला सहन होत नाही, तुम्ही तिला ओरडता. 'माझ्या चहाच्या कपात मुंगी कुठून आली ?' असे ओरडून घरच्यांना दरडावतो आणि पोलीसवाल्या समोर थरथरतो ! याला तर घोर अन्याय म्हटला जाईल. आपल्याला हे शोभत नाही. बायको तर स्वत:ची भागीदार म्हटली जाते. तिच्याशीही भांडण ? घरात असे क्लेश होत असतील तर काही मार्ग काढावा लागतो, समजवावे लागते. घरातच राहायचे मग क्लेश कशाला ?

## 'सायन्स' समजून घेण्यासारखे

**प्रश्नकर्ता :** आपली क्लेश करायची इच्छा नसेल पण समोरून कोणी भांडायला येत असेल तर काय करावे? त्यात एक जागृत असेल आणि दुसरा क्लेश करत असेल अशा परिस्थितीत भांडण तर होणारच ना?

**दादाश्री :** या भिंतीबरोबर भांडायचे ठरवले तर किती वेळ भांडू शकाल? या भिंतीवर कधी डोके आपटले गेले तर आपण त्या भिंतीचे काय करणार? डोके आपटले गेले म्हणजे आपले भिंतीशी भांडण झाले, मग काय भिंतीला मारायचे का? त्याचप्रमाणे जे सतत भांडायला पुढे असतात ते सगळे भिंतीसमानच आहेत! तेव्हा त्यांच्यात दोष पाहून काय फायदा? आपण स्वत:हूनच समजून घेतले पाहिजे की हे सगळे भिंतीसारखेच आहेत, एकदा हे सगळे समजले की मग कसलीच अडचण नाही.

**प्रश्नकर्ता :** आपण मौन (गप्प) राहिलो तर समोरच्यावर त्याचा उलटाच परिणाम होतो, त्याला असे वाटते की याचाच दोष आहे म्हणून तो जास्त भांडण करतो.

**दादाश्री :** तुमची अशी गैरसमजूत आहे की, मी मौन राहिलो म्हणून हे असे झाले. रात्री बाथरुमला जायला तुम्ही उठलात आणि अंधारात भिंतीवर डोके आपटले तर ते तुम्ही गप्प राहिल्यामुळे झाले का?

मौन राहा किंवा बोला त्याच्यावर काहीच परिणाम होत नाही. याचा काहीच संबंध नाही. आपण मौन राहिल्याने समोरच्यावर काही परिणाम होतो असेही नाही किंवा आपल्या बोलल्याने समोरच्यावर काही परिणाम होतो असेही नाही. 'ओन्ली सायंटिफक सरकमस्टेन्शियल एविडन्स' मात्र वैज्ञानिक संयोगिक पुरावा आहे. कोणाची कसलीही सत्ता नाही. अजिबात सत्ता नाही, असे हे जग आहे. यात कोणी काय करणार आहे? या भिंतीला जर सत्ता असती तर यालाही सत्ता राहिली असती! आपल्याला या भिंतीशी भांडायची सत्ता आहे का? मग समोरच्यावर ओरडण्यात काय अर्थ? त्याच्या हातात सत्ताच नाही ना! म्हणून तुम्ही

भिंतीसारखे व्हा ना! तुम्ही बायकोवर सतत चिडचिड करता तेव्हा तिच्या आत असलेले भगवंत नोंद करतात की हा मला नेहमी त्रास देतो! जेव्हा ती तुम्हाला त्रास देईल तेव्हा तुम्ही भिंतीसारखे व्हा. म्हणजे तुमच्या आत बसलेले भगवंत तुम्हाला मदत करतील.

## जो भोगतो त्याचीच चूक

**प्रश्नकर्ता :** कित्येकजण असे असतात की, आपण त्यांच्याशी कितीही चांगले वागलो तरीही ते आपल्याला समजून घेत नाहीत.

**दादाश्री :** ते समजून घेत नसतील तर त्यात आपलीच चूक आहे की आपल्याला समजून घेणारा का नाही भेटला! याच्याशीच आपली गाठ का पडली? जेव्हा-जेव्हा आपल्याला काही दु:ख भोगावे लागते ते सर्व आपल्याच चुकांचा परिणाम आहे.

**प्रश्नकर्ता :** म्हणजे आमची कर्मेच अशी आहेत असे समजावे का?

**दादाश्री :** हो नक्कीच. आपल्या चुकीशिवाय आपल्याला भोगावे लागणारच नाही. या जगात कोणीही असा नाही की जो आपल्याला, किंचितमात्र देखील दु:ख देऊ शकेल आणि दु:ख देणारा असेल तर ती आपलीच चूक आहे. त्यात त्याचा दोष नाही, तो तर केवळ निमित्त आहे. म्हणून जो भोगतो त्याची चूक.

नवरा-बायको दोघेजण आपापसात खूप भांडत असतील, नंतर थोड्या वेळाने दोघेही झोपायला गेल्यानंतर चुपचाप बघायला गेलो तर बायको गाढ झोपलेली असते आणि नवरा मात्र या कुशीवरून त्या कुशीवर तळमळत पडलेला असतो, म्हणून आपण समजावे की सगळी चूक नवऱ्याचीच आहे, बायकोला तर काही त्रास झालेला दिसत नाही. ज्याची चूक असेल तोच भोगतो. आणि त्यावेळी जर असे आढळले की भाऊ निवांतपणे झोपलेले आहेत आणि बायको मात्र जागीच आहे, तर समजावे की चूक बायकोचीच आहे. 'भोगतो त्याची चूक.'

हे विज्ञान तर खूप मोठे 'सायन्स' आहे. मी जे सांगतो ते फार सूक्ष्म सायन्स आहे. संपूर्ण जग निमित्ताचाच चावा घेतो.

## नवरा-बायको

हे जग खूप मोठे, विशाल आहे; परंतु हे जग स्वतःच्या खोलीत आहे एवढेच मानून घेतले आहे. आणि तिथेही जर जग मानत असेल तरीही ठीक. पण तिथेही बायकोशी भांडत राहतो! अरे, हे काय तुझे पाकिस्तान आहे?

हेच नवरा-बायको शेजाऱ्यांशी भांडतांना मात्र असतील तेव्हा दोघेही एकजूट होतात. शेजाऱ्याला म्हणतील की, 'तुम्ही असे आहात आणि तुम्ही तसे आहात.' आपल्याला वाटते की नवरा-बायकोच्या जोडीत किती अभेदता आहे, यांना तर नमस्कार करावा अशी जोडी आहे. नंतर घरात बघितले तर बायकोकडून चहात साखर थोडी कमी पडली असेल तर नवरा म्हणेल की, 'तुला किती वेळा सांगायचे साखर जरा जास्त टाकत जा पण तुझे डोके जाग्यावर असेल तर शपथ?' अरे, पण तुझे डोके तरी कुठे जाग्यावर आहे? कसला रे असा माणूस तू? जिच्यासोबत आयुष्य काढायचे तिच्याशीच भांडायचे?

तुमचा कुणाशी मतभेद होतो का?

**प्रश्नकर्ता :** हो, होतो, बरेचदा होतो.

**दादाश्री :** बायकोबरोबर मतभेद होतो का?

**प्रश्नकर्ता :** हो बरेचदा होतो.

**दादाश्री :** बायकोबरोबर देखील मतभेद होतो? तिथेही एकता नसेल मग कुठे असणार? एकता म्हणजे काय, की कधीही मतभेद होत नाहीत. या एका व्यक्तीच्या बाबतीत निश्चय केला पाहिजे की तुमच्यात आणि माझ्यात मतभेद होता कामा नये. अशी एकता असायलाच हवी. अशी एकता केली आहे का तुम्ही?

**प्रश्नकर्ता :** असा तर कधी विचारच केला नाही. प्रथमच असा विचार करत आहे.

**दादाश्री :** हो, असा विचार केला पाहिजे ना? भगवंत किती विचार करून-करून मोक्षाला गेले! मतभेद आवडतात का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** जेव्हा मतभेद होतात तेव्हा भांडणे होतात, चिंता होते. मतभेदामुळे असे होत असेल तर मनभेदामुळे काय होत असेल. मनभेद होतात तेव्हा घटस्फोट घेतात आणि तनभेद झाले की अंत्ययात्रा निघते!

## भांडण करा, पण बागेत

तुम्हाला भांडण करायचे असेल तर बाहेर जाऊन भांडण करा. भांडायचे असेल त्या दिवशी बागेत जा आणि तिथे खूप भांडून घरी या. पण घरात, 'आपल्या खोलीत भांडायचे नाही.' असा नियम बनवा. एखाद्या दिवशी आपला भांडण करण्याचा मूड झालाच तर बायकोला सांगावे की, चला आज आपण बागेत जाऊ, तिथे खूप खाऊ-पिऊ आणि मग तिथेच खूप भांडूया. लोक आपले भांडण थांबवण्यासाठी येतील असे भांडण करावे. पण घरात भांडू नका. जिथे भांडण-तंटे असतात तिथे भगवंत राहत नाहीत. तिथून निघून जातात. भगवंतानी काय म्हटले आहे? भक्तांकडे क्लेश नसावे. भगवंतांनी परोक्ष भक्ती करणाऱ्यांना भक्त म्हटले आणि प्रत्यक्ष भक्ती करणाऱ्यांना 'ज्ञानी' म्हटले, तिथे क्लेश होऊच कसा शकतो? तिथे तर समाधी अवस्थाच असते!

म्हणून कधी भांडावेसे वाटले तर पतीदेवाला म्हणा की, 'चला, आपण बागेत जाऊ या.' मुले कोणावर तरी सोपवून द्यावीत. पतीदेवाला आधीच सांगून ठेवा की, मी तुम्हाला भरलोकांमध्ये दोन थोबाडीत मारीन तेव्हा तुम्ही हसा. लोकांना आपली गंमत पाहू द्या! लोक तर अब्रू नोंदणारे, ते समजतील की कधी यांची अब्रू गेली नव्हती ती आज गेली. कोणाचीही अब्रू असते का? हे तर बिचारे झाकून-झाकून अब्रू ठेवतात!

## हा असा कसा मोह?

अब्रू तर त्यास म्हटली जाईल की नागडा फिरला तरीही सुंदर

दिसेल! हे तर कपडे घालतात तरी सुंदर दिसत नाहीत. जॅकेट, कोट घालतो, टाय बांधतो तरी बैलासारखा दिसतो! स्वतःला काय समजतात कोण जाणे?! दुसऱ्या कोणाला विचारतही नाही. बायकोलाही विचारत नाही की, मी नेकटाय घातल्यावर कसा दिसतो म्हणून! आरशात पाहून स्वतःच ठरवतो की, 'मी खूप छान दिसतो, खूप छान दिसतो' आरशात पाहून केसांच्या पट्टया पाडत जातो! स्त्रिया पण आरशात बघून कुंकू लावतात आणि नखरे करत असतात! ही कसली पद्धत?! हे कसले जीवन?! स्वतः परमात्मा असून हा कसला मूर्खपणा! स्वतः परमात्मा स्वरूप आहे.

कानात हिऱ्यांच्या कुड्या घालतात पण त्या स्वतःला दिसतात का? हे तर लोकांनी हिरे बघावेत म्हणून घालतात. संसाराच्या जाळ्यात अडकलेले आहेत तरीही हिरे दाखवीत फिरतात!, अरे, जाळ्यात फसलेल्या माणसाला कसली आली आहे हौस? झपाट्याने निकाल करा ना! नवरा सांगत असेल तर नवऱ्याला चांगले वाटण्यासाठी घाला. नवऱ्याने दोन हजारांचे कानातले आणले असेल पण पस्तीस हजाराचे बिल दाखवले तर बायको खुश! कानात घातलेल्या कुड्या स्वतःला तर दिसत नाहीत. मी शेठाणीला विचारले की कानात घातलेल्या कुड्या रात्री झोपल्यावर झोपेतसुद्धा दिसतात का? म्हणजे हे फक्त मानलेले सुख आहे, चुकीच्या मान्यता आहेत, म्हणून अंतर शांती मिळत नाही. भारतीय नारी कोणाला म्हणतात? घरात दोन हजारांची साडी असेल तर ती नेसते. पण इथे तर नवरा-बायको बाजारात फिरायला गेले की दुकानातील हजाराची साडी बायकोच्या मनात ठसते. मग त्या साडीसाठी घरी आल्यावर तोंड फुगवून फिरते आणि नवऱ्याशी भांडत बसते. तिला भारतीय नारी कसे म्हणू शकतो?

## ...अशा पद्धतीनेही क्लेश टाळला

हिंदू लोक तर मूळचेच क्लेशी स्वभावाचे म्हणूनच म्हणतात हिंदू लोकांचे संपूर्ण आयुष्य भांडणातच संपून जाते; पण मुसलमान असे पक्के की ते बाहेर भांडून येतील पण घरात बायकोशी भांडत नाहीत. आता

कित्येक मुस्लिम देखील हिंदुच्या सहवासात राहून बिघडले आहेत. पण या बाबतीत मला हिंदुंपेक्षा मुस्लिम जास्त समजदार वाटले. अरे कित्येक मुसलमान तर बायकोला झोपाळ्यावर झोके देखील देतात. आमचा कॉन्ट्रॅक्टचा धंदा, म्हणून आमचे मुसलमानांच्या घरी जाणेही होत असे, आम्ही त्यांच्या घरचा चहासुद्धा प्यायचो! आम्ही कुणाशीही भेदभाव करीत नाही. एक दिवस मी एका मुसलमानाच्या घरी गेलो होतो, तेव्हा मियाँसाहेब बायकोला झोके देऊ लागले! म्हणून मी त्यांना विचारले, 'तुम्ही तिचे असे लाड केलेत तर ती तुमच्या डोक्यावर नाही का बसणार? त्यावर ते म्हणाले ती कशी डोक्यावर बसेल? तिच्याजवळ काही हत्यार नाही. मी म्हटले, आमच्या हिंदु लोकांना तर भीती वाटते की असे केल्याने जर बायको डोक्यावर बसली तर काय करायचे? म्हणून आमचे लोक बायकोला झोके वगैरे देत नाहीत. तेव्हा मियाँभाई म्हणाले, 'मी झोके का देतो माहीत आहे का? माझ्याकडे दोनच खोल्या आहेत, माझा काही बंगला नाही, फक्त या दोनच खोल्या, त्यात जर बायकोशी भांडलो तर मी कुठे झोपणार?' माझी सारी रात्र बिघडेल. म्हणून मी बाहेर सगळ्यांशी भांडून येतो पण बायकोशी मात्र भांडत नाही. बीबी मियांना विचारते, 'सकाळी तुम्हाला मटण आणायचे सांगितले होते ना, मग का आणले नाही?' तेव्हा मियाँभाई रोख उत्तर देतो, 'उद्या आणीन.' मग दुसऱ्या दिवशी सांगतो आज तर नक्कीच आणीन. तरीही संध्याकाळी रिकाम्या हातीच येतो, तेव्हा मग बायको खूप चिडते, पण मियाँसाहेब तर फार हुशार, तो म्हणतो 'यार मेरी हालत तो मैंही जानता हूं!' असे काहीतरी बोलून तो बायकोला खुश करतो, पण भांडत नाही! आणि आपले लोक काय म्हणतील? 'तू कोण मला हुकूम देणारी? जा, मी नाही आणणार.' अरे, असे बोलू नये. यामुळे तर उलट तुझेच बळ कमी होते. तू असे बोलतो म्हणून तूच दडपणा खाली आहेस. अरे, ती तुला कशी हुकूम देऊ शकते? ती बोलेल तेव्हा शांत राहायचे, पण निर्बळ लोक खूप चिडखोर असतात. म्हणून तो चिडेल तेव्हा तू शांत राहून त्याची 'रेकॉर्ड' (बोलणे) ऐक.

ज्या घरात भांडणे होत नाहीत ते घर उत्तम. अरे! भांडण जरी

झाले पण ते मिटवता आले तरीही उत्तम म्हटले जाईल! एखाद्या दिवशी जेवणाची चव बिघडली तर मियाँभाई चिडतील आणि बायकोला बोलतील की, 'तू अशी आहेस, तू तशीच आहेस;' पण हे ऐकून बायको जर चिडली तर स्वतः मात्र चूप बसेल, तो समजतो की आपण आणखी काही बोललो तर विस्फोट होईल. म्हणून तोही गप्प आणि तीही गप्प! आणि हिंदू लोक तर अशा परिस्थितीत विस्फोट करूनच राहतील!

आमच्याकडे प्रत्येकाची टोपी वेगळी, वाण्याची वेगळी, दक्षिणात्यांची वेगळी, गुजरातींची वेगळी, सोनारांची वेगळी, ब्राह्मणांची वेगळी, प्रत्येकाचीच टोपी वेगळी. प्रत्येकाचा आपापला धर्म. प्रत्येकाचाच 'व्ह्यू पॉइंट' वेगळा, म्हणून आपापसात जमतच नाही. पण भांडण न केलेलेच बरे.

## मतभेद होण्यापूर्वीच, सावधान

आपल्या मनात कलुषित भाव राहिलेलेच नसतील तर त्यामुळे समोराच्याच्याही मनात कलुषित भाव राहत नाहीत. आपण चिडलो नाही म्हणजे तेही शांत बसतात, भिंतीसारखे होऊन जावे, म्हणजे ऐकू येणार नाही, आज पन्नास वर्षे झाली पण आमचे कधीही मतभेद झाले नाहीत. हीराबां (दादाश्रींच्या पत्नी)च्या हातून तूप सांडत असेल तरीही मी फक्त पाहातच राहायचो. आम्हाला त्यावेळी ज्ञान हजर राहते की त्या तूप सांडणारच नाहीत.

मी जरी म्हटले की सांडा तरीदेखील सांडणार नाहीत. मुद्दामहून कोणी तूप सांडेल का बरे? नाही. तरी पण तूप सांडते ते पहाण्यासारखे आहे म्हणून आपण पाहावे! आम्हाला तर मतभेद होण्यापूर्वीच ज्ञान ॲट द-मोमेंट (त्याच क्षणी) हजर राहते.

'मेरी हालत मै ही जानता हूँ' बोलले की मग बायको खुश होऊन जाते. आणि आपले लोक तर हालत वगैरे काही सांगतच नाहीत.' अरे, पण तू सांग ना, की तुझी हालत चांगली नाही. म्हणजे खुश राहायचे.'

सगळ्यांच्या उपस्थितीत, सूर्यनारायणाच्या साक्षीने, भटजीच्या

साक्षीने लग्न केले तेव्हा भटजी म्हणाले होते, 'शुभ मंगल सावधान' मग तुला सावधान होताही आले नाही? वेळेनुसार सावध झाले पाहिजे. ब्राह्मण म्हणतो, 'शुभ मंगल सावधान' पण याचा अर्थ तर ब्राह्मणच समजतो, लग्न करणारा कुठे समजतो?! सावधानचा अर्थ काय? की 'बायको संतापली तेव्हा तू शांत राहायचे, सावध व्हायचे. आता जर दोघांत भांडण झाले तर तेव्हा शेजारचे भांडण बघायला येतील की नाही? मग तमाशा होणारच ना? भांडल्यानंतर पुन्हा कधीच सोबत राहायचे नसेल तर भांडा. अरे, वाटणीच करून टाका! तेव्हा म्हणतो, 'नाही, दुसरीकडे कुठे जाणार!' जर पुन्हा एकत्रच राहायचे आहे मग कशाला भांडता?! आपण सावध व्हायला नको का? स्त्री जात अशी आहे की, ती बदलणार नाही, म्हणून आपल्यालाच बदलावे लागेल. ती सहज प्रकृती आहे, ती ऐकून घेईल अशी नाही.

बायको चिडली आणि तुम्हाला म्हणाली, 'मी तुमचे जेवणाचे ताट आणणार नाही, तुम्हीच इकडे जेवायला या. आता तर तुमची तब्येत चांगली झाली आहे, तुम्ही चालते-फिरते झाला आहात. असे तर तुम्ही हिंडता-फिरता, लोकांशी गप्पा मारता, बिड्या पिता आणि टाईम झाला की वरून आयते ताट मागता. मी नाही येणार!' तेव्हा आपण हळूवार म्हणावे, 'तुम्ही ताट वाढा, मी तिकडे येतो,' 'मी येणार नाही' असे म्हणायच्या अगोदरच तुम्ही सांगा, ताट वाढा मी तिकडे येतोय. माझीच चूक झाली. असे वागाल तर रात्र शांततेत जाईल, नाही तर रात्र बिघडेल. नवरा तणतणत तिथे झोपेल आणि बायको इथे चरफडत राहील. दोघांनाही झोप लागणार नाही. मग सकाळी चहा-नाश्ता होईल तेव्हा चहाचा कप जोरात आपटून ठेवेल आणि कुरबुर करेल की नाही? बायको सुद्धा लगेच समजून जाते की कुरबुर करत आहे. हे क्लेशमय जीवन आहे.

## क्लेशरहित घर जणू देऊळच

जिथे क्लेश असतो तिथे देव वास करीत नाही, म्हणून आपण देवाला सांगावे, 'साहेब तुम्ही मंदिरातच राहा, माझ्या घरी येऊ नका! आम्ही पुष्कळ मंदिरे बांधू, पण घरी येऊ नका! जिथे क्लेश नसतो तिथे

देवाचा वास नक्कीच असतो, याची मी तुम्हाला गॅरंटी देतो. आणि क्लेशाला आपण बुद्धी आणि योग्य समज वापरून मिटवू शकतो. मतभेद टळू शकतील इतकी जागृती प्राकृतिक गुणानेही येऊ शकते. इतकी बुद्धी पण येऊ शकेल असे आहे. 'जाणले' त्यास म्हणतात की ज्यामुळे कुणाशीही मतभेद होत नाहीत. मती पोहोचत नाही म्हणून मतभेद होतात. मती पूर्णपणे पोहोचली तर मतभेद होणार नाही, मतभेद म्हणजे संघर्ष, तोच कमकुवतपणा आहे.

काही भानगड झाली तर चित्त थोडा वेळ स्थिर ठेवा आणि शांतपणे विचार करा म्हणजे तुम्हाला आतूनच सुचेल. क्लेश झाला म्हणजे देव निघून जाणार की नाही?

**प्रश्नकर्ता :** निघून जाईल.

**दादाश्री :** काही लोकांच्या घरातून देव कधीच जात नाही पण भांडणे होऊ लागली तर देव म्हणेल, 'चला, आता निघूया, आपल्याला इथे जमणार नाही. क्लेशमय घरात राहायला मला आवडणार नाही.' म्हणून मग देव देरासरात आणि मंदिरात जातो. मंदिरात देखील क्लेश करतात. मुकुट, दागिने घेऊन जातात तेव्हा देव म्हणतो आता इथूनही निघूया. देवालाही या सगळ्यांचा वीट आला आहे.

इंग्रजांच्या वेळी म्हणत असत ना की,

*'देव गया डुंगरे, पीर गया मक्के.'*

(देवी-देवता गेले डोंगरावर आणि पीर गेलेत मक्क्याला.)

घरात आपण क्लेशरहित जीवन जगले पाहिजे. एवढे कौशल्य तरी आपल्याला जमले पाहिजे. दुसरे काही जमले नाही तर त्याला समजावले पाहिजे की, 'आपण भांडलो तर देव आपल्या घरातून निघून जाईल. म्हणून तू ठरव की आपल्याला भांडण करायचे नाही.' आपण ठाम ठरवायचे की यापुढे भांडायचे नाही. आणि ठरवल्यानंतर भांडण झाले तर समजायचे की हे आपल्या हातात नव्हते. म्हणून तो आपल्याशी भांडत

असेल तरी आपण चादर पांघरून झोपून जावे, मग तोही थोड्या वेळाने झोपून जाईल. आणि आपण जर प्रत्युत्तर देत राहिलो तर काय होईल?

## पापाचा पैसा, क्लेश करवितो

मुंबईत एका उच्च संस्कारी कुटुंबातील बाईंना मी विचारले की, तुमच्या घरी क्लेश-भांडण वगैरे काही होत नाहीत ना? तेव्हा त्या बाई म्हणाल्या, दररोज सकाळी क्लेशाचाच नाश्ता असतो!' मी म्हणालो 'मग तुमच्या नाश्त्याचे पैसे वाचले, नाही का?' त्या म्हणाल्या नाही, 'तरी पण ब्रेड घ्यायचा, ब्रेडवर लोणी लावत जायचे,' म्हणजे भांडण पण चालू आणि नाश्ता पण चालूच! अरे, असली कसली रे माणसे तुम्ही?

**प्रश्नकर्ता :** कित्येक लोकांच्या घरी लक्ष्मीच तशा प्रकारची असेल म्हणून भांडणे होतात का?

**दादाश्री :** हो या लक्ष्मीमुळेच असे होते. लक्ष्मी जर निर्मळ असेल तर नेहमी सगळे चांगले राहते, मन चांगले राहते. ही अनिष्ट लक्ष्मी घरात घुसली आहे, त्यामुळे घरात भांडणे होतात. आम्ही लहानपणीच निश्चित केले होते की, शक्य तोपर्यंत खोटी लक्ष्मी घरात घुसुच द्यायची नाही, आणि जर संयोगानुसार खोटी लक्ष्मी घरात घुसलीच तर तिला धंद्यात राहू द्यावी, घरात प्रवेश करू द्यायचे नाही. आज सहासष्ठ वर्षे झाली पण खोट्या लक्ष्मीला घरात शिरु दिलेले नाही, आणि त्यामुळे घरात कधी भांडण पण झाले नाही. घरात पण असे ठरवले होते की, एवढ्याच पैशाने घर चालवायचे, धंद्यात जरी लाखो रुपये कमावले, पण हे पटेल (स्वतः दादाश्री) सर्विस करायला गेले तर किती पगार मिळेल? फार तर सहाशे-सातशे रुपये मिळतील. धंदा तो तर पुण्याचा खेळ आहे. मला नोकरीत मिळाले असते तेवढेच पैसे घर-खर्चासाठी वापरायचे, बाकी पैसे धंद्यातच वापरायचे. इन्कमटॅक्सवाल्याचे पत्र आले तर तुम्हाला सांगता आले पाहिजे की 'बँकेत पैसे आहेत ते भरून टाका. कधी कोणता ॲटॅक येईल ते सांगता येत नाही. सगळेच पैसे खर्च करून टाकले आणि इन्कमटॅक्सचा ॲटॅक आला तर आपल्याला हार्ट ॲटॅक येईल! सगळीकडे ॲटॅक घुसले आहेत

ना? याला जीवन कसे म्हणायचे? तुम्हाला काय वाटते? चूक आहे असे वाटते की नाही? तर ती चूकच आपल्याला दुरुस्त करायची आहे.

## प्रयोग तर करून पाहा

भांडण करायचे नाही असे ठरवा ना! तीन दिवसांसाठी तरी ठरवून पाहा! प्रयोग करण्यास काय हरकत आहे. तीन दिवसांचा उपास करतात ना तब्येतीसाठी? तसेच हे पण ठरवून पाहा. आपण घरात सगळ्यांनी मिळून ठरवा की, 'दादाश्री जे सांगत होते ते मला पटले आहे. म्हणून आजपासून आपले भांडण-तंटे बंद.' मग बघा.

## धर्म केला (!) तरी पण क्लेश?

जिथे क्लेश नाही तिथे यथार्थ जैन धर्म, यथार्थ वैष्णव धर्म, आणि यथार्थ शिव धर्म आहे. आणि जिथे धर्माची यथार्थता आहे तिथे क्लेश होत नाही. पण इथे तर घरोघरी क्लेश होत आहेत, मग ते सगळे धर्म कुठे गेलेत?

संसार चालवण्यासाठी अशा धर्माची आवश्यकता आहे, की काय केल्याने क्लेश होणार नाही, हे समजावे. एवढे जरी समजले तरीदेखील धर्म प्राप्त केला असे म्हटले जाईल.

क्लेशरहित जीवन जगणे हाच (खरा) धर्म आहे. हिंदुस्तानात, इथे या संसारातच स्वत:चे घर स्वर्गासारखे झाले तरच मोक्षाची गोष्ट करावी, नाही तर मोक्षाबद्दल बोलूच नये, अगदीच स्वर्ग नाही पण स्वर्गाच्या जवळपासचे तरी झाले पाहिजे ना? क्लेशरहित झाले पाहिजे, म्हणून शास्त्रकार म्हणतात, 'जिथे किंचितमात्र क्लेश आहे तिथे धर्म नाही.' जेलमध्ये राहावे लागले तरी 'डिप्रेशन' नाही आणि राजवाड्यात राहावे लागले तरी 'एलिवेशन' नाही, असे असले पाहिजे. क्लेशरहित जीवन झाले म्हणजे मोक्षाच्या निकट आला, आणि म्हणून तो या जन्मात सुखी होणारच. मोक्ष प्रत्येकालाच हवा आहे. कारण बंधन कुणालाही आवडत नाही. परंतु क्लेशरहित झालो तर समजावे की आत्ता आपल्या मोक्षाचे स्टेशन जवळ आले आहे.

## तरी पण आपण सुलट करावे

एका वाणी गृहस्थाला मी विचारले, 'तुमच्या घरात भांडणे होतात का?' तेव्हा तो म्हणाला, 'खूप होतात.' मी विचारले, 'मग त्यावर तू काय उपाय करतोस?' तेव्हा तो म्हणाला, 'सर्व प्रथम तर मी घराचे दरवाजे बंद करतो.' मी विचारले, 'सर्व प्रथम दरवाजे बंद करण्यामागचा हेतू काय?' त्यावर तो म्हणाला, 'भांडण बघून लोक घरात घुसले तर उलट भांडण वाढेल. घरात भांडल्यानंतर वातावरण आपोआप शांत होते.' याची बुद्धी बरोबर आहे, मला हे पटले. एवढी जरी समजदारीची गोष्ट असेल तरी ती आपण स्वीकारावी. एखादा भोळा माणूस तर दरवाजा बंद असेल तर उघडून येईल. आणि लोकांना म्हणेल, 'या, पाहा आमच्या घरी हे असे आहे! अरे! हा तर तू जास्त तमाशा केलास!'

मारामारी करतात त्यात दुसऱ्या कोणाची जबाबदारी नाही, आपली स्वत:चीच जबाबदारी आहे. यातून तर आपल्याला वेगळे व्हावे लागते! जर तुम्ही खरोखर हुशार व्यक्ती असाल तर लोक उलट करत राहतील आणि त्याला तुम्ही सुलट करत राहिले तरच प्रश्न सुटतील. उलट करणे हाच लोकांचा स्वभाव आहे. तू समकिती असशील तर लोक जरी उलट करत असतील तरी तू सुलट करत राहा. आपण चुकूनही उलट करू नये. बाकी, जग तर रात्रभर नळ चालू ठेवेल आणि मडके पालथे करून ठेवेल असे आहे! स्वत:चेच सर्वस्व बिघडवत आहे. पण त्याला असेच वाटते की, मी लोकांचे बिघडवत आहे. लोकांचे बिघडवू शकेल असा कोणी जन्माला आलेलाच नाही.

हिंदुस्तानात कोणाची प्रकृती (स्वभाव) ओळखता येतच नाही, इथे तर देवसुद्धा गोंधळून जाईल! 'फॉरेन मध्ये' तर एक दिवस बायकोशी एकनिष्ठ राहिला तर आयुष्यभर एकनिष्ठ राहील. आणि इथे तर प्रकृतीचे दिवसभर निरीक्षण केले तरी निष्कर्ष काढता येणार नाही. हे तर कर्माच्या उदयामुळे नुकसान होत असते, नाही तर हे लोक नुकसान करून घेतील असे आहेत का? अरे, मेले तरी नुकसान होऊ देणार नाहीत. आत्म्याला थोडा वेळ बाजूला बसवतील आणि मग मरतील.

## शब्द बदलून मतभेद टाळला

**दादाश्री :** जेवताना मतभेद होतात का?

**प्रश्नकर्ता :** मतभेद तर होणारच ना!

**दादाश्री :** का? लग्न करतेवेळी असा करार केला होता की काय?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** त्यावेळी तर असा करार केला होता की, समय वर्ते सावधान (शुभ मंगल सावधान) घरात बायकोसोबत 'तुमचे आणि आमचे' अशी वाणी निघता कामा नये. वाणी विभक्त असायला नको, वाणी अविभक्त असायला हवी. आपण संयुक्त कुटुंबातले ना?

आमचा हिराबांबरोबर कधीही मतभेद झाले नाहीत, कधीच बोलण्यात 'माझे-तुझे' झाले नाही. पण एकदा आमच्यात मतभेद झाला होता. त्यांच्या भावाच्या मोठ्या मुलीचे लग्न होते म्हणून त्यांनी मला विचारले, 'लग्नात त्यांना काय भेटवस्तू देऊया?' तेव्हा मी त्यांना सांगितले, 'तुम्हाला जे योग्य वाटेल ते, पण घरात जी चांदीची भांडी आहेत तीच द्या ना! नवीन बनवू नका.' हे ऐकून त्या म्हणाल्या की, 'तुमच्या आजोळी मामाच्या मुलींचे लग्न असते तेव्हा तर चांदीचे मोठमोठे ताट बनवून देता!' त्यांनी जेव्हा 'माझे आणि तुमचे' असे शब्द म्हटले त्याचवेळी मी समजून गेलो की, आज आपली अब्रू गेली! आम्ही दोघे एक, मग माझे आणि तुमचे कशाला? हे माझ्या लक्षात येताच मी लगेच बदललो. मला जे सांगायचे होते ते मी पूर्णतः बदलून टाकले. मी त्यांना म्हणालो, 'माझा सांगण्याचा अर्थ असा नव्हता. तुम्ही ही चांदीची भांडी द्या आणि वरून पाचशे एक रुपये पण द्या, त्यांना उपयोगी पडतील.' त्या म्हणाल्या, 'हं...एवढे पैसे देतात का? तुम्ही तर अगदी भोळेच आहात, ज्याला त्याला देतच राहता.' मी म्हणालो, 'खरंच, मला काही समजतच नाही.'

बघा, माझ्या घरातही कसा मतभेद घडत होता, पण मी शब्द

फिरवून तो थांबवला! शेवटी मतभेद होऊच दिला नाही. मागील तीस–पस्तीस वर्षांपासून आमच्यात किंचितही मतभेद झाला नाही. 'बा' सुद्धा देवीसारख्या आहेत! कुठल्याही परिस्थितीत आम्ही मतभेद होऊच दिले नाहीत. मतभेद होण्याआधीच आम्ही समजून जातो की, असे फिरून जायला हवे, आणि तुम्हाला फक्त डाव्या आणि उजव्या या दोन बाजूनेच फिरवायचे माहित आहे की, एकतर या बाजूने आटे घट्ट बसतील किंवा त्या बाजूने घट्ट बसतील. आम्हाला तर सत्तरा लाख प्रकारचे आटे फिरवता येतात. शेवटी आम्ही गाडी रुळावर आणतो. मतभेद कधीच होऊ देत नाही. आपल्या सत्संगात जवळपास वीस हजार माणसे आणि चार एक हजार महात्मा आहेत पण आमचा कोणाशीही एकसुद्धा मतभेद झालेला नाही. मी कोणाशीही परकेपणा मानला नाही!

जिथे मतभेद आहे तिथे अंशज्ञान आहे आणि जिथे मतभेदच नाही तिथे विज्ञान आहे. जिथे विज्ञान आहे तिथे सर्वांश ज्ञान आहे. सेंटरमध्ये (केंद्रस्थानी) बसलो तर मतभेद उरतच नाहीत. तेव्हाच मोक्ष होतो. पण डिग्रीवर बसलो आणि 'आमचे–तुमचे' होत असेल तर मोक्ष होऊ शकत नाही. निष्पक्षपाती असेल त्याचा मोक्ष होतो.

समकितीची ओळख काय? घरातील सगळेजण उलट करीत असतील तरीही त्याला सुलट करून टाकतो तो समकिती. प्रत्येक बाबतीत सुलट करणे ही समकितीची निशाणी आहे. एवढेच ओळखायचे आहे की ही 'मशिनरी' कशी आहे, त्याचा फ्यूज उडाला तर तो कसा बसवावा. समोरच्या व्यक्तीच्या प्रकृतीस्वभावाशी ॲडजस्ट होता आले पाहिजे. आम्हाला तर समोरच्याचा फ्यूज उडाला असेल तरी ॲडजस्ट होता येते. पण समोरच्याशी ॲडजस्टमेंट विस्कटली तर काय होईल? फ्यूज गेला की मग तो भिंतीवर आपटतो, दारावर आपटतो पण वायर तुटत नाही. म्हणून जर कोणी फ्यूज बसवून दिला तर पुन्हा पूर्ववत होतो, नाही तर तोपर्यंत गोंधळतो.

संसार म्हटल्यावर घाव तर पडणारच ना? आणि बाईसाहेब पण म्हणतील की आता माझे घाव भरून निघणार नाहीत. पण मग संसारात

पडल्यानंतर पुन्हा घाव भरून निघतात. मूर्छितपणा आहे ना! मोहामुळे मूर्छितपणा आहे. मोहामुळे घाव भरून निघतात. घाव जर भरून निघाले नसते तर वैराग्यच आले असते ना?! मोह कशास म्हणतात? तर खूप अनुभव झाले असतील तरी पुन्हा सगळे विसरतो. घटस्फोट घेतेवेळी निश्चित करतो की आता पुन्हा कोणत्याही स्त्रीशी लग्न करणार नाही, तरी देखील पुन्हा धाडस करतो!

## ...ही तर कशी फसवणूक?

लग्न केले नाही तर जगाचा समतोल कसा राहील? कर ना लग्न. खुशाल लग्न कर! 'दादांना' त्याची हरकत नाही पण हरकत अज्ञानतेची आहे. आम्ही काय सांगू इच्छितो की, सर्वकाही करा, पण वास्तविकता काय आहे ते आधी नीट समजून घ्या.!

भरत राजा तेराशे राण्यांसोबत आयुष्यभर राहिले आणि त्याच जन्मात मोक्षालाही गेले! तेराशे राण्यांसोबत!!! म्हणून हकीकत समजून घेण्याची गरज आहे. समजून संसार करा, संन्यासी होण्याची गरज नाही. जर हे समजले नाही तर संन्यासी होऊन एका कोपऱ्यात पडून राहा. संन्याशी तर, संसारात ज्याचे स्त्रीसोबत जमत नाही तोच बनतो. आणि स्त्रीपासून दूर राहू शकतो की नाही, अशी शक्ती प्राप्त करण्याची ती एक कसरत आहे.

संसार हे टेस्ट एक्झामिनेशन आहे. तिथे टेस्टेड व्हायचे आहे. लोखंड सुद्धा टेस्टेड झाल्याशिवाय चालत नाही, मग मोक्षात अनटेस्टेड चालू शकेल का?

म्हणून मूर्छित होऊन जावे असे हे जग नाही. मूर्छेमुळे जग असे दिसते, आणि दु:खे सोसत-सोसत माणूस मरतो. भरत राजाला तेराशे राण्या होत्या, त्याची अवस्था काय होत असेल? इथे घरात एकच राणी असते तरीही ती तुमची सारखी फजिती करत असते, मग तेराशे राण्यांबरोबर कसे काय निभावणार? अरे, एका राणीचे मन जिंकायचे असेल तरी खूप कठीण जाते! जिंकूच शकत नाही. कारण मतभेद झाले

की पुन्हा सगळे विस्कटते! भरत राजाला तर तेराशे राण्यांबरोबर निभावयाचे होते. राणीवासातून नुसता फेरफटका मारला तरी पन्नास राण्यांची तोंडे फुगलेली असणार! अरे, कित्येक तर राजाला मारून टाकण्याच्या तयारीत असत. मनात विचार करत असत की निवडक राण्याच त्यांच्या आवडत्या आणि आम्ही मात्र परक्या! म्हणून काहीतरी मार्ग काढायला हवा. राजाला मारण्यासाठी काहीतरी करायला हवे, आणि तेही त्या राण्यांचा प्रभाव कमी करण्यासाठी! त्यांचा द्वेष राजावर नव्हता पण त्या राण्यांवर होता. पण असे करताना राजा तर मरेलच पण तूसुद्धा विधवा होशील त्याचे काय? तेव्हा म्हणेल, 'मी विधवा झाली तरी चालेल, पण तिला विधवा करीन तेव्हाच मी खरी!'

आम्हाला हे सगळे आजही जसेच्या तसेच दिसते, या भरत राजाच्या राणींचे आम्हाला सर्व स्पष्ट दिसते. त्या दिवशी त्यांची तोंडे कशी फुगलेली असतील? आतून राजा किती संकटात अडकलेला असेल, राजाच्या मनात कशी चिंता उद्‌भवत असेल, ते सगळे काही स्पष्टच दिसते! एका राणीचे लग्न जर तेराशे राजांबरोबर झाले असेल तर त्या राजांची तोंडे मात्र कधी फुगणार नाहीत! कारण पुरुषांना तोंड फुगवता येतच नाही ना!

## आरोप, किती दुःखदायी

सगळे काही तयार आहे, पण उपभोगता येत नाही. उपभोगण्याची पद्धत माहीत नाही. मुंबईतील शेठ लोक मोठ्या टेबलावर जेवायला बसतात पण जेवण झाल्यावर 'तू असे केलेस, तू तसे केलेस, विनाकारण तू माझा जीव जाळतेस.' विनाकारण कोणी जीव जाळतो का? न्यायपूर्वकच जाळतो, न्यायाबाहेर तर कोणी जाळतच नाही. लोक लाकूड जाळतात पण लाकडाचे कपाट कोणी जाळतो का? जे जाळायचे असेल तेच जाळतात. तरी असे आरोप चालू असतात. कोणत्याही गोष्टीचे भानच नाही. मनुष्यपण बेभान झालेले आहे, नाहीतर घरात असे आरोप करायचे असतात का? पूर्वीच्या काळी लोक कधीही एकमेकांवर असे आरोप करत नसत. आरोप करण्यासारखी वेळ आली तरी पण करत नसत.

त्यांना अशी जाणीव असायची की, आरोप केले तर समोरच्याला किती दु:ख होईल! आणि कलियुगात तर केव्हा माझ्या तावडीत सापडेल याचीच वाट पाहत असतात. घरात मतभेद का असावेत?

## आदळ-आपट, याला तुम्हीच जबाबदार

**प्रश्नकर्ता :** मतभेद व्हायचे कारण काय?

**दादाश्री :** भयंकर अज्ञान! त्याला संसारात जीवन जगणे जमत नाही, मुलीचे बाप होणे जमत नाही. बायकोचा नवरा होणे जमत नाही. जीवन जगण्याची कलाच माहीत नाही. सुख हाताशी असताना देखील सुखाचा उपभोग घेऊ शकत नाही.

**प्रश्नकर्ता :** पण घरात भांडी तर वाजणारच ना?

**दादाश्री :** रोज-रोज भांडी वाजली (भांडणे झाली) तर कसे चालेल? पण हे तर त्याला समज नसल्यामुळे होत असते. जो जागृत असेल त्याला तर एक जरी मतभेद झाला तरी रात्रभर झोप लागत नाही! या भांड्यांना (माणसांना) तर स्पंदने आहेत. म्हणून रात्री झोपता-झोपता देखील ही स्पंदने चालूच असतात की, 'हा तर असाच आहे, वाकडाच आहे, उलट्या डोक्याचा आहे, नालायक आहे, हाकलून लावण्यासारखा आहे!' पण त्या भांड्यांना अशी काही स्पंदने होतात का? आपले लोक समजल्याशिवायच हो ला हो करतात, आणि म्हणतात, दोन भांडी एकत्र आली की वाजतीलच! अरे, मूर्खा, वाजायला आपण काय भांडी आहोत? या दादांना कधी कोणी वाजतांना (भांडताना) पाहिले नसेल! स्वप्नात देखील असे आले नसेल!! वाजण्याचे कारणच काय? ही सर्व पूर्णपणे आपलीच जबाबदारी आहे, चहा लवकर मिळाला नसेल तर आपण टेबलावर रागाने तीनदा जोराने हात आपटतो, ती जबाबदारी कोणाची? यापेक्षा आपण बावळटासारखे बसून राहायचे. चहा मिळाला तर ठीक, नाही तर असेच ऑफिसला जाऊ! त्यात काय चुकीचे? चहाचीही काही वेळ तर असेलच ना? हे जग नियमाच्या बाहेर तर नसतेच ना? म्हणून आम्ही सांगितले आहे

की 'व्यवस्थित'! वेळ झाली की चहा आपोआप मिळेल, तुम्हाला टेबल ठोकण्याची गरज पडणार नाही. तुम्ही स्पंदने पाठवली नाहीत तरी स्वत:हून मिळेल, आणि स्पंदने उभी केली तरीही मिळेल. पण स्पंदने केल्यामुळे तुमच्या बायकोच्या हिशोबवहीत हे नोंदले जाईल की, त्यादिवशी तुम्ही असे टेबल ठोकले होते!

## प्रकृती ओळखून, सावध राहावे

पुरुष प्रसंग विसरून जातात पण स्त्रिया मात्र आयुष्यभर त्या प्रसंगाची मनात नोंद करून ठेवतात. पुरुष भोळे असतात, मोठ्या मनाचे असतात, सरळ असतात, ते बिचारे सगळे विसरून जातात. स्त्रिया तर बोलूनसुद्धा दाखवतात की, 'त्या दिवशी तुम्ही मला असे बोलला होतात ती जखम अजूनही माझ्या काळजात कोरली गेली आहे.' अरे, वीस वर्ष होऊन गेली, अजूनही ती नोंद ताजीच!! मुलगा वीस वर्षाचा होऊन गेला, लग्न करण्याएवढा झाला तरीही ती गोष्ट जपून ठेवलीस?! सगळ्या वस्तू सडतात पण यांची वस्तू मात्र सडत नाही! स्त्रीला जर आपण काही (दु:ख) दिले असेल तर ती ते अस्सल जागी जपून ठेवते, काळजाच्या आत, म्हणून काही देऊच नका. चुकूनदेखील (दु:ख) देण्यासारखे नाहीच, सावध राहण्यासारखे आहे.

म्हणून शास्त्रातसुद्धा लिहिलेले आहे की, 'रमा रमाडवी सहेली छे, विफरे महामुश्केल' (स्त्रीला रमवणे सोपे आहे, पण एकदा ती संतापली की तिला सांभाळणे फार कठीण असते!) ती संतापली तर काय करील याची कल्पनाच करता येणार नाही. म्हणून स्त्रीचा वारंवार अपमान करू नका. भाजी गार का? आमटीची फोडणी बरोबर नाही, अशी कटकट कशाला करतोस? वर्षातून एखाद्या दिवशी एखादा शब्द असेल तर ठीक आहे. पण इथे तर रोजच! *'भाभो भारमा तो वहु लाजमा.'* (सासरा मान-मर्यादेत असेल तर सून पण सासऱ्याचा आदर राखते.) आपण आपल्या मान-मर्यादेत राहायला हवे. आमटी चांगली झाली नसेल, भाजी गार झाली असेल, तर ते नियमाच्या आधारेच घडत असते. आणि फारच झाले तर कधीतरी हळुवारपणे सांगावे की, 'ही

भाजी रोज गरम असते, तेव्हा खूप छान लागते.' अशा पद्धतीने सांगितले तर तिला आपल्या सांगण्यामागचा हेतू समजेल.

## व्यवहार येत नसेल तर दोष कोणाचा?

अठराशे रुपयांची घोडी घेतो, आणि भाऊ घोडीवर बसतो. एक तर घोडीवर धड बसता येत नाही, आणि परत घोडीची खोडी काढतो, म्हणून घोडी उधळते, कारण तिला तशी सवयच नसते ना! आणि तेव्हा तो बावळट खाली पडतो! पण तो लोकांना काय सांगतो, 'घोडीने मला खाली पाडले.' मग ती घोडी स्वत:चा न्याय कोणाला सांगायला जाईल? घोडी वर बसणे तुला जमत नाही त्यात तुझा दोष की घोडीचा? अरे, तो बसताच घोडी समजून जाते की, हा तर जंगली प्राणी बसला, याला बसताच येत नाही! त्याचप्रमाणे या हिंदुस्तानी स्त्रिया म्हणजे आर्यनारी, त्यांच्याशी जर नीट वागता आले नाही की त्या पाडणारच ना? एकदा का नवरा बायकोच्या विरोधात गेला तर त्याचा प्रभावच राहत नाही. आपला संसार चांगल्या प्रकारे चालत असेल, मुले चांगल्या पद्धतीने शिकत असतील, काहीच भानगड नसेल तरीही तुम्हाला बायकोच्या चुका दिसल्या आणि विनाकारण बायकोला रागावलात म्हणजे बायकोला तुमच्या अकलेचा अंदाज येऊन जातो की याला काहीच समज नाही.

तुमचा प्रभाव जरी नसेल, पण तुम्ही घोडीला प्रेमाने कुरवाळले तरीही तिचे प्रेम तुम्हाला मिळेल. प्रथम प्रभाव पडला पाहिजे. बायकोच्या काही चुका तुम्ही सहन करून घेतल्या तर तिच्यावर प्रभाव पडतो. आणि चूक नसताना देखील चुका काढत राहिलात तर काय होईल? काही पुरुष स्त्रियांच्या बाबतीत तक्रार करीत राहतात, त्या सर्व चुकीच्या तक्रारी असतात. काही साहेब असे असतात की ऑफिसातील कर्मचाऱ्यांच्या कामात ढवळाढवळ करतात. तेव्हा सगळ्या कर्मचाऱ्यांना कळून चुकते की साहेबात काही दम नाही. पण काय करणार? पुण्याच्या जोरावर तो साहेब झालेला आहे. घरात बायकोशी पंधरा-पंधरा दिवस भांडण चालू असते! साहेबांना विचारले, 'का असे?' तर म्हणेल, 'तिला अक्कलच नाही.' आणि हा तर खूप शहाणा! विकायला गेलात तर चार आणे सुद्धा कोणी

देणार नाही! साहेबाच्या बायकोला विचारले तर ती म्हणेल, 'जाऊ द्या ना त्यांच्या बद्दल बोलण्यात काही अर्थ नाही. त्यांच्यात काही दमच नाही!'

स्त्रियांचा अपमान झाला तर त्या आयुष्यभर विसरत नाही थेट 'तिरडी' निघेपर्यंत त्या आठवणी ताज्याच असतात! त्या आठवणी जर विसरता आल्या असत्या तर हे जग केव्हाच संपुष्टात आले असते! पण असा विसर पडत नाही, म्हणून सावध राहा. प्रत्येक काम सावधगिरीने करण्यासारखे आहे!

'स्त्रीचारित्र्य' म्हटले जाते ना? ते समजेल असे नाही. तरी पण स्त्रिया देवी सुद्धा आहेत! असे आहे की, तुम्ही त्यांना देवीच्या रूपाने पाहिले तर तुम्ही देवता व्हाल. पण तुम्ही तर कोंबड्यासारखे राहता, हत्ती आणि कोंबड्यासारखे! हे बघा, हत्तीभाऊ आलेत आणि कोंबडेभाऊ आलेत! लोकांना राम व्हायची इच्छा नाही आणि घरात सीताजींना शोधतात! अरे वेड्या, राम तर तुला नोकरीतही ठेवणार नाही. यात पुरुषांचाही दोष नाही. तुम्हाला स्त्रियांसोबत 'डीलिंग' (व्यवहार) करता येत नाही.

तुम्हा व्यापाऱ्यांना गिऱ्हाईकांसोबत डीलिंग करता आले नाही तर गिऱ्हाईक तुमच्याकडे येणार नाहीत. म्हणून आपले लोक म्हणतात की सेल्समन चांगला ठेवा. चांगला, देखणा, हुशार 'सेल्समन' असेल तर लोक थोडे जास्त पैसे द्यायलाही तयार होतात. अशाप्रकारे आपल्याला स्त्रीसोबत डीलिंग करता आले पाहिजे. स्त्रीला एका डोळ्याने देवीप्रमाणे पाहा आणि दुसऱ्या डोळ्याने तिचे स्त्रीचारित्र्य पाहा. एका डोळ्यात प्रेम आणि दुसऱ्या डोळ्यात सक्ती ठेवली तरच संतुलन राहील. फक्त देवी म्हणून पाहाल आणि आरती करत बसाल तर ती चुकीच्या मार्गावर चालेल, म्हणून संतुलन ठेवा.

## व्यवहार याप्रकारे समजून घ्या

पुरुषांनी स्त्रियांच्या बाबतीत हात घालू नये आणि स्त्रियांनी पुरुषांच्या बाबतीत हात घालू नये. प्रत्येकाने आपापल्या डिपार्टमेंटमध्ये राहावे.

**प्रश्नकर्ता :** स्त्रीचे डिपार्टमेंट कोणते? पुरुषांनी स्त्रियांच्या कोणकोणत्या डिपार्टमेंटमध्ये हात घालू नये?

**दादाश्री :** असे आहे, स्वयंपाक काय करावा, घर कसे चालवावे, ते सर्व स्त्रीचे डिपार्टमेंट आहे. ती गहू कुठून आणते आणि कुठून नाही ते तुम्हाला जाणून घ्यायची काय गरज? ती स्वतःहून सांगत असेल की गहू आणण्यात मला अडचण येत आहे तर वेगळी गोष्ट पण ती काही विचारत नसेल, रेशनचे काही सांगत नसेल, तर आपल्याला त्या डिपार्टमेंटमध्ये ढवळाढवळ करण्याची गरजच काय? आज खीर बनव, आज जिलबी बनव, हे सुद्धा आपल्याला सांगण्याची काय गरज? वेळ येईल तेव्हा ती बनवेल. तिचे ते स्वतंत्र डिपार्टमेंट! एखाद्या वेळेस खूपच इच्छा झाली तर म्हणावे की 'आज लाडू बनव' असे सांगण्यास मी मनाई करत नाही, पण दुसरे वेडेवाकडे बोलणे, विनाकारण आरडओरडा करणे, कढी खारट झाली, खूप खारट झाली, हा सर्व मूर्खपणा आहे.

ही रेल्वेलाईन चालते, त्यात बऱ्याच प्रकारची कामे पार पाडली जातात! अनेक ठिकाणांहून नोंदी येतात, संदेश येतात, त्याचे पूर्ण 'डिपार्टमेंट'च वेगळे असते. तरी पण त्यात त्रुटी राहतातच ना? तसेच बायकोच्या डिपार्टमेंटमध्येही कधीतरी त्रुटी राहते. आपण त्यांच्या चुका काढायला गेलो तर त्या पण आपल्या चुका काढतील. तुम्ही असे करत नाही, तसे करत नाही. पत्र आले आणि त्यावेळी तुम्ही असे केले. म्हणजे ती सूड घेते. मी तुमच्या चुका काढल्या तर तुम्ही पण माझ्या चुका काढण्यासाठी तयारच असता! तेव्हा शहाणा माणूस घरच्या गोष्टीत ढवळाढवळ करीत नाही. त्याला पुरुष म्हणायचे. नाही तर तो बायकांसारखा असतो. कित्येक माणसे तर स्वयंपाक घरात जाऊन तिखटाचा डबा उघडून पाहतील आणि म्हणतील की दोन महिन्यांपूर्वीच तिखट आणले होते आणि एवढ्यात संपले पण? अरे, तिखट बघत बसलास तर तू यातून केव्हा पार पडशील? ज्याचे हे डिपार्टमेंट (काम) आहे तिला काळजी नसेल का? कारण वस्तू तर वापरलीही जाते आणि आणलीही जाते. पण हा विनाकारण ढवळाढवळ करतो! मग बायकोही

समजून जाते की याचे डोके सटकले आहे. नवरा कसा आहे हे ती लगेच जोखते. घोडीला जसे समजते की घोडेस्वार कसा आहे, तसेच बायकोही नवऱ्याचा स्वभाव ओळखते. त्यापेक्षा 'भाभो भारमा तो बहु लाजमा' (नवरा मान मर्यादेत राहिला तर बायकोही मर्यादेत राहील) नियम आणि मर्यादेनेच व्यवहार शोभेल. मर्यादा ओलांडू नका आणि निर्मळ राहा.

**प्रश्नकर्ता :** स्त्रियांनी पुरुषांच्या कोणत्या गोष्टीत हस्तक्षेप करू नये?

**दादाश्री :** पुरुषांच्या कोणत्याच गोष्टीत हस्तक्षेप करू नये. दुकानात किती माल आणला? किती विकला गेला? आज यायला उशीर का झाला? मग नवऱ्याला सांगावे लागते की, 'आज नऊची गाडी चुकली.' तेव्हा बायको म्हणेल, 'अशी कशी चुकली? कुठे भटकत होतात?' मग नवरा चिडतो. त्याच्या मनात येते की देवाने जरी असे विचारले असते तरी मी दोन दिल्या असता. पण आत्ता इथे तो काय करेल? नवरा-बायको उगाचच, कारण नसताना एक-दुसऱ्याच्या कामात ढवळाढवळ करतात. म्हणजे उत्तम बासमती तांदुळाचा भात बनवायचा आणि त्यात खडे टाकून खायचा! त्यात काय चव येईल? नवरा-बायकोने एकमेकांना मदत केली पाहिजे. नवरा जर काळजीत असेल तर ती काळजी कशी दूर होईल अशा तऱ्हेने बायकोने बोलायला हवे. तसेच नवऱ्याने पण बायकोची अडचण होणार नाही याकडे लक्ष दिले पाहिजे. नवऱ्याने बायकोला समजून घ्यायला हवे की घरात तिला मुले किती हैराण करत असतील! घरात काही तुटले-फुटले तर नवऱ्याने घरात आरडाओरडा करता कामा नये. तरीही कित्येक नवऱ्यांची तक्रार असतेच की गेल्या वर्षी मी इतक्या छान डझनभर कप-बशा आणल्या होत्या त्या सगळ्या तू कशा काय फोडून टाकल्यास? सगळी नासाडी केली. मग त्या बायकोला वाटते की, मी काय मुद्दाम फोडल्या? मला काय त्या खायच्या होत्या? फुटल्या तर फुटल्या, त्यात मी काय करू? असे म्हणेल. आता तिथेही भांडण. जिथे काही घेणेही नाही आणि देणेही नाही. जिथे भांडायचे काही कारणच नाही तिथेही भांडायचे?!

आमच्यात आणि हिराबांमध्ये कधीच मतभेद झाले नाहीत. आम्ही त्यांच्या कोणत्याही गोष्टीत कधीच हस्तक्षेप करीत नाही. त्यांच्या हातून पैसे पडले, आणि आम्ही ते पाहिले तरी आम्ही त्यांना असे म्हणत नाही की, 'तुमचे पैसे पडले.' तुम्ही ते पाहिले की नाही? घराच्या कोणत्याही गोष्टीत आम्ही हस्तक्षेप करीत नव्हतो. त्या पण आमच्या गोष्टीत हस्तक्षेप करायच्या नाहीत. आम्ही किती वाजता उठतो, किती वाजता अंघोळ करतो, केव्हा येतो, केव्हा जातो, अशा आमच्या कुठल्याही बाबतीत त्या आम्हाला कधीच विचारत नाहीत. आणि जर एखाद्या दिवशी त्यांनी आम्हाला सांगितले की, 'आज लवकर अंघोळ करा.' तर आम्ही लगेच धोतर मागवून अंघोळीला जायचो. अरे, आम्ही स्वत:च टॉवेल घेऊन अंघोळीला जायचो कारण आम्हाला कळत असे की, 'लाल झेंडा' दाखवीत आहे तेव्हा काही तरी कारण असेल, म्हणूनच त्या लवकर अंघोळ करण्यासाठी सांगत आहेत, असे आम्ही समजून जायचो. म्हणून तुम्हीही व्यवहाराबद्दल थोडेसे समजून घ्या ना की, कुणालाही कुणात दखल करण्यासारखे नाही.

फौजदाराने पकडले तर तुम्ही तो सांगेल तसे कराल ना? बसवेल तिथे बसाल ना! तुम्हाला समजते की आता इथे आपले चालणार नाही, इथे आहोत तोपर्यंत झंझंट आहे, तसेच हा संसार सुद्धा फौजदारीसारखाच आहे. म्हणून इथेही सरळ वागले पाहिजे.

घरी जेवण तर मिळते ना?

**प्रश्नकर्ता :** मिळते.

**दादाश्री :** हवे ते जेवण मिळते, खाट अंथरून देते मग आणखी काय? आणि जर खाट अंथरून दिली नाही तर आपण अंथरून घ्यावी, आपणहून तोडगा काढावा. शांतीपूर्वक सगळे समजावून सांगावे लागते. तुमच्या संसाराच्या हिताहिताची गोष्ट काय गीतेत लिहिलेली असेल? ती तर तुम्हालाच समजून घ्यावी लागेल ना?

'हसबंड' म्हणजे 'वाईफचीही' 'वाईफ!' (पती म्हणजे पत्नीची

पण पत्नी) लोक तर नवरेपणा गाजवायला जातात! अरे, पत्नी कधी पती होणार आहे का?! पती म्हणजे पत्नीचीही पत्नी. आपल्या घरात जोरात आवाज निघता कामा नये. हा काय 'लाऊड स्पीकर' आहे? पण हा तर इथे इतक्या जोरात ओरडतो की गल्लीच्या टोकापर्यंत ऐकू जाते! घरात 'गेस्ट' (पाहुण्या) प्रमाणे राहा. आम्ही पण घरात गेस्ट प्रमाणेच राहतो. तुम्ही निसर्गाचे पाहुणे आहात इथे जर तुम्हाला सुख वाटले नाही मग सासरी तरी कसे सुख वाटेल?

## 'मार' दिलात तर बदला घेईल

**प्रश्नकर्ता :** दादा, जेव्हा माझा राग अनावर होतो तेव्हा कित्येक वेळा माझा हात बायकोवर उठतो.

**दादाश्री :** बायकोला कधीही मारू नये. जोपर्यंत तुमचे शरीर मजबूत असेल तोपर्यंत ती ऐकून घेईल पण नंतर ती तुम्हाला जुमानणार नाही. स्त्री आणि मन या दोघांना मारणे म्हणजे संसारात भटकत रहाण्याची दोन साधने आहेत, या दोघांना मारूच नये. त्यांच्याकडून समजावून काम करवून घ्यावे लागते.

माझा एक मित्र होता, जेव्हा जेव्हा मी भेटत असे तेव्हा तो मला बायकोला मारताना दिसत असे, तिचे थोडे जर चुकले की तो मारायचा. नंतर मी त्याला एकांतात समजावून सांगितले की हे जे तू तिला मारतोस पण ती नक्की त्याची नोंद ठेवेल. तू नोंद ठेवणार नाहीस पण ती मात्र मनात नोंदून ठेवेल. अरे, ही तुझी लहान-लहान मुले, जेव्हा तू तिला मारतोस तेव्हा ती तुझ्याकडे एकटक बघत असतात. तेही लक्षात ठेवतील आणि मोठी झाल्यावर ती मुले आणि त्यांची आई, दोघे मिळून तुझा सूड घेतील. कधी? जेव्हा तुझी गात्रे ढिली पडतील तेव्हा. म्हणून बायकोला कधीच मारू नये. मारल्याने तर उलट आपलेच खूप नुकसान होत असते, खूप अंतराय निर्माण होतात.

आश्रित कोणाला म्हणतात? खुंटीला बांधलेली गाय असेल तिला मारले तर ती कुठे जाईल? घरातील माणसे तर खुंटीला बांधल्यासारखी

आहेत त्यांना मारले तर आपणच नालायक म्हटले जाऊ. त्यांना सोड आणि मग मार, तेव्हा ते तुलाच मारतील किंवा पळून जातील. बांधलेल्यांना मारणे हे शूरवीरांचे काम कसे म्हणू शकतो ? हे तर भित्र्यांचे काम म्हटले जाईल.

घरातील माणसांना तर किंचितही दु:ख देता कामा नये. ज्याच्यात समजदारी नसेल तेच घरच्यांना दु:ख देतात.

## तक्रार नाही, समाधान शोधा

**प्रश्नकर्ता :** दादा, माझी तक्रार कोण ऐकेल ?

**दादाश्री :** तू तक्रार करशील तर तूच गुन्हेगार ठरशील. मी तर जो तक्रार करायला येतो त्यालाच गुन्हेगार मानतो. तुला तक्रार करण्याची वेळच का आली ? तक्रार करणारे बहुतेक गुन्हेगारच असतात. स्वत: गुन्हेगार असेल तर तक्रार करायला येईल. तू तक्रार करशील तर तू तक्रारदार बनशील आणि समोरचा आरोपी बनेल. म्हणून त्याच्या (समोरच्याच्या) दृष्टीत तू आरोपी ठरशील. म्हणून कुणा विरुद्ध तक्रार करू नये.

**प्रश्नकर्ता :** मग मी काय करायला हवे ?

**दादाश्री :** 'ते' चुकीचे वाटले तर मनात म्हणावे की, ते खूप सज्जन आहेत, तूच चुकीची आहेस. अशाप्रकारे आपल्याकडून गुणाकार झाला असेल तर भागाकार करावा आणि भागाकार झाला असेल तर गुणाकार करावा. हे गुणाकार, भागाकार करायला का शिकवतात ? तर संसारातून सुटण्यासाठी.

तो भागाकार करत असेल तर आपण गुणाकार करावा म्हणजे रक्कम उडून जाईल. समोरच्या माणसाने मला असे केले, तसे केले, हाच अपराध आहे. रस्त्याने जाताना भिंत आपटली तर तिच्यावर का रागवत नाही ? झाडाला 'जड' का म्हटले आहे ? जी आदळतात ती सर्व हिरवी झाडेच आहेत ! गायीचा पाय आपल्या पायावर पडला तर आपण

तिला काही बोलतो का? असेच याही लोकांचे आहे. 'ज्ञानी पुरुष' सगळ्यांना का माफ करतात? ते जाणतात की या बिचाऱ्यांना काही समजत नाही, झाडासारखे आहेत. आणि समजदार व्यक्तीला तर सांगावेच लागत नाही, तो तर लगेच प्रतिक्रमण करतो.

समोरच्याचा दोष बघूच नये, त्यामुळेच आपला संसार बिघडतो. स्वत:चेच दोष पाहत राहावेत. आपल्याच कर्माच्या उदयाचे हे फळ आहे! तेव्हा काही सांगण्याची गरजच नाही ना?

सगळे एकमेकांना दोष देतात की 'तुम्ही असे आहात, तुम्ही तसे आहात.' आणि एकत्र बसून टेबलावर जेवतात. अशाप्रकारे आत वैर बांधले जाते. या वैरामुळे जग टिकून राहिले आहे. म्हणून आम्ही सांगितले आहे की, 'समभावे निकाल करा.' त्यामुळे वैर संपते.

## सुख घेण्यामुळे कुचंबणा वाढली

संसारी मिठाईत काय आहे? अशी कोणती मिठाई आहे की जी थोडा वेळ तरी टिकते? जास्त खाल्ली तर अजीर्ण होते, कमी खाल्ली तर (खाण्याची) लालूच उत्पन्न होत राहते. जास्त खाल्ली तर आत त्रास होतो. सुख असे असले पाहिजे की त्यापासून कसलाच त्रास होता कामा नये. पाहा ना, या दादांना आहेच ना असे सनातन सुख!

सुख मिळावे म्हणून लोक लग्न करतात. पण उलट त्यामुळे जास्त फसगत झाल्यासारखे वाटते. मला कोणी मदत करणारा मिळावा. संसार चांगला चालेल असा कोणी पार्टनर मिळेल म्हणून लोक लग्न करतात ना?

संसार तसा आकर्षक वाटतो पण संसारात पडल्यावर अशी कुचंबणा होते की त्यातून बाहेर पडता येत नाही. संसार म्हणजे लाकडाचा लाडू, जो खातो तोही पस्तावतो आणि जो खात नाही तोही पस्तावतो.

लग्न करून पश्चाताप होतो, पण पश्चातापातून ज्ञान मिळते. अनुभवातूनच ज्ञान मिळायला हवे ना? नुसते पुस्तक वाचल्याने अनुभवज्ञान थोडेच मिळते? पुस्तक वाचल्याने काय वैराग्य येते? वैराग्य तर पश्चाताप झाल्यानंतरच येतो.

## अशा पद्धतीने लग्न ठरते

एका मुलीला लग्न करायचेच नव्हते. तिच्या घरचे लोक तिला माझ्याकडे घेऊन आले. मी तिला समजावून सांगितले की लग्न करण्यावाचून पर्याय नाही आणि लग्न केल्यानंतर पश्चाताप केल्याशिवाय पण पर्याय नाही. म्हणून तुझे रडगाणे आता थांबव आणि मी सांगतो त्याप्रमाणे लग्न कर. जसा मिळेल तसा, पण नवरा तर हवा. मग लोक तुझ्याकडे बघून बोट दाखवू शकणार नाही ना! आणि कशाच्या आधारावर नवरा मिळतो (संबंध जुळतात) हे पण मी तिला समजावून सांगितले. तिला ते समजले, आणि माझ्या सांगण्याप्रमाणे मग तिने लग्न केले. तिला मुलगा जरा देखणा वाटला नाही पण तरीही तिने सांगितले, 'मला दादाजींनी सांगितले आहे म्हणून मी लग्न करणार.' त्या मुलीला लग्नापूर्वीच 'ज्ञान' दिले आणि नंतर तिने माझा एकही शब्द मोडला नाही, आणि आता ती एकदम सुखी आहे.

मुले मुलगी पसंत करताना खूप नखरे करतात. खूप उंच आहे, खूप ठेंगणी आहे, खूप जाडी आहे, खूप बारीक आहे, थोडी काळी आहे, अरे चक्रम, ही काय म्हैस आहे? मुलांना जरा समजवा की लग्न करण्याची काय पद्धत असते? तू जाऊन मुलीला पाहून ये आणि तिला पाहून तुला आकर्षण वाटले तर तुझे लग्न निश्चित आहे असे समज आणि आकर्षण वाटले नाही तर मग गोष्ट तिथेच थांबवावी.

## जग सूड घेतेच

एक मुलगा मुलगी पाहताना 'तू अशी फिर, तू तशी फिर' असे त्या मुलीला सांगत होता! मी त्याला खूप झापले. मी म्हणालो, 'तुझी आईसुद्धा कधीतरी सून झाली होती. कसा माणूस आहेस तू?' स्त्रियांचा एवढा घोर अपमान! सध्या मुलींची संख्या वाढली आहे म्हणून स्त्रियांचा एवढा अपमान होत आहे. पूर्वी तर या बावळटांचा अपमान होत असे, त्याचाच आता बदला घेतला जात आहे. यापूर्वी चारशे, पाचशे मूर्ख राजे रांगेत उभे राहत आणि एक राजकुमारी वरमाला घेऊन निघत असे आणि हे बावळट (आपल्याला वरमाला घालावी म्हणून) डोके पुढे

करून उभे राहत असत. राजकुमारी सरळ पुढे निघून गेली की आपमानाने आतल्या आत जळत असत. किती घोर अपमान! 'अरे, सोडा ना हा उपद्व्याप!' त्यापेक्षा तर लग्न न केलेलेच उत्तम!!

आणि आजकाल तर या मुलीसुद्धा मुलांना सांगू लागल्या आहेत, 'जरा असे गोल फिरून दाखवा बरे. मला नीट बघू द्या तुम्ही कसे दिसता?' बघा आता, तुम्हीच असे बघण्याची अशी पद्धत सुरू केली त्यामुळेच ही अवस्था झाली ना? यापेक्षा अशी पद्धत सुरूच केली नसती तर किती बरे झाले असते? आपणच हे लफडे काढले म्हणून आता आपल्यालाच ते भोवते आहे.

या काळातच, मागील पाचएक हजार वर्षांपासूनच पुरुष कन्या आणायला जातात. त्यापूर्वी तर वडील स्वयंवर रचत असत. त्यात शंभर बावळट आलेले असत! मुलगी त्यातल्या एका बावळटला पास करत असे! असे पास होऊन लग्न करण्यापेक्षा लग्न न करणेच चांगले. हे सर्व मूर्ख एका रांगेत उभे राहत, त्यांच्या समोरून ती कन्या वरमाला घेऊन चालत असे. सगळ्यांच्या मनात खूप आशा असायच्या की आता माझ्याच गळ्यात वरमाला पडणार, म्हणून ते डोके पुढे करून उभे राहत! अशाप्रकारे जर मुलगी आपल्याला पसंत करत असेल त्यापेक्षा तर जन्म न घेतलेलाच बरा! आज तेच मूर्ख स्त्रियांचा भयंकर अपमान करून जुने वैर वसूल करत आहेत! मुली पाहायला जातात तेव्हा तिला सांगतात 'अशी फिर, तशी फिर.'

## कॉमनसेन्सने सोल्युशन मिळते

मी सगळ्यांनाच असे म्हणत नाही की तुम्ही सगळे मोक्षाला चला. मी तर असे म्हणतो की 'जीवन जगण्याची कला शिका.' लोकांकडून थोडाफार तरी 'कॉमनसेन्स' शिका! तेव्हा शेठ लोक मला म्हणतात, 'आमच्यात तर कॉमनसेन्स आहे.' तेव्हा मी म्हणालो, 'कॉमनसेन्स असेल तर असे होणारच नाही. तुम्ही तर मूर्ख आहात.' शेठने विचारले कॉमनसेन्स म्हणजे काय? मी म्हणालो, 'कॉमनसेन्स म्हणजे एव्हरीव्हेअर एप्लीकेबल-थिऑरीटीकली ॲज वेल ॲज

प्रॅक्टिकली.' कुलूप कसेही असो, गंज लागलेले असो किंवा कसेही असो, त्यात किल्ली घातली की ते लगेच उघडते, याला म्हणतात कॉमनसेन्स. तुमची कुलूपे उघडत नाहीत. तुम्ही सारखे भांडता आणि कुलूपे तोडता! अरे, तुम्ही तर कुलूपावर मोठा हातोडाच मारता!

तुमच्यात मतभेद होतात का? मतभेद म्हणजे काय? कुलूप उघडता येत नाही, कुलूप उघडण्यासाठी कॉमनसेन्स कुठून आणणार? मला असे सांगायचे आहे की, तुमच्याकडे पूर्णपणे तीनशे साठ डिग्रीचा तरी कॉमनसेन्स नसेल हे मान्य आहे, पण चाळीस डिग्रीचा, पन्नास डिग्रीचा तरी असायला हवा ना? पण तसे लक्षात घेतले तर ना? जर कोणी शुभ विचार करण्यात गुंतला असेल तर त्याला त्या शुभ विचारांची आठवण येईल आणि तो जागृत होईल. शुभ विचारांचे बीज पडले की मग शुभ विचार करण्याचे सुरू होऊन जाते. पण हा शेठ संपूर्ण दिवस लक्ष्मीच्या आणि फक्त लक्ष्मीच्याच विचारात मग्न असतो! म्हणून मला शेठला सांगावे लागते की, 'शेठ तुम्ही इकडे लक्ष्मीच्या मागे पडले आहात, आणि तिकडे घर पूर्ण उद्ध्वस्त झाले आहे.' मुली गाडी घेऊन इकडे जातात, मुले तिकडे जातात आणि शेठानी पण इकडे-तिकडे फिरत असते. 'शेठ, तुम्ही तर चहूबाजूंनी लुटले गेले!' तेव्हा शेठने विचारले 'मग मी काय करू?' मी म्हणालो, 'नीट समजण्याचा प्रयत्न करा ना. जीवन कसे जगावे ते समजा. फक्त पैशांच्याच मागे धावू नका. तब्येतीची काळजी घ्या, नाही तर हार्ट-फेल होईल.' तब्येतीची काळजी, पैशांवर लक्ष, मुलांच्या संस्कारावर लक्ष, असे सगळेच कोपरे साफ करायचे असतात. (सगळ्यांवर लक्ष ठेवायचे) तुम्ही फक्त एकच कोपरा साफ करत राहता. आता बंगल्याचा जर एकच कोपरा झाडत राहिलो आणि बाकी सगळ्या कोपऱ्यात केर साचलेला असेल तर कसे होईल? सगळेच कानेकोपरे साफ करावे लागतात. त्याशिवाय जीवन कसे जगता येईल?

कॉमनसेन्स असलेला मनुष्य घरात कधी मतभेद होऊच देत नाही. पण कॉमनसेन्स आणणार कुठून? जर ज्ञानी पुरुषांजवळ बसाल, ज्ञानी पुरुषांची चरणसेवा कराल, तेव्हा कॉमनसेन्स उत्पन्न होईल. कॉमनसेन्सवाला

घरात किंवा बाहेर कुठेही भांडण होऊ देत नाही. या मुंबईत मतभेद नाहीत अशी किती घरे आहेत? मतभेद होत असेल तिथे कॉमनसेन्स आहे असे कसे म्हणता येईल?

घरात बायको म्हणाली की, 'आत्ता दिवस आहे' आणि तुम्ही म्हणाल की 'नाही आत्ता रात्र आहे' असे म्हणून वाद सुरू केलात तर त्यातून बाहेर कसे पडणार? तुम्ही तिला सांगा की, 'मी तुला विनंती करतो की आत्ता रात्र आहे, जरा बाहेर जाऊन बघ ना.' तरीही ती म्हणाली की, 'नाही, आत्ता दिवसच आहे.' तेव्हा तुम्ही सांगा, 'यु आर करेक्ट.' माझीच चूक झाली. असे वागाल तर तुमची प्रगती होऊ शकेल. नाही तर या गोष्टी कधी संपणार नाहीत. हे सगळे तर वाटसरू आहेत. बायकोसुद्धा एक वाटसरूच आहे.

## रिलेटिव्ह पण शेवटी धोकाच आहे, असे समजते

सर्व नाती 'रिलेटिव्ह' आहेत. यात कुठलेही नाते रियल नाही. अरे, हा देहच 'रिलेटिव्ह' आहे ना! हा देहच धोकेबाज आहे, मग या धोकेबाज देहाचे नातेवाईक कोण असतील? या देहाला आपण रोज न्हाऊमाखू घालतो, खाऊ घालतो तरी पण पोटात दुखते तेव्हा आपण म्हटले की, 'मी तुझी रोज एवढी काळजी घेतो तर आज जरा शांत हो ना?' (नको दुखूस). असे म्हणून भागते का? क्षणभरही दुखणे थांबत नाही, ते मग आपली अब्रूच काढते. अरे, या बत्तीस दातांमधील एकच दात दुखला ना, तरी किंचाळायची वेळ येते. सारे घर भरेल एवढे तर आयुष्यभरात दातवण वापरले असेल, रोजच दात घासत राहतो पण तरीही तोंड साफ होत नाही! परत जसेच्या तसेच. म्हणजे हा दगाच आहे! एक तर मनुष्य जन्म मिळला आणि तोही हिंदुस्तानात जन्म मिळाला आहे, उच्च जातीत जन्म मिळाला आहे, आणि तरी तुला मोक्षाचे काम करता आले नाही, तर तू भटकलाच समज! जा, तुझे सर्वच वाया गेले!!

## काहीतरी समजावे तर लागेलच ना?

जरी मोक्षाची गरज सगळ्यांना नसेल, पण कॉमनसेन्सची गरज

तर सगळ्यांनाच आहे ना! कॉमनसेन्स नसल्यामुळे घरचे खाऊन-पिऊन देखील भांडणे होतात. सगळे जण थोडेच काळाबाजार करतात? तरी पण संध्याकाळ होईपर्यंत घरातील तीन माणसांत तेहतीस मतभेद होतात. यात कुठले सुख मिळते? नंतर निर्लज्ज होऊन जगतात. असे स्वमान नसलेले जीवन जगण्यात काय फायदा? मॅजिस्ट्रेट साहेब कोर्टात सात वर्षांची सजा ठोठावून घरी येतात पण घरातील केस मात्र पंधरा-पंधरा दिवसापासून पेंडिंग असते! घरात बायकोशी अबोला धरतात! आपण जर मॅजिस्ट्रेट साहेबांना विचारले, 'साहेब, असे का?' तेव्हा साहेब म्हणतील, 'बायकोच खूप खराब आहे. एकदम जंगली आहे.' आणि जर आपण त्यांच्या बाईसाहेबांना विचारले की, 'का हो, साहेब तर खूप चांगले माणूस आहेत ना?'! हे ऐकून बाईसाहेब उत्तर देतील, जाऊ द्या हो, एकदम कुजका माणूस आहे. आता असे ऐकल्यावर लगेच आपल्या लक्षात येणार नाही का की हे जग पोकळ डोलारा आहे? इथे काहीच खरे नाही.

बायकोने जर महागातली भाजी आणली तर भाजी बघून मूर्ख ओरडतो, 'एवढी महाग भाजी कोणी आणते का? हे ऐकून बायको म्हणेल, 'तुम्ही माझ्यावर का ओरडलात?' असे म्हणून बायको दुप्पट जोराने ओरडते. यातून कसे सावरायचे? बायकोने जर महाग भाजी आणली असेल तर आपण तिला म्हणावे, छान केलेस, माझे धन्यभाग्य! नाही तर माझ्यासारख्या लोभी माणसाकडून इतकी महाग भाजी घेतली गेली नसती.

आम्ही एका माणसाच्या घरी गेलो होतो. तेव्हा त्यांच्या बायकोने दुरूनच चहाचा कप असा आपटून ठेवला. मी लगेच समजून गेलो की या दोघांमध्ये काहीतरी भानगड झाली आहे. मग मी त्या बाईला बोलावले आणि विचारले, 'चहाचा कप असा आपटून का ठेवला?' तेव्हा ती म्हणाली, 'छे, छे असे काहीच नाही.' मी तिला म्हटले, तुझ्या मनात काय आहे ते मला समजत आहे. तू माझ्यापासून का लपवतेस? तू आपटून ठेवले त्यावरून तुझ्या नवऱ्याच्याही लक्षात आले की हकीगत

काय आहे. शहाणी होऊन फक्त एवढे हे कपट सोडून दे, तुला जर सुखी व्हायचे असेल तर.

पुरुष भोळे असतात आणि या स्त्रिया तर चाळीस वर्षांपूर्वी तुम्ही वीस–पंचवीस शिव्या दिल्या असतील त्या बोलून दाखवतील की तुम्ही तेव्हा मला अशा शिव्या दिल्या होत्या! म्हणून सांभाळून वागा. स्त्रियांकडून काम करवून घ्या. स्त्री तर तुमच्याकडून काम करवूनच घेईल. पण तुम्हाला मात्र ते जमत नाही.

बायकोला जर दीडशे रुपयांची साडी आणायची असेल तर तिला पंचवीस रुपये जास्त द्या. ती ते सहा महिने तरी लक्षात ठेवेल. ह्या साध्या गोष्टी समजून घ्या. जीवन जगणे ही एक कला आहे! जीवन जगण्याची कला तर येत नाही आणि लग्न करायला निघतात! बिन सर्टिफिकेटचे पती बनायला निघाले, पती होण्यासाठीच्या पात्रतेचे सर्टिफिकेट असायला पाहिजे तेव्हाच बाप होण्याचा अधिकार प्राप्त होईल. हे तर योग्यता नसताना बाप बनतात आणि आजोबा पण बनतात! असे कुठपर्यंत चालेल? थोडेतरी समजायला हवे.

## रिलेटिव्हमध्ये तर जोडणे शिका

ही सगळी नाती 'रिलेटिव्ह' आहेत. ही नाती जर खरी– रियल असती तर बायको जोपर्यंत सुधारत नाही तोपर्यंत मी हट्ट सोडणार नाही, हा आग्रह ठीक आहे. पण हे तर 'रिलेटिव्ह'! 'रिलेटिव्ह' म्हणजे तासभर जरी बायकोशी कडाक्याचे भांडण झाले तरी दोघांच्या मनात 'घटस्फोट' घेण्याचा विचार येतो, नंतर त्या विचारबीजाचे झाड होते. तुम्हाला जर बायको हवी असेल तर ती जेव्हा जेव्हा फाडेल तेव्हा तेव्हा तुम्ही जोडत रहा. तरच हे 'रिलेटिव्ह' संबंध टिकतील, नाही तर तुटतील. वडिलांबरोबर सुद्धा 'रिलेटिव्ह' संबंध आहेत. लोक तर 'रियल' संबंध मानून वडिलांबरोबर हट्ट करतात. वडील सुधारत नाहीत तोपर्यंत काय हट्ट धरून बसायचा? अरे सोड रे बाबा, असे सुधारत–सुधारत तर म्हातारा मरून जाईल! त्यापेक्षा त्याची सेवा कर ना, बिचारा वैर बांधून जाईल

त्यापेक्षा त्याला निवांत मरू दे ना! त्याची शिंगे त्यालाच जड. कोणाची वीस-वीस फुटांची लांब शिंगे असतात, त्याचे ओझे आपल्याला कशाला?! ज्याची असतील त्याला ओझे!

तुम्हाला तुमची कर्तव्ये पार पाडायची आहेत. म्हणून दुराग्रह करू नका. ताबडतोब समस्यांचे समाधान करा. तरीही समोरची व्यक्ती जास्त भांडत असेल तर म्हणावे की, मी पहिल्यापासूनच अडाणी आहे, मला काहीच समजत नाही. असे बोलतात तर तो तुम्हाला सोडून देईल. जमेल त्या मार्गाने स्वत:ची सुटका करून घ्या. आणि मनात असे अजिबात आणू नका की सगळे डोक्यावर चढून बसले तर काय होईल? ते काय चढून बसतील? चढून बसण्याची शक्ती कुणाजवळही नसते. हे सगळे भोवरे कर्माच्या उदयानुसार नाचतात! म्हणून जेम-तेम करून आजचा शुक्रवार क्लेशरहित काढा. कल की बात कल देख लेंगे. (उद्याचे उद्या बघू) दुसऱ्या दिवशी फटाका फुटला तर काहीही करून त्यास झाका आणि आटोक्यात आणा. मग पुढचे पुढे पाहू. असे करून दिवस पार पाडावेत.

## ते सुधारलेले कुठपर्यंत टिकेल?

प्रत्येक गोष्टीत आपण समोरच्याशी ॲडजस्ट होत गेलो तर (जीवन जगणे) किती सोपे होऊन जाईल. शेवटी आपल्याला सोबत काय घेऊन जायचे आहे? कोणी म्हणेल की, 'भाऊ, तिला सरळ करा.' अरे, तू तिला सरळ करायला जाशील तर तू वाकडा होशील. म्हणून बायकोला सरळ करायला जाऊ नका, जशी आहे तशीच करेक्ट आहे. तुमचे तिच्याशी कायमचे नाते असले तर वेगळी गोष्ट आहे पण हे तर एका जन्मानंतर तुम्ही कुठे आणि ती कुठे, दोघेही विखुरले जाल. दोघांचा मृत्यूकाळ वेगळा, दोघांची कर्मे वेगळी! काही देणे नाही आणि काही घेणे नाही! पुढील जन्मी ती कुठे जाईल ते कोणास ठाऊक? आपण तिला सुधारू आणि ती सुधारलेली पुढच्या जन्मी जाईल दुसऱ्याच्या वाट्याला!

**प्रश्नकर्ता :** तिच्याबरोबर कर्मबंधन झाले असेल तर पुढच्या जन्मी तिच्याशी भेट होईलच ना?

**दादाश्री :** भेट होईल, पण वेगळ्या प्रकारे भेट होईल. दुसऱ्या कुणाची तरी बायको होऊन तुमच्याशी गप्पा मारायला येईल. कर्माचे नियम तर आहेतच! हे तर काही ठावठिकाणाच नाही. कोणी एखादाच पुण्यवान मनुष्य असा असतो की जो काही जन्म सोबत राहतो. नेमिनाथ भगवंत आणि राजुल नऊ जन्मांपर्यंत सोबतच होते ना! असे असेल तर गोष्ट निराळी आहे. इथे तर पुढच्या जन्माचेच सांगता येत नाही. अरे, याच जन्मात सोडून जातात ना! त्याला घटस्फोट म्हणतात ना? याच जन्मात दोन नवरे करतील, तीन नवरे करतील!

## ॲडजस्ट झालात, तरीही सुधारेल

म्हणून तुम्ही त्यांना सुधारायचे नाही. त्याही तुम्हाला सुधारणार नाहीत. जे मिळाले आहे ते सोन्याचे. कोणाचीही प्रकृती कधी सरळ होत नाही. कुत्र्याचे शेपूट वाकडे ते वाकडेच राहील. म्हणून आपण सावधपणाने वागावे. जशी आहे तशी भले असो, 'ॲडजस्ट एव्हरीव्हेर'

रागावण्याच्या ठिकाणीही तुम्ही रागावले नाही तर बायको जास्त सरळ वागते. जो क्रोध करत नाही त्याचा दरारा खूप असतो. आम्ही कधी कोणाला ओरडत नाही. तरी आमचा त्यांना दरारा वाटतो.

**प्रश्नकर्ता :** तर मग ती सरळ होते?

**दादाश्री :** मुळात सरळ करण्याचा हाच एकमेव मार्ग आहे. या कलियुगातील लोकांना पटत नाही, पण त्याशिवाय गत्यंतर नाही.

**प्रश्नकर्ता :** पण हा खूप कठीण मार्ग आहे.

**दादाश्री :** नाही, मुळीच नाही. हा मार्ग कठीण नाही, उलट हाच मार्ग सोपा आहे. गायीचे शिंग गायीलाच जड.

**प्रश्नकर्ता :** पण ती शिंग आपल्यालाही मारते ना?

**दादाश्री :** एखाद्या दिवशी आपल्याला लागेल. जसे गाय शिंगे मारायला आली तर तुम्ही बाजूला सरकता ना, तसेच इथेही सरकून

जावे! पण अडचण काय आहे? तर माझे लग्न झालेले आहे आणि माझी बायको आहे? अरे, ती बायको नाहीच. हा नवराच नाही तर ती बायको कशी असेल? हा तर अडाणी लोकांचा खेळ आहे! आता आर्यप्रजा राहिलीच कुठे?

## दुसऱ्याला सुधारण्यापेक्षा स्वतः सुधारण्याची गरज

**प्रश्नकर्ता :** स्वतःची चूक आहे असे समजून पत्नीला सुधारता येणार नाही का?

**दादाश्री :** दुसऱ्याला सुधारण्यासाठी स्वतःलाच सुधारण्याची आवश्यकता आहे. दुसऱ्या कोणाला सुधारू शकत नाही. जे दुसऱ्याला सुधारण्याचा प्रयत्न करतात ते सगळे अहंकारी आहेत. स्वतः सुधारलो म्हणजे समोरचाही सुधारतो. मी असेही लोक पाहिले आहेत की, जे बाहेर दुसऱ्यांना सुधारण्याचा प्रयत्न करतात पण घरात बायको पुढे त्यांची काहीच अब्रू नसते. आई समोरही अब्रू नसते. काय ही माणसे? आधी तू सुधार. मी याला सुधारीन, मी त्याला सुधारीन, हा खोटा अहंकार आहे. अरे तूच धड नाहीस, तर तू दुसऱ्यांना काय सुधारणार? प्रथम स्वतः शहाणे होण्याची गरज आहे. महावीर 'महावीर' होण्यासाठीच प्रयत्न करीत होते म्हणून त्यांचा आजही एवढा प्रभाव आहे! पंचवीसशे वर्षानंतर सुद्धा त्यांचा प्रभाव ओसरलेला नाही!!! आम्हीही कोणाला सुधारत नाही.

## सुधारण्याचा अधिकार कोणाला?

तुम्हाला दुसऱ्यांना सुधारण्याचा काय अधिकार आहे? ज्याच्यात चैतन्य आहे त्याला सुधारण्याचा तुम्हाला काय अधिकार आहे? हे कपडे मळकट झाले तर त्यांना स्वच्छ करण्याचा अधिकार तुम्हाला आहे. कारण तिथे समोरून कोणत्याही प्रकारची रिॲक्शन (प्रतिक्रिया) येणार नाही परंतु ज्यात चैतन्य आहे ते तर रिॲक्शन करणारे आहे, अशांना तुम्ही कसे काय सुधारणार? जिथे स्वतःचीच प्रकृती सुधरत नाही तिथे दुसऱ्यांची प्रकृती कशी सुधारणार? स्वतःच एक भोवरा आहे. त्याचप्रमाणे

इतर सर्वजण पण भोवरेच आहेत. कारण ते सर्व प्रकृतीच्या ताब्यात आहेत, ते अजून पुरुष झालेले नाहीत. पुरुष झाल्यानंतर 'पुरुषार्थ' उत्पन्न होतो. तो पुरुषार्थ तुम्ही अजून पाहिलेलाच नाही.

## व्यवहार निभावा ॲडजस्ट होऊन

**प्रश्नकर्ता :** संसारात राहायचे तर 'ॲडजस्टमेंट' एकतर्फी असायला नको ना?

**दादाश्री :** व्यवहार त्यास म्हणता येईल की, आपले 'ॲडजस्टमेंट' पाहून शेजारीही म्हणतील, 'सगळ्यांच्या घरी भांडणे होतात पण यांच्या घरी मात्र कधीही भांडण पाहिले नाही.' असा व्यवहार सर्वात उत्तम म्हटला जाईल. ज्यांच्याशी जमत नाही तिथेच शक्ती विकसित करायची आहे, ज्यांच्याशी जमते तिथे तर शक्ती आहेच. जिथे जमत नाही तिथे तुमचा कमकुवतपणा आहे. माझे सगळ्यांबरोबर का जमते? तुम्ही जेवढी 'ॲडजस्टमेंट' घ्याल तेवढी तुमची शक्ती वाढेल आणि कमकुवतपणा कमी होत जाईल. सगळ्या गैरसमजुती जेव्हा दूर होतील, तेव्हाच खरी समज येईल.

'ज्ञानी पुरुष' तर समोरचा जरी वाकडा वागत असेल तरीही त्याच्याशी 'ॲडजस्ट' होतात, 'ज्ञानी पुरुषांना' पाहून आपण सुद्धा तसे वागलो तर सगळ्या प्रकारच्या ॲडजस्टमेंट करायला जमतील. या मागचे सायन्स काय सांगते की तुम्ही वीतराग व्हा. राग-द्वेष करू नका. ही तर आतमध्ये थोडीफार आसक्ती असते, त्यामुळे मार पडतो. अशा व्यवहारात जे एकपक्षी, निःस्पृह झाले त्यांना वाकडे म्हटले जाईल. आपल्याला गरज असेल तेव्हा समोरचा वाकडा वागत असेल तरी देखील त्याला समजावून पटवून वळवून घ्यावे लागते. स्टेशनवर सामान उचलण्यासाठी हमाल हवा असेल आणि तो पैशांसाठी वाद घालत असेल तर त्याला चार आणे जास्त देऊन सुद्धा पटवावे लागते, आणि तसे जर केले, नाही तर ती बॅग आपल्यालाच उचलावी लागेल ना?

'डोन्ट सी लॉज, प्लीज सेटल' (कायदा पाहू नका, कृपया

समाधान करा), समोरच्याला 'सेटलमेन्ट' करायला सांगायचे, की 'तुम्ही असे करा, तसे करा.' असे सर्व सांगायला वेळच कुठे असतो? समोरच्या व्यक्तीच्या शंभर चुका असतील तरीही आपण आपली स्वत:चीच चूक आहे असे सांगून पुढे जायला हवे. या काळात 'कायदे' बघत बसायचे असते का? हे तर आत्ता शेवटच्या टोकापर्यंत पोहोचले आहे. जिथे पाहावे तिथे पळापळ आणि धावाधाव! लोक गुरफटून गेले आहेत!! घरी जावे तर बायकोची तक्रार, मुले ओरडतात, नोकरीवर गेलो तर शेठ ओरडतो, गाडीत गेलो तर गर्दीत धक्के खावे लागतात! कुठेच शांती नाही. शांती तर पाहिजे ना? कोणी भांडू लागले तर आपल्याला त्याच्याबद्दल दया वाटली पाहिजे की, अरेरे! बिचारा किती त्रासला आहे! इतका त्रासलेला आहे की भांडत आहे! त्रासतात, चिडतात ते सगळे कमजोर आहेत.

**प्रश्नकर्ता :** कित्येक वेळा असे होते की, एकाचवेळी दोन व्यक्तींबरोबर एकाच गोष्टीसाठी ॲडजस्टमेंट करायची असते तर अशा वेळी दोघांशी कसे ॲडजस्ट होऊ शकतो?

**दादाश्री :** दोघांशीही ॲडजस्ट होता येईल. अरे, सात माणसांशीही ॲडजस्टमेंट करायची असेल तरी करू शकता. एकाने विचारले, 'माझ्या कामाचे काय केले?' तेव्हा सांगावे हो भाऊ, तुझ्या म्हणण्याप्रमाणे करणार. दुसऱ्यालाही असेच सांगावे. 'तुम्ही म्हणाल तसे करू.' शेवटी 'व्यवस्थित शक्ती'च्या बाहेर तर काहीच घडणार नाही, म्हणून कुठल्याही परिस्थितीत भांडण उभेच करू नका.

चांगले किंवा वाईट म्हटल्यामुळे ते आपल्याला भुतासारखे त्रास देतात. आपल्याला तर दोघांनाही एक समानच ठेवायचे आहे. एकास चांगले म्हटले म्हणून दुसरा खोटा ठरला, मग तो त्रास देतो. पण दोन्हींचे मिश्रण केले म्हणजे मग त्याचा काहीच परिणाम होत नाही. 'ॲडजस्ट एव्हरीव्हेर' या सूत्राचा आम्ही शोध लावला आहे. खरे म्हणत असेल त्याच्याशीही आणि खोटे म्हणत असेल त्याच्याशीही, दोघांशीही ॲडजस्ट व्हायचे. आम्हाला कोणी म्हटले की, 'तुम्हाला अक्कल नाही.' तर

आम्ही त्याच्याशी लगेच ॲडजस्ट होतो, आणि त्याला सांगतो, 'ती तर पहिल्यापासूनच नव्हती!' तू आता का बरे शोधायला आलास? तुला तर हे आज समजले, पण मला तर लहानपणापासून माहीत आहे. असे म्हटले म्हणजे वाद मिटला ना? मग तो पुन्हा आपल्याजवळ अक्कल काढायला येणारच नाही. असे केले नाही तर आपण 'आपल्या घरी' (मोक्षाला) केव्हा पोहोचू?

आम्ही हा सरळ आणि सुलभ रस्ता दाखवीत असतो. आणि अशी भांडणे काय रोज-रोज होतात? ते तर जेव्हा आपल्या कर्माचा उदय होतो तेव्हाच होतात, तेवढ्या पुरतीच 'ॲडजस्टमेंट' करायची असते. घरात जर बायकोशी भांडण झाले तर भांडण झाल्यावर बायकोला हॉटेलमध्ये नेऊन खाऊ-पिऊ घालून खुश करा. आता भांडणाचा तंत (अंश) देखील शिल्लक राहता कामा नये.

ॲडजस्टमेंटला आम्ही न्याय म्हणतो. आग्रह-दुराग्रह म्हणजे काही न्याय नाही. कोणत्याही प्रकारचा आग्रह धरणे म्हणजे न्याय नाही. आम्ही कशाचाही आग्रह धरून ठेवत नाही. ज्या पाण्याने मूग शिजतील त्या पाण्याने शिजवा, शेवटी गटारीच्या पाण्याने पण शिजवा!!

वाटेत दरोडेखोर आले आणि त्यांच्याशी वाद घातला, 'डिसॲडजस्ट' झालात तर प्राण गमवाल. त्याऐवजी आपण ठरवायचे की, त्याला 'ॲडजस्ट' होऊन प्रसंगाला तोंड द्यायचे आहे. त्याला विचारा, 'बाबा रे, तुला काय हवे आहे? आम्ही तर यात्रेला निघालो आहोत.' अशाप्रकारे त्याशी ॲडजस्ट होऊन जावे.'

या वांद्राच्या खाडीतून दुर्गंध येतो म्हणून आपण त्या खाडीशी भांडायला जातो का? तशीच ही माणसेही दुर्गंध देतात मग काय त्यांना काही बोलायला हवे का? दुर्गंध देणाऱ्यांना खाडी (नाला) म्हणतात आणि सुगंध पसरवतात त्यांना बाग म्हणतात. जे-जे दुर्गंध देतात ते सगळे आपल्याला हेच सांगतात की, तुम्ही आमच्याप्रति वीतराग राहा.

असे 'ॲडजस्ट एव्हरीव्हेर' झाला नाहीत तर तुम्ही वेडे व्हाल.

समोरच्याला विनाकारण डिवचत राहतात म्हणूनच ते वेडे होतात. या कुत्र्याला एकदा डिवचले, दुसऱ्यांदा, तिसऱ्यांदा डिवचले तोपर्यंत तो आपली अब्रू ठेवतो (गप्प बसतो) पण मग आपण पुन्हा पुन्हा डिवचत राहिलो तर शेवटी तोही चावतो. त्यालाही कळते की, हा मला रोजच विनाकारण त्रास देतो, हा तर नालायक माणूस आहे, निर्लज्ज आहे. ही समजून घेण्यासारखी गोष्ट आहे. अजिबात वादविवाद करत बसू नका. ॲडजस्ट एव्हरीव्हेर.

## नाही तर व्यवहारिक अडचणी अडकवतील

प्रथम हा व्यवहार शिकायचा आहे. व्यवहाराची योग्य समज नसल्यामुळे तर लोकांना निरनिराळे त्रास सोसावे लागतात.

**प्रश्नकर्ता :** तुम्ही सांगितलेल्या अध्यात्मसंबंधी गोष्टींबद्दल तर काही प्रश्नच नाही, परंतु व्यवहारासंबंधी ज्या गोष्टी तुम्ही सांगता त्या देखील अगदी टॉपच्या (उच्च पातळीच्या) आहेत.

**दादाश्री :** असे आहे ना, की व्यवहारात टॉपचे समजल्याशिवाय कोणी मोक्षाला जाऊ शकले नाही, तुमच्याजवळ लाख मोलाचे आत्मज्ञान असेल पण व्यवहार ज्ञान समजल्याशिवाय कोणी कधी मोक्षात गेले नाहीत! कारण व्यवहारच आपल्याला सोडविणारा आहे ना? जर व्यवहाराने सोडले नाही तर तुम्ही काय कराल? तुम्ही 'शुद्धात्मा' आहातच पण व्यवहाराने तुम्हाला सोडले तर ना? तुम्ही तर व्यवहाराचा गुंता वाढवतच राहता. अरे! झपाट्याने निकाल लावा ना?

या भाऊला जर आपण सांगितले की, 'जा दुकानातून आईस्क्रीम घेऊन ये.' पण तो अर्ध्यावरूनच परत येईल. आपण विचारले, 'का परत आलास?' तेव्हा तो म्हणेल की, 'रस्त्यात गाढव दिसले म्हणून!' अपशकून झाला!! आता त्याला जर असे चुकीचे ज्ञान असेल तर त्या चुकीच्या ज्ञानातून त्याला बाहेर काढायला हवे ना? त्याला समजवायला हवे की भाऊ, गाढवात सुद्धा भगवंत बसलेले आहेत म्हणून अपशकून वगैरे काही होत नाही. तू गाढवाचा तिरस्कार करशील तर तो तिरस्कार

गाढवाच्या आत बसलेल्या भगवंताला पोहोचतो, म्हणून त्याचा तुला भयंकर दोष लागतो. पुन्हा असे घडता कामा नये. अर्थात लोकांना असे चुकीचे ज्ञान झाले आहे त्यामुळे लोक 'ॲडजस्ट' होऊ शकत नाहीत.

## 'काउंटरपुली'- ॲडजस्टमेंटची पद्धत

प्रथम आपण आपले मत मांडू नये. समोरच्याला विचारावे की या बाबतीत तुझे काय मत आहे? समोरचा माणूस आपल्या मताचा हट्ट धरून बसला असेल तर आम्ही आमचे मत सोडून देतो. आपण तर फक्त एवढेच बघायचे की कोणत्याही कारणाने समोरच्याला दु:ख व्हायला नको. आपला अभिप्राय (मत) समोरच्यावर लादता कामा नये. समोरच्या व्यक्तीचा अभिप्राय आपण घ्यावा. आम्ही तर सर्वांचा अभिप्राय घेऊनच 'ज्ञानी' झालो आहोत. मी जर माझा अभिप्राय समोरच्यावर लादायला गेलो तर मीच कच्चा सिद्ध होईन. आपल्या अभिप्रायामुळे कोणालाही दु:ख होता कामा नये. तुझी 'रिव्होल्यूशन' अठराशे असतील आणि समोरच्याची सहाशे असतील आणि तू तुझा अभिप्राय त्याच्यावर ठोकून बसवायला गेलास तर त्याचे इंजिन तुटून जाईल. त्याचे सगळे गियर बदलावे लागतील.

**प्रश्नकर्ता :** 'रिव्होल्यूशन' म्हणजे काय?

**दादाश्री :** या विचारांचा जो वेग असतो तो प्रत्येकाचा वेगळा असतो. काही तरी घडले की मन एका मिनिटात तर कितीतरी साऱ्या गोष्टी दाखवून देते, त्याचे सर्व पर्याय एट-ए-टाइम, एकाच वेळी दाखवून देते. या मोठमोठ्या पंतप्रधानांचे एका मिनिटात बाराशे-बाराशे 'रिव्होल्यूशन' फिरत असतात, तर आमचे पाच हजार असतात. महावीर भगवंतांचे तर लाख-लाख 'रिव्होल्यूशन' फिरत असत!

हे मतभेद होण्याचे कारण काय? समजा तुमच्या बायकोची शंभर 'रिव्होल्यूशन' आहेत आणि तुमची पाचशे 'रिव्होल्यूशन' आहेत आणि तुम्हाला (तिचे म्हणणे समजून घेण्यासाठी) मध्ये 'काउंटरपुली' टाकता आली नाही तर ठिणग्या उडणारच, भांडणे होणारच. अरे! कित्येक वेळा

'इंजिन'सुद्धा तुटून जाते. 'रिव्होल्यूशन' म्हणजे काय हे समजले का तुम्हाला? तुम्ही एखाद्या मजुराशी बोलत असाल तर तुम्ही काय बोलत आहात ते त्याला कळणारच नाही. त्याची रिव्होल्यूशन पन्नास असतील आणि तुमची पाचशे असतील, कोणाची हजार असतील, तर कोणाची बाराशे सुद्धा असतील. ज्याची जशी 'डेव्हलपमेंट,' त्याप्रमाणे त्याचे रिव्होल्यूशन असतात. मध्ये काउंटरपुली टाकून गती कमी केलीत तरच तुमचे बोलणे त्याला समजेल. काउंटरपुली म्हणजे (समोरच्याला समजेल अशा पद्धतीने) तुम्हाला मध्ये पट्टा टाकून तुमचे रिव्होल्यूशन कमी करावे लागतील. मी प्रत्येकाशी बोलताना काउंटरपुली वापरतो. फक्त अहंकार काढून टाकल्याने भागत नाही. त्याखेरीज प्रत्येकाशी बोलताना काउंटरपुली पण वापरावी लागते. म्हणूनच माझे कोणाशीही मतभेद होत नाहीत. आमच्या लक्षात येते की, या माणसांची एवढीच 'रिव्होल्यूशन' आहेत. म्हणून मी त्याप्रमाणे काउंटरपुली टाकतो. आमचे तर लहान मुलाशी सुद्धा चांगले जमते. कारण आम्ही त्याच्याशी बोलताना रिव्होल्यूशन चाळीसपर्यंत खाली आणतो. म्हणून आमचे बोलणे त्याला समजते, नाही तर ती मशीन तुटून जाईल. (त्याच्यावर ताण पडेल)

**प्रश्नकर्ता :** समोरच्या व्यक्तीच्या लेव्हलवर आल्यानेच त्याच्याशी संवाद शक्य होतो, असेच ना?

**दादाश्री :** हो, त्याच्या रिव्होल्यूशन वर आलात तरच संवाद साधला जाऊ शकतो. तुमच्याशी बोलत असताना आमचे रिव्होल्यूशन कुठल्या कुठे जाऊन येतात! संपूर्ण वर्ल्डमध्ये फिरून येतात!! तुम्हाला काउंटरपुली टाकता येत नाही मग त्यात कमी रिव्होल्यूशन असणाऱ्या इंजिनाचा काय दोष? तो तर तुमचाच दोष की तुम्हाला काउंटरपुली टाकता आली नाही!

## वाईट बोलण्यामुळे भांडण वाढले

**प्रश्नकर्ता :** नवऱ्याची भीती, भविष्याची भीती यामुळे 'ॲडजस्टमेंट' करता येत नाही. तिथे मग 'आपण त्याला सुधारणारे कोण? हे लक्षात राहत नाही आणि समोरच्याला धमकी दिली जाते.

**दादाश्री :** अशा वेळी 'व्यवस्थित शक्ती'चा उपयोग केला, 'व्यवस्थित शक्तीचे' ज्ञान समजून घेतले तर कुठलाच त्रास होणार नाही. मग काही विचारावेच लागणार नाही. नवरा येईल तेव्हा जेवणाचे ताट वाढून, बसायला पाट देऊन 'जेवायला चला!' असे सांगा. त्यांचा प्रकृती स्वभाव बदलणार नाही. तुम्ही लग्न करते वेळी ज्या प्रकृतीला पाहून, पसंत करून लग्न केले ती प्रकृती शेवटपर्यंत निहाळायची. मग काय पहिल्याच दिवशी माहीत नव्हते का की, ही प्रकृती अशीच आहे म्हणून? त्याच दिवशी सोडून द्यायचे होते ना! का जास्त नादी लागलात?

कटकट करण्याने संसारात काहीच फायदा होत नाही, उलट नुकसानच होते. किटकिट म्हणजे भांडण! म्हणूनच भगवंताने त्यास 'कषाय' म्हटले आहे.

तुमच्या दोघांमध्ये जसजसे 'प्रॉब्लेम' वाढतील तसतसे तुम्ही दुरावत जाल. 'प्रॉब्लेम' सुटले म्हणजे दुरावा राहणार नाही. दुराव्यामुळे दुःखे आहेत. आणि अडचणी तर सगळ्यानांच येतील. फक्त तुम्हालाच आहेत असे नाही. ज्यांनी ज्यांनी लग्न केले त्या सगळ्यांनाच 'प्रॉब्लेम' आहेत.

कर्माचा उदय झाला की वाद निर्माण होतात, पण त्यावेळी जिभेने वाईट बोलणे बंद करा. जे बोलायचे ते पोटातच ठेवा. घरातही बोलू नका आणि बाहेरही बोलू नका.

## अहो! व्यवहाराचा अर्थच...

**प्रश्नकर्ता :** प्रकृती (स्वभाव) सुधारता येत नाही पण व्यवहार तरी सुधारता आला पाहिजे ना?

**दादाश्री :** व्यवहार तर लोकांना येतच नाही. व्यवहार जर लोकांना आला असता, अगदी अर्धा तासभर जरी आला असता तरी फार झाले असते! व्यवहार समजलेलेच नाही. व्यवहार म्हणजे काय? तर उपलक (वरवरचा)! व्यवहार म्हणजे सत्य नाही. लोकांनी व्यवहारालाच सत्य मानून घेतलेले आहे. व्यवहारात सत्य म्हणजे जे रिलेटिव्हमध्ये सत्य

आहे ते. इथल्या नोटा खऱ्या असोत की खोट्या त्या 'तिथल्या' स्टेशनवर चालत नाहीत. म्हणून सोडा ना ही झंझट. आपण आपले (मोक्षाचे) काम करून घ्या. व्यवहार म्हणजे (मागील जन्मी) दिलेले परत घेणे. आता जर कुणी म्हटले, 'चंदुलालला अक्कल नाही.' तर आपण समजावे की, आपण जे दिले होते तेच परत मिळाले! हे जर लक्षात आले तर त्यालाच व्यवहार म्हटले जाते. आजकाल कुणाला व्यवहार कळतच नाही. ज्याच्यासाठी व्यवहार, व्यवहारच आहे; त्याचा निश्चय, निश्चय आहे.

## ...आणि सम्यक् म्हटल्याने भांडण मिटते

**प्रश्नकर्ता :** जर कोणी जाणूनबुजून वस्तू फेकून दिली, तर अशा प्रसंगी ॲडजस्टमेंट कशी करावी?

**दादाश्री :** ही तर फक्त वस्तूच फेकली पण मुलाला जरी फेकले ना, तरी पण आपण पाहत राहावे. बाप मुलाला फेकत असेल तरीही पाहत राहावे. नाही तर काय आपण नवऱ्याला फेकून द्यायचे? एकाला तर हॉस्पिटलमध्ये जावे लागेल मग दोघांना हॉस्पिटलमध्ये पाठवायचे का? आणि नंतर जेव्हा त्याला संधी मिळेल तेव्हा तो तुम्हाला बदडणार, मग तिघेही हॉस्पिटलमध्ये!

**प्रश्नकर्ता :** मग काहीच बोलायचे नाही का?

**दादाश्री :** बोलायचे, पण सम्यक् बोलता येत असेल तर बोला. नाही तर कुत्र्यासारखे भुंकण्यात काय अर्थ? सम्यक् बोलावे.

**प्रश्नकर्ता :** सम्यक् म्हणजे कशा प्रकारे?

**दादाश्री :** 'अहोहो! तुम्ही या मुलाला का फेकले? काय झाले?' तेव्हा तो म्हणेल की, 'मी काय मुद्दाम फेकले? तो माझ्या हातातून निसटला म्हणून पडला.'

**प्रश्नकर्ता :** पण हे तर ते खोटे बोलले ना?

**दादाश्री :** ते खोटे बोलत आहेत हे बघण्याची तुम्हाला गरज नाही. खोटे बोलावे की खरे बोलावे ते त्याच्यावर अवलंबून आहे, ते

आपल्या हातात नाही. तो त्याच्या मर्जीनुसार बोलेल. त्याला खोटे बोलायचे असेल किंवा तुम्हाला संपवायचे असेल ते त्याच्या नियंत्रणात आहे. रात्री त्याने तुमच्या माठात विष टाकले तर तुम्ही मरणारच ना?! म्हणून जे आपल्या ताब्यात नाही त्याचा विचार करायचा नाही. सम्यक् बोलता येत असेल तर ठीक आहे. सम्यक्पणे विचारता आले तर ते कामाचे की, 'भाऊ असे करून तुम्हाला काय फायदा झाला?' मग तो स्वत:हून मान्य करेल. तुम्हाला सम्यक् बोलता येत नाही आणि तुम्ही त्याला पाच पटीने चिडून बोलू लागले तर तो दहा पटीने चिडून बोलेल.

**प्रश्नकर्ता :** सम्यक् बोलता येत नसेल तर मग काय करायचे?

**दादाश्री :** मौन राहावे आणि पाहत राहावे की 'क्या होता है?' चित्रपटात मुलांना फेकतात तेव्हा तुम्ही काय करता? बोलायचा अधिकार सगळ्यांनाच आहे पण भांडण वाढणार नाही अशा प्रकारे बोलण्याचा अधिकार आहे. ज्या बोलण्याने भांडण वाढेल असे बोलणे म्हणजे मूर्खपणा आहे.

## रागावणे, पण अहंकारपूर्वक नसावे

**प्रश्नकर्ता :** व्यवहारात जर कोणी चूक करीत असेल तर त्याला रागावावे लागते त्यामुळे त्याला दु:ख होते, अशा वेळी कसे वागावे?

**दादाश्री :** व्यवहारात रागावावे लागते, पण ते अहंकारपूर्वक होत असते म्हणून नंतर त्याचे प्रतिक्रमण करायला हवे.

**प्रश्नकर्ता :** रागावले नाही तर तो डोक्यावरच बसेल, नाही का?

**दादाश्री :** रागावावे तर लागते, पण नीट रागावता आले पाहिजे. योग्य तऱ्हेने बोलता येत नाही, व्यवहार हाताळता येत नाही म्हणून अहंकारपूर्वक बोलले जाते. म्हणून लगेच त्याचे प्रतिक्रमण केले पाहिजे. तुम्ही समोरच्याला रागावता तेव्हा त्याला वाईट तर वाटते, पण तुम्ही त्याचे सतत प्रतिक्रमण करीत राहिले तर सहा महिन्यानंतर, बारा महिन्यानंतर तुमची वाणी अशी निघेल की त्याला गोड वाटू लागेल.

आता तर टेस्टेड वाणी बोलली पाहिजे. अनटेस्टेड वाणी बोलण्याचा तुम्हाला अधिकार नाही. तुम्ही अशा प्रकारे प्रतिक्रमण कराल तर काही जरी झाले तरी नंतर गोष्ट सरळ होईल.

## अबोला धरून तर ताण वाढतो

**प्रश्नकर्ता :** अबोला धरून गोष्ट टाळल्याने प्रश्न मिटतो का?

**दादाश्री :** नाही मिटत. तुम्हाला तो माणूस भेटेल तेव्हा 'तुम्ही कसे आहात? कसे चालले आहे?' अशी विचारपूस करावी. तो जर भडकला तर तुम्ही शांत राहून समभावाने निकाल करावा. कधी ना कधी तर प्रश्न सोडवावाच लागेल ना? अबोला धरल्याने काय प्रश्न मिटला? तो प्रश्न मिटला नाही म्हणून तर अबोला धरावा लागला. अबोला म्हणजे ओझे, जो प्रश्न लटकत पडला त्याचे ओझे. आपण त्याच्याकडे जाऊन त्याला विचारले पाहिजे की, 'जरा थांबा ना, माझे काही चुकले असेल तर मला सांगा. मी खूप वेळा चुकतो. तुम्ही तर फार हुशार आहात. शिकले-सवरलेले आहात म्हणून तुमच्याकडून चुका होणार नाहीत, पण मी अडाणी, कमी शिकलेलो म्हणून माझ्याकडून खूप चुका होतात.' असे स्वत:ला हिणवले म्हणजे तो खुश होईल.

**प्रश्नकर्ता :** असे करूनही तो नरम झाला नाही तर मग काय करावे?

**दादाश्री :** नरम पडला नाही तर आपण काय करणार? आपण तर सांगून मोकळे व्हायचे. आणखी काय करणार? कधी ना कधी तर तो नरम पडेलच. तुम्ही त्याला रागावून नरम करायला गेलात पण त्यामुळे तो काही नरम पडणार नाही. आज नरम दिसेल पण तो मनात नोंद करून ठेवेल आणि जेव्हा-केव्हा तुम्ही नरम असाल तेव्हा तो सगळा वचपा काढून घेईल. म्हणजे जग हे वैर वसूल करणारे आहे. नियम असा आहे की, लोक मनात शत्रुत्व ठेवतात. मनात सूड घेण्याचे परमाणू साठवून ठेवतात. म्हणून समोरच्याशी शत्रुत्व वाढणार नाही अशा पध्दतीने तोडगा काढावा.

## प्रकृती स्वभावानुसार ॲडजस्टमेंट...

**प्रश्नकर्ता :** आपण समोरच्याचा अबोला तोडण्यासाठी विनवले की, खरोखर माझी चूक झाली, आता कृपया मला माफ कर. असे सांगून देखील तो अधिकच रागावला तर? काय करू?

**दादाश्री :** मग तुम्ही बोलणे बंद करा. त्याला तुमचे समोपचाराचे वागणे हा तुमचा कमकुवतपणा वाटत असेल तर त्याची ती चुकीची समजूत आहे की 'बहुत नमे नादान.' अशा प्रसंगी दूर राहणेच चांगले. मग जे झाले ते बरोबर, असे समजून मोकळे व्हा. पण ज्या व्यक्ती सरळ स्वभावाच्या असतील त्यांच्या बाबतीत तरी प्रश्नांचे समाधान करा. आपल्या घरात कोण सरळ आहे आणि कोण वाकडे आहे इतके तर आपल्याला समजतेच ना?

**प्रश्नकर्ता :** समोरची व्यक्ती सरळ स्वभावाची नसेल तर आपण त्याच्याबरोबरचे व्यवहार (संबंध) तोडायचे का?

**दादाश्री :** नाही. संबंध तोडायचे नाहीत. संबंध तोडल्याने तुटत नाही. तोडल्याने तुटेल असे शक्यही नाही. म्हणून आपण मौन राहावे. कधी ना कधी तो चिडेल तेव्हा आपला हिशोब पूर्ण होईल. आपण मौन बाळगल्याने तो कधीतरी चिडेल आणि स्वतःहून म्हणेल, 'तुम्ही माझ्याशी का बोलत नाही? किती दिवसांपासून मुके बनून फिरत आहात!' तो असा चिडला म्हणजे तुमचा हिशोब पूर्ण झाला, दुसरा काही मार्ग आहे का? इथे तर वेगवेगळ्या प्रकारचे लोखंड असते, आम्ही सगळ्यांना ओळखू शकतो. काही लोखंड चांगले तापवले तेव्हा ते वाकते. काही प्रकारच्या लोखंडाना भट्टीत तापवावे लागते आणि मग एकदम गरम असतानाच दोन हातोडे मारले की ते सरळ होतात. ही तर अशी तऱ्हेतऱ्हेची लोखंडे आहेत! यात आत्मा हा आत्मा आहे, परमात्मा आहे आणि लोखंड हे लोखंड आहे. हे सर्व धातू आहेत.

## सरळ वागल्यानेही प्रश्न सुटतात

**प्रश्नकर्ता :** घरात माझे कुठल्या गोष्टीवर लक्षच राहत नसते.

घरातील लोक मला लक्ष ठेवा, लक्ष ठेवा असे म्हणत असतात, पण तरीही लक्ष राहत नाही, नसेल तर अशा वेळी काय करावे?

**दादाश्री :** काहीच नाही. घरातले जेव्हा आपल्याला 'लक्ष ठेवा, लक्ष ठेवा' असे म्हणतात तेव्हा 'हो ठेवतो' असे सांगावे. आपण लक्ष ठेवण्याचा निश्चय करावा. तरी देखील लक्ष राहिले नाही आणि घरात कुत्रा घुसला तर म्हणावे 'माझे लक्ष राहतच नाही.' म्हणजे त्यावर काही उपाय तर करावा लागेल ना? आम्हाला पण कोणी लक्ष ठेवायला सांगितले तर आम्ही लक्ष ठेवतो, तरी देखील काही झालेच तर आम्ही सांगतो, की 'भाऊ, माझ्याकडून लक्ष राहू शकले नाही.'

असे आहे की, आपण यांच्यापेक्षा वयाने मोठे आहोत असे जर मानले नाही तर मग काम होते. लहान मुलासारखी अवस्था ठेवली तर समभावाने निकाल चांगला होतो. आम्ही लहान मुलाप्रमाणे राहतो. म्हणून आम्ही जसे असेल तसे सांगून टाकतो. असेही सांगतो आणि तसेही सांगतो, जास्त मोठेपणा कशाला मिरवायचा?

ज्यांच्या जीवनात कसोटी येते ते पुण्यवान म्हटले जाते! म्हणून आग्रह न धरता समस्यांवर तोडगा काढा. तुम्ही स्वत:च तुमचा दोष सांगा. नाही तर ते जेव्हा तुमचा दोष सांगत असतील तेव्हा तुम्ही खुश व्हा की, अरे वा! तुम्हाला आमचा दोष लक्षात आला। खूप छान झाले! तुम्ही एवढे हुशार आहात हे आम्हाला माहीतच नव्हते.

## ...समोरच्याचे समाधान करा ना

आपल्यात काही चूक असेल तेव्हाच समोरचा आपल्याला सांगत असेल ना? म्हणून चुका संपवा. या जगात कुठलाही जीव कुठल्याही जीवाला त्रास देऊच शकत नाही इतके स्वतंत्र जग आहे, आणि आज जो त्रास होत आहे तो पूर्वी केलेल्या दोषांचा परिणाम आहे. म्हणून चुका संपवा म्हणजे हिशोब संपून जाईल.

कोणी 'लाल झेंडा' दाखवत असेल तर समजून जावे की, यात आपली काही चूक आहे. म्हणून आपण त्यांना विचारावे की, 'भाऊ तू

लाल झेंडा का दाखवीत आहेस?' तर तो म्हणेल, तुम्ही असे का केले होते?' तेव्हा त्याची माफी मागावी आणि म्हणावे, 'आता तरी हिरवा झेंडा दाखवशील ना?' तेव्हा तो हो म्हणेल.

आम्हाला कोणी लाल झेंडा दाखवीतच नाही. आम्ही तर सगळ्यांचे हिरवे झेंडे पाहतो नंतर पुढे चालतो. निघतेवेळी जर एखाद्याने लाल झेंडा दाखवला तर आम्ही त्याला विचारतो, 'भाऊ तू का म्हणून मला लाल झेंडा दाखवत आहेस?' तेव्हा तो सांगेल की, 'तुम्ही तर अमुक तारखेला जाणार होता मग त्याआधीच का चालला?' तेव्हा आम्ही त्याला खुलासा करून सांगतो की, अचानक हे काम निघाले म्हणून नाईलाजाने जावे लागत आहे! मग तो स्वत:च सांगेल, 'हो, मग तुम्ही नक्कीच जा, काही हरकत नाही.'

लोक तर तुझ्याच चुकांमुळेच तुला लाल झेंडा दाखवतात पण तू जर त्याचा खुलासा केलास तर लोक तुला जाऊ देतील. पण याला जर कोणी लाल झेंडा दाखवला तर हा मूर्ख बोंबाबोंब करून त्याला म्हणेल, 'जंगली, जंगली बिनअकली, तू मला लाल झेंडा का दाखवतोस?' असे करून त्याला दरडावतो. अरे, तू तर नवीन हिशोब सुरू केलास. कोणी जर लाल झेंडा दाखवत असेल तर 'देअर इज समथिंग राँग.' (तिथे नक्की काही चुकले आहे) विनाकारण कुणी लाल झेंडा दाखवत नाही.

## भांडण, दररोज कसे परवडणार?

**दादाश्री :** घरात भांडणे होतात?

**प्रश्नकर्ता :** हो

**दादाश्री :** वरवर होतात की जोरदार होतात?

**प्रश्नकर्ता :** जोरदार पण होतात, पण दुसऱ्या दिवशी विसरून जातो.

**दादाश्री :** विसरणार नाही तर काय करणार? विसरून जाल तेव्हाच पुन्हा भांडता येईल ना? आधीचेच विसरलेले नसेल तर पुन्हा

कोण भांडण करेल? मोठमोठ्या बंगल्यात राहतात, पाचच जण राहतात तरी भांडण करतात! निसर्ग खाण्या-पिण्याचे सर्व देतो तरी हे भांडत राहतात.

जिथे भांडणतंटे आहेत तिथे अंडरडेव्हलप्ड (अविकसित) प्रजा आहे. सार काढता येत नाही म्हणून भांडणे होतात.

जितके मनुष्य आहेत तितके वेगवेगळे धर्म आहेत. पण स्वतःच्या धर्माचे मंदिर कसे बांधावे? धर्म तर सगळ्यांचेच वेगळे आहेत. उपाश्रयात सामायिक करतात ती सुद्धा प्रत्येकाची वेगळी-वेगळी असते. अरे, कित्येक लोक तर मागे बसून पुढच्यांना खडे मारीत असतात, ती पण त्यांची सामायिकच करतात ना? यात धर्मही राहिलेला नाही आणि मर्मही उरलेला नाही. फक्त धर्म जरी राहिला असता तरी घरात भांडणे झाली नसती. झाले तर महिन्यातून एखाद्या वेळीच झाले असते. अमावास्या महिन्यातून एकदाच येते ना!

**प्रश्नकर्ता :** हो.

**दादाश्री :** इथे तर तीसही दिवस अमावास्या. भांडण करण्यात काय मिळत असेल?

**प्रश्नकर्ता :** फक्त नुकसानच होते.

**दादाश्री :** तोटा होणारा व्यापार तर कुणी करतच नाही ना? कोणीच म्हणणार नाही की, तोटा होणारा धंदा करा! काहीतरी नफा मिळवतच असतील ना?

**प्रश्नकर्ता :** भांडणातून आनंद मिळत असेल!

**दादाश्री :** हा दूषमकाळ आहे म्हणून शांती राहत नाही, पोळलेला मनुष्य जेव्हा दुसऱ्याला पोळतो तेव्हाच त्याला शांती वाटते. कोणी आनंदात असेल ते त्याला आवडत नाही, म्हणून तिथे जाऊन काडी लावतो तेव्हाच त्याला शांती वाटते. असा जगाचा स्वभावच आहे! प्राण्यांमध्ये सुद्धा विवेक असतो, ते भांडत नाहीत. कुत्रे सुद्धा आपल्या

परिसरातील कुत्र्यांशी भांडत नाहीत. जेव्हा बाहेरचा कुत्रा त्यांच्या परिसरात येतो तेव्हा ते सगळे मिळून त्याच्याशी भांडतात. तेव्हा ही मूर्ख माणसे तर आपापसातच लढतात. लोक अगदी विवेकशून्य झाले आहेत!

## 'भांडणमुक्त' होण्यासारखे

**प्रश्नकर्ता :** मला भांडायचे नसेल, मी कधीच भांडत नाही तरीदेखील घरची माणसे समोरून भांडण उभे करत असतील, तर अशा परिस्थितीत काय करावे?

**दादाश्री :** तुम्ही 'भांडणमुक्त' व्हायला हवे. भांडणमुक्त व्हाल तर संसारात टिकू शकाल. आम्ही तुम्हाला भांडणमुक्त बनवून देऊ. भांडण करणारा सुद्धा कंटाळून जाईल, असे आपले स्वरूप असायला हवे. जगात कोणीच आपल्याला डिप्रेस करू शकणार नाही असे आपण बनायला हवे. आपण भांडणमुक्त झाल्यावर काही त्रासच नाही ना? लोकांना भांडायचे असेल, शिव्या द्यायच्या असतील तरीही हरकत नाही. आणि तरी निर्लज्ज म्हटले जाणार नाही, उलट त्यामुळे जागृती खूप वाढेल.

## वैर बीज हेच भांडणाचे कारण

पूर्वी जी भांडणे झाली आहेत त्याच्यामुळे शत्रुत्व धरले जाते आणि तेच आज भांडणाच्या रूपात चुकते केले जाते. भांडण होते त्याचवेळी शत्रुत्वाचे बीज पडते, ते मग पुढच्या जन्मी उगवते.

**प्रश्नकर्ता :** मग ते बीज कशाप्रकारे नष्ट करता येईल?

**दादाश्री :** हळूहळू समताभावाने निकाल करत राहिलात तर नष्ट होईल. खूप खोलवर बीज पडले असेल तर वेळ लागेल. धीर धरावा लागतो. तुमचे कुणी काही घेऊन जात नाही. दोन टाईम खायला मिळते, कपडे मिळतात, मग आणखी काय हवे?

जरी तुम्हाला घरात ठेवून बाहेरुन कुलूप लावून गेले पण तुम्हाला दोन वेळेचे जेवण मिळत आहे की नाही एवढेच बघायचे. तुम्हाला घरात

कोंडून गेले तरी काही हरकत नाही, तुम्ही निवांत झोपा. मागील जन्मी असे काही वैर बांधले गेले की ज्यामुळे आपल्याला घरात कुलूप लावून कोंडून ठेवतात,! वैर आणि तेसुद्धा अज्ञानतेने बांधले गेलेले वैर! समजपूर्वक असेल तर आपण समजू शकू की हे समजपूर्वक आहे, म्हणून मार्ग निघू शकेल. पण जर समजपूर्वक नसेल तर मार्ग कसा निघू शकेल? तेव्हा ती गोष्ट तिथेच थांबवायची.

## ज्ञानामुळे वैर भावनेचे बीज नष्ट होते

आता आपण सगळे वैरभाव सोडून द्यावे. तुम्ही कधीतरी आमच्याकडून 'स्वरूपज्ञान' प्राप्त करून घ्या. म्हणजे मग सारे वैर भाव मिटतील. अगदी याच जन्मात सगळे वैरभाव सोडून द्यायचे, आम्ही तुम्हाला मार्ग दाखवू. संसाराला कंटाळून लोक मरणाच्या वाट्याला का जातात? या बाह्य संकटांना तोंड देवू शकत नाहीत म्हणून. हे सर्व समजावे तर लागेल ना? कुठपर्यंत ताण-तणावाखाली पडून राहाल? हे तर किड्यामुंग्यांसारखे जीवन झालेले आहे. नुसती तडफड, तडफड! मनुष्यजन्मात आल्यावर तडफड का म्हणून? जो ब्रह्मांडाचा मालक म्हटला जातो त्याची ही अशी दैन्यदशा! संपूर्ण जग तडफडत तरी आहे किंवा मूर्छित अवस्थेत तरी आहे. जगात या दोनच गोष्टी आहेत आणि तू ज्ञानघन आत्मा झालास म्हणजे यातून सुटलास.

## जसा अभिप्राय तसा परिणाम

**प्रश्नकर्ता :** ढोल वाजत असेल तर काही लोकांना चीड का येते?

**दादाश्री :** कारण 'मला हे आवडत नाही' असे त्याने मानले आहे. ढोल वाजतेवेळी तुम्ही म्हणावे, 'वाह! ढोल किती छान वाजतो आहे!!!' असे म्हटले तर त्रास होणार नाही. 'ढोलाचा आवाज वाईट आहे' असा अभिप्राय दिला की आतून सारी यंत्रणा बिघडून जाते. तेव्हा आपण नाटकीय भाषेत म्हणावे की, खूप छान ढोल वाजवला.' म्हणजे मग त्रास होत नाही.

हे 'आत्मज्ञान' मिळाल्यामुळे आता आपण सगळी 'पेमेंट' चुकवू

शकतो. कठीण परिस्थितीत हे ज्ञान खूप हितकारी आहे, ज्ञानाची 'टेस्टिंग' होऊन जाते. ज्ञानाची रोज प्रॅक्टिस करायला गेलो तर त्याच्याने काही टेस्टिंग होत नाही. पण एकदा का कठीण प्रसंग आला तेव्हा मात्र टेस्टेड होऊन जाते!

## ही सद्‌विचारणा, किती छान

आम्हाला तर एवढे माहीत आहे की, जर भांडण केल्यानंतर 'बायकोशी' सगळे संबंध तोडायचे असतील तर गोष्ट वेगळी आहे, पण बायकोशी परत बोलायचे असेल तर मग मधली सर्व भाषा पूर्णपणे चुकीची आहे. आमच्या हे लक्षातच असते की, दोन तासानंतर पुन्हा बोलायचे आहे, म्हणून आम्ही किटकिट करत नाही. तुम्हाला जर तुमचे मत कायम ठेवायचे असेल तर गोष्ट वेगळी. तुमचे मत बदलणार नसेल तर मग तुम्ही जे केले ते बरोबर आहे. पुन्हा तिच्याबरोबर बसणारच नसाल तर ठीक आहे. परंतु उद्या परत तिच्यासोबत बसून जेवायचे असेल तर मग काल केलेल्या नाटकाचे काय? हा विचार करायला नको का? हे लोक तीळ भाजून पेरतात म्हणून केलेली सगळी मेहनत वाया जाते. भांडण होते तेव्हा हे लक्षात यायला हवे की, ही कर्मेच आपल्याला नाचवतात. मग या नाचावर ज्ञानाचा उपयोग करून इलाज केला पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** दादा, हे तर भांडण करणाऱ्या दोघांनाही समजायला हवे ना?

**दादाश्री :** नाही, इथे तर 'सब सब की संभालो' तुम्ही फक्त तुमचे पाहायचे. तुम्ही सुधारलात म्हणजे समोरचा आपोआप सुधारेल. ही तर सद्‌विचारणा आहे की काही वेळानंतर पुन्हा सोबतच बसायचे आहे मग भांडण कशासाठी? लग्न केले आहे तर मग भांडणे का? तुम्ही काल काय झाले ते विसरता, पण आम्हाला तर 'ज्ञानात' सर्व हजरच असते. ही तर एक सद्‌विचारणा आहे म्हणून ज्याने आत्मज्ञान घेतले नसेल त्यालाही हे उपयोगी पडेल. अज्ञानामुळे वाटते की बायको डोक्यावर बसेल. आम्हाला कोणी विचारले तर आम्ही सांगू की, 'तू

पण भोवरा आहेस आणि ती पण भोवरा आहे, मग ती डोक्यावर कशी बसेल? ते काय तिच्या हातात आहे?' ते तर 'व्यवस्थित शक्तीच्या' ताब्यात आहे. आणि ती कुठे तुमच्या डोक्यावर चढून बसणार आहे? तुम्ही जर नमते घेतले तर तिच्याही मनाला समाधान वाटेल की आता माझा नवरा माझ्या ताब्यात आहे! तिलाही बरे वाटेल.

## संशय, भांडणाचे एक कारण

घरात बहुतांशी भांडणे संशयावरून होत असतात. हे कसे आहे की, शंकेमुळे स्पंदने निर्माण होतात आणि या स्पंदनांमुळे स्फोट होतो. आणि जर नि:शंक राहिलात तर स्फोट आपोआप शांत होईल. नवरा-बायको दोघेही जर संशयी असतील तर मग स्फोट कसा विझेल? एकाला तरी नि:शंक व्हावेच लागेल. आई-वडिलांच्या भांडणामुळे मुलांचे संस्कार बिघडतात. मुलांवर वाईट संस्कार पडू नयेत यासाठी दोघांनी घरात समजदारीने वागले पाहिजे. हा संशय कोण दूर करेल? आपले ज्ञान तर मनुष्याला संपूर्ण नि:शंक बनवेल असे आहे! आत्म्याच्या अनंत शक्ती आहेत!!

## अशा वाणीला निभावून घ्या

हा टीपॉय पायाला लागला तर आपण त्याला दोष देत नाही, पण कोणी दुसऱ्याने मारले तर मात्र आपण त्याला गुन्हेगार मानतो. कुत्रा चावत नसेल फक्त भुंकतच असेल तर आपण त्याला चालवून घेतो ना! मग माणूस देखील हात न उगारता नुसता भुंकत असेल तर आपण ते निभावून घ्यायला नको का? भुंकणे म्हणजे बोलणे, 'टू स्पीक,' आणि 'बार्क' म्हणजे भुंकणे. 'माझी बायको सतत भुंकत असते' असे म्हणतात ना? हे वकीलसुद्धा कोर्टात भुंकत असतात ना? आणि न्यायाधीश त्या दोघांचे भुंकणे ऐकत असतात! वकील तर निर्लेपतेने भुंकतात ना? कोर्टात समोरासमोर 'तुम्ही असे आहात, तुम्ही तसे आहात, माझ्या अशिलावर तुम्ही खोटे आरोप करत आहात' असे भुंकत असतात. त्यांना पाहून आपल्याला असे वाटते की, हे दोघे बाहेर जाऊन मारामारीच

करतील, पण बाहेर आल्यानंतर पाहिले तर दोघेही सोबत बसून आरामात चहा पीत असतात!

**प्रश्नकर्ता :** याला 'ड्रॅमॅटिक' (नाटकी) भांडण म्हणायचे का?

**दादाश्री :** नाही याला पोपटमस्ती म्हणतात. ड्रॅमॅटिक तर ज्ञानी पुरुषाशिवाय कुणालाही जमणार नाही. पोपट मस्ती करतात तेव्हा आपल्याला भीती वाटते की, आता हे दोघेही मरतील, पण ते काही मरत नाहीत. ते फक्त वरवर चोच मारत राहतात, कोणाला इजा होणार नाही अशी चोच मारतात.

आम्ही वाणीला रेकॉर्ड म्हटले आहे ना? रेकॉर्ड वाजत असेल की 'चंदुला अक्कल नाही, चंदुला अक्कल नाही.' तेव्हा तुम्ही पण म्हणू लागा की 'चंदुला अक्कल नाही.'

## ममतेचे वेढे उलगडावे कसे?

दिवसभर काम करत असतानाही नवऱ्याचे प्रतिक्रमण करीत राहावे. असे केल्याने एका दिवसात सहा महिन्यांचे वैर संपेल आणि अर्धा दिवस केले तर तीन महिन्यांचे तरी कमी होईल! लग्नापूर्वी नवऱ्यावर ममता होती का? नाही. मग ममता कधीपासून जडली. लग्नाच्या वेळी मंडपात समोरासमोर बसले तेव्हा आता माझा नवरा आला, असे तिने ठरवले. थोडे जाड आहेत, थोडे सावळे आहेत. आणि त्याचवेळी नवऱ्यानेही ठाम ठरवले की ही माझी बायको आहे. तेव्हापासून हे चक्र सुरू झाले. 'माझे, माझे' असा जो पीळ मारला तो पीळ मग वाढतच गेला आता. ही पंधरा वर्षांची फिल्म उलट कशी फिरवायची? तर 'हे माझे नाहीत, हे माझे नाहीत' असे म्हणत राहिले तर हा पीळ सुटत जाईल आणि ममता कमी होत जाईल. हे तर लग्न झाल्यापासून असे अभिप्राय तयार झाले, प्रेज्युडीस (पूर्वग्रह) धरले गेले की 'हे असेच आहेत, हे तसेच आहेत.' लग्नापूर्वी असे काही होते का? आता तुम्ही मनात पक्के करा की, 'जे आहे ते हे असेच आहे.' आपणच त्यांना पसंत केलेले आहे. आता काय नवरा बदलता येईल?

## सगळीकडेच फसवणूक! कुठे जावे?

ज्यावर उपाय नाही त्याला काय म्हणाल? ज्यावर उपाय नाही त्यासाठी रडारड करायची नसते. हा संसार अनिवार्य आहे! घरात बायकोचा भांडखोर स्वभाव आवडत नसेल, मोठ्या भावाचा स्वभाव आवडत नसेल, दुसरीकडे वडिलांचा स्वभाव पसंत नसेल, अशा टोळीत माणूस अडकला असेल तरी पण त्याला तिथेच राहावे लागते. जाणार तरी कुठे? अशा अडचणीचा कंटाळा येतो, पण जाणार कुठे? चारही बाजूंनी कुंपण आहे. समाजाच्या मर्यादा असतात, 'समाज मला काय म्हणेल? सरकारच्याही मर्यादा असतात. जर कंटाळून जलसमाधी घ्यायला जुहूच्या समुद्र किनाऱ्यावर गेलो तर पोलीसवाला पकडतो. 'अरे बाबा, मला आत्महत्या करू दे, निवांतपणे मरू दे!' तेव्हा तो म्हणेल 'नाही. मरू पण देणार नाही. तू इथे आत्महत्या करण्याचा प्रयत्न केलास, हा गुन्हा आहे म्हणून आम्ही तुला तुरुंगात टाकणार आहोत!' धड जगूही देत नाहीत आणि धड मरूही देत नाहीत, यालाच म्हणतात संसार! म्हणून रहा ना आरामात...शांतपणे झोपाना! असे हे अनिवार्य जग! मरूही देत नाही आणि जगूही देत नाही.

कसेही करून, ॲडजस्ट होऊन, वेळ निभावून घ्या, म्हणजे उधारी चुकती होईल. कुणाचे पंचवीस वर्षाचे, कुणाचे पंधरा वर्षांचे, कुणाचे तीस वर्षाचे, नाईलाजाने का होईना कर्ज चुकवावेच लागते. इच्छा नसेल तरीही त्याच खोलीत एकत्र रहावे लागते. इथे भाऊसाहेबांचे अंथरूण आणि तिथे बाईसाहेबांचे अंथरूण! बाईसाहेब तोंड फिरवून झोपल्या तरी मनात भाऊसाहेबांचेच विचार चालू असतात ना! सुटकाच नाही. हे जगच असे आहे. आणि त्यातही फक्त नवऱ्यालाच बायको आवडत नाही असे नाही, तर बायकोलाही नवरा आवडत नसतो! म्हणून यात सुख घेण्यासारखे नाहीच.

विचारवंत माणसाला तर संसाराची झंझट आवडणारच नाही. जे विचारवंत नाहीत त्यांना तर संसार म्हणजे एक झंझटच आहे हे समजत नाही. जसे एखाद्या बहिऱ्या माणसासमोर आपण कितीही खाजगी गोष्टी

केल्या तर त्यात काही अडचण आहे का? तसेच आत सुद्धा बहिरेपणा असतो. म्हणून त्यांना संसारातील अडचणी चालून जातात. पण लोक तर संसारात सुख शोधू पाहतात, यात काय सुख मिळत असेल का?

## खोटेपणा कुठपर्यंत झाकाल?!

हे सगळे जग नकली आहे! घरात भांडून रडून, आणि मग पाण्याने तोंड धुवून माणसे घराबाहेर पडतात!! आपण त्यांना विचारले, 'कसे आहात चंदुभाऊ?' तेव्हा तो म्हणेल, 'खूप मजेत आहे.' अरे तुझ्या डोळ्यात तर अश्रू आहेत. तोंड धुवून आला असेल तरी डोळे तर लाल दिसतात ना? त्यापेक्षा सरळ सांग की, 'मी सध्या दु:खात आहे.' सगळ्यांना असेच वाटते की दुसऱ्यांना काही दु:खच नाही फक्त मलाच दु:ख आहे. पण नाही रे बाबा! सगळेच रडत आहेत. प्रत्येक जण घरी रडून मग तोंड धुवून घराबाहेर पडत आहेत. हे पण एक मोठे आश्चर्यच आहे ना! तोंड धुवून का घराबाहेर पडता? तोंड धुतल्याशिवाय निघा तर लोकांना कळेल की संसारात किती सुख आहे?! मी रडत बाहेर पडलो, तुम्ही रडत बाहेर पडलात, सगळेच रडत रडत बाहेर पडले म्हणजे समजेल की हे जग पोकळ आहे. लहान वयात वडील वारले म्हणून सर्व स्मशानभुमीत रडत रडत गेलेत! घरी आल्यावर अंघोळ केली मग काहीच नाही!! अंघोळ करायचे लोकांनी शिकवले, अंघोळ वैगैरे करून सर्व स्वच्छ करून घेतात! असे हे जग आहे! सगळेच तोंड धुवून बाहेर पडलेले, सगळे पक्के खोटारडे आहेत. त्यापेक्षा खरे बोललात तर ते अधिक चांगले.

आपल्या महात्म्यांमधून एखादाच मोकळेपणाने सांगतो की, 'दादा आज तर मला बायकोने मारले!' एवढा सरळपणा कुठून आला? तर आपल्या ज्ञानामुळे आला. दादांना तर सगळ्या गोष्टी सांगू शकतो. अशी सरळता आली तेव्हापासूनच मोक्षाला जाण्याची तयारी झाली. अशी सरळता बघायला मिळत नाही ना? मोक्षाला जाण्यासाठी सरळ व्हायचीच आवश्यकता आहे. नवरा तर बाहेर छे, छे असे काहीच नाही, असे म्हणतो. बायकोचा मार खातो आणि बाहेर सांगतो, छे, छे, ती तर

मुलीला मारत होती! अरे पण मी स्वतः तुला मार खाताना पाहिले ना? याचा काय अर्थ? मिनिंगलेस. त्याऐवजी खरे-खरे सांगून टाक की! आत्म्याला थोडेच कुणी मारणार आहे? आपण आत्मा आहोत, मारेल तर शरीराला मारेल. आत्म्याचा तर कुणी अपमानही करू शकणार नाही. कारण ती 'आपल्याला' (आत्म्याला) बघू शकली तरच अपमान करेल ना? बघितल्याशिवाय कसा अपमान करेल? या देहाला तर म्हैस सुद्धा मारते. तेव्हा तुम्ही सांगताच ना की, या म्हशीने मला मारले? म्हशीपेक्षा बायको मोठी नाही का? मग त्यात काय? त्यात कुठे अब्रू जाणार आहे? मुळात अब्रू आहेच कुठे? या जगात किती जीव राहतात? कोणी कपडे घातले का? अब्रूदार कपडे घालतच नाही. ज्याला अब्रू नाही तेच कपडे घालून अब्रू झाकत फिरतात, (कपडे) फाटले तर शिवत बसतात. कोणी बघितले तर, कोणी बघितले तर! अरे, शिवून-शिवून किती दिवस अब्रू झाकशील? शिवलेली अब्रू टिकत नाही. अब्रू तर जिथे निती आहे, प्रामाणिकता आहे, दयाभाव आहे, जिव्हाळा आहे, परोपकारी स्वभाव आहे तिथे आहे.

## फसवणूक अशी वाढत गेली

या भाजी आणि भाकरीसाठी लग्न केले. नवऱ्याला वाटते की मी पैसे कमावून आणीन पण स्वयंपाक कोण बनवील? बायकोला वाटते की मी स्वयंपाक बनवीन पण पैसे कोण कमावेल? असा विचार करून दोघांनी लग्न केले आणि सहकारी मंडळ उभे केले. नंतर मुलेही होणार. दुधीभोपळ्याचे एक बी पेरले मग त्यावर दुधीभोपळे येणार की नाहीत? वेलीच्या पानापानांवर दुधीभोपळे येतील. अशाप्रकारे ही माणसेदेखील दुधीभोपळ्यासारखी उगवत राहतात. दुधीभोपळ्याची वेल असे म्हणत नाही की हे माझे दुधीभोपळे आहेत. फक्त ही मनुष्य जातच असे बोलते की, ही माझी मुले आहेत. हा बुद्धीचा दुरुपयोग केला, मनुष्य जाती बुद्धीवर अवलंबून राहिली म्हणून निराश्रित म्हटली गेली. इतर कुठलाही जीव बुद्धीवर अवलंबून नाही. म्हणून त्यांना आश्रित म्हणतात. आश्रितांना दुःख नसते. यांनाच (मनुष्यजातीलाच) सगळे दुःख असते!

माणसे विकल्पी सुखाच्या मागे धावतात. पण जेव्हा बायको भांडण करते तेव्हा या सुखाविषयी कळते की हा संसार उपभोगण्यासारखा नाही. पण हा तर लगेच मूर्छित होऊन जातो! मोहामुळे एवढ्या प्रचंड प्रमाणत मार खातो त्याचेही त्याला भान राहत नाही.

बायको रुसलेली असते तोपर्यंत 'या अल्लाह परवर दिगार' करतो (देवाची आठवण काढतो). आणि बायको परत बोलू लागली की मियाँभाई खुश! मग अल्लाह वगैरे सगळे एका बाजूला! किती कटकटी!! असे कधी दुःख दूर होते का? तू थोडा वेळ अल्लाहजवळ बसला म्हणून काय दुःख संपते? जितका वेळ तिथे बसशील तितका वेळ आतील आग शांत होईल. पण मग तिथून उठलास की आग परत सुरू! निरंतर प्रकट अग्नी आहे, घटकाभर पण सुख मिळत नाही! जोपर्यंत शुद्धात्मा स्वरूप प्राप्त होत नाही, स्वतःच्या दृष्टीत 'मी शुद्ध स्वरूप' आहे, असे भान होत नाही तोपर्यंत ही शेगडी पेटलेलीच राहणार. मुलीच्या लग्नाच्यावेळी देखील आत आग चालूच असते! सतत संतापच असतो! संसार म्हणजे काय? तर जाळे. या शरीराचा विळखा देखील एक जाळेच आहे. जाळे कोणाला आवडेल का? पण जाळे आवडते हेही एक आश्चर्यच म्हटले आहे ना! माशांचे जाळे वेगळे आणि हे जाळे वेगळे! माशांच्या जाळ्याला तर कापून बाहेर निघता येते. पण यातून निघताच येत नाही. थेट तिरडी निघते तेव्हाच बाहेर पडता येते!

## ...त्याला तर दुरून नमस्कार

यात सुख नाही असे समजावे तर लागेल ना? नवरा अपमान करतो, बायको अपमान करते, मुले अपमान करतात! हा तर सगळा नाटकीय व्यवहार आहे, पण शेवटी यांच्यातील कोणी सोबत थोडेच येणार आहेत?

तुम्ही स्वतः शुद्धात्मा आहात आणि हा सगळा व्यवहार तुम्हाला वरवरचा म्हणजे सुपरफ्लुअस करायचा आहे. स्वतः 'होम डिपार्टमेंट' मध्ये (शुद्धात्म्यात) राहायचे आणि फॉरेन डिपार्टमेंट मध्ये सुपरफ्लुअस

राहायचे. सुपरफ्लुअस म्हणजे कुठेही तन्मयाकार वृत्ती नाही. फक्त नाटकीय. फक्त हे नाटकच साकारायचे आहे. नाटकात नुकसान झाले तरी हसायचे आणि फायदा झाला तरीही हसायचे. नाटकात देखावा पण करावा लागतो. नुकसान झाले असल्यास तसे हावभाव पण करावे लागतात! तोंडाने बोलायचे की खूप नुकसान झाले पण आतून तन्मयाकार व्हायचे नाही. आपण लटकता सलाम (दुरून नमस्कार) करायचा. बरेच जण सांगतात ना की, 'भाऊ, माझा तर याच्याशी दुरून नमस्काराचा संबंध आहे!' अशाच प्रकारे संपूर्ण जगाशी राहावे. ज्याला साऱ्या जगाशी दुरून नमस्कार करणे जमले तो ज्ञानीच झाला. या देहालाही दुरून नमस्कार! आम्ही निरंतर सगळ्यांशी दुरून नमस्काराचाच संबंध ठेवत असतो. तरीही सगळे म्हणतात की आमच्यावर आपला खूप चांगला भाव आहे. मी सगळाच व्यवहार करतो पण आत्म्यात राहून.

**प्रश्नकर्ता :** कित्येकदा घरात खूप मोठे भांडण होते. तर अशा वेळी काय करावे?

**दादाश्री :** शहाणा माणूस असेल तर लाख रुपये दिले तरी तो भांडण करणार नाही! आणि इथे तर फुकट भांडण करतो, मग तो अडाणी नाही तर काय? महावीर भगवंताना कर्म संपवण्यासाठी साठ मैल चालून दूर अनार्य क्षेत्रात जावे लागले, आणि आत्ताचे लोक तर पुण्यवान, म्हणून त्यांना घर बसल्या अनार्य क्षेत्र उपलब्ध आहे! केवढे हे धन्य भाग्य! कर्म संपविण्यासाठी तर हे खूपच लाभदायक आहे, पण सरळ राहिला तर!

## गुन्हा एका तासाचा, दंड आयुष्यभराचा

एक तास नोकराला, मुलाला किंवा बायकोला छळले असेल तर ती व्यक्ती पुढच्या जन्मी तुम्हाला नवऱ्याच्या रूपात किंवा सासूच्या रूपात आयुष्यभर त्रास देत राहील! न्याय तर हवा की नको? हे भोगावेच लागेल. तुम्ही कुणाला दु:ख दिले तर तुम्हाला आयुष्यभर दु:ख मिळेल. फक्त एक तास जरी छळले तरी त्याचे फळ आयुष्यभर मिळेल. मग तुम्ही उगाचच तक्रार करत असता की 'माझी बायको माझ्याशी अशी

का वागते?' आणि बायकोला ही असे वाटते की, 'माझ्याकडून असे का वागले जाते?' तिला पण वाईट वाटते, पण काय करणार? मग मी त्यांना विचारले 'तुम्ही बायकोला पसंत केले होते की बायकोने तुम्हाला पसंत करून आणले होते?' तेव्हा ते म्हणाले, 'मी बायकोला पसंत करून आणले होते.' मग त्या बिचारीचा काय दोष? तुम्हीच तिला घेऊन आलात आणि आता ती तुमच्या अपेक्षेनुसार निघाली नाही, त्याला ती तरी काय करणार? ती कुठे जाणार? काही बायका तर नवऱ्याला मारतात देखील. पतिव्रता स्त्रीला तर पत्नी पतीला मारते हे ऐकूनच पाप लागल्यागत वाटते.

**प्रश्नकर्ता :** जो पुरुष मार खातो त्याला बायल्या म्हणायचे का?

**दादाश्री :** असे आहे, मार खाणे म्हणजे काही पुरुषाची निर्बळता नाही पण त्याचे ऋणानुबंधच तसे असतात. बायको दुःख देण्यासाठीच भेटलेली असते, म्हणून ती हिशोब चुकते करणारच.

## वेडा अहंकार, तर भांडण-तंटे करवितो

संसार व्यवहारात भांडण-तंट्याचे नावच काढायचे नाही, तो एक रोग आहे. भांडणे हा अहंकार आहे, उघड-उघड अहंकार आहे. त्यास वेडा अहंकार म्हणतात. त्या वेड्या अहंकारामुळे असे वाटते की माझ्याशिवाय चालणार नाही. कुणाला रागावल्यामुळे तर उलट आपल्याला ओझे वाटते, डोकेच दुखायला लागते. भांडायची कुणाला हौस असते का?

घरात जर कोणी विचारले, सल्ला मागितला तरच उत्तर द्यावे. विचारल्याशिवाय सल्ला देत राहणे याला भगवंताने अहंकार म्हटले आहे. नवऱ्याने जर विचारले, 'हे ग्लास कुठे ठेवू' तर बायको म्हणेल की 'इथे ठेवा.' मग तुम्ही ते ग्लास तिथे ठेवा. त्याऐवजी नवरा म्हणेल 'तुला अक्कल नाही का? कुठेतरीच काय ठेवायला सांगतेस?' त्यावर मग बायको म्हणेल, 'मग चालवा तुमची अक्कल आणि ठेवा तुम्हाला हवे तिथे.' आता या गोष्टी कधी संपतील? हा संयोगांचा संघर्ष आहे! म्हणून हे भोवरे उठता-बसता खाता-पिताना एकमेकांवर सारखे आदळतच

असतात! भोवरे आदळतात, खरचटतात आणि कधी कधी त्यातून रक्तही निघते!! इथे तर (शारीरिक नाही पण) मानसिक रक्त निघणार ना! अंगातून रक्त निघत असेल तर ते उलट चांगले, पट्टी बांधली म्हणजे थांबते. पण या मानसिक जखमांवर कोणती पट्टी पण लावता येत नाही!

## अशी भाषा कधीच उच्चारू नये

घरात कोणाला काही सांगणे हा अहंकाराचा सर्वात मोठा रोग आहे. सगळे जण आपापला हिशोब घेऊनच आलेले आहेत! प्रत्येकालाच आपआपली दाढी येतच असते, आपल्याला सांगावे लागत नाही की तू का दाढी उगवत नाहीस? ती तर त्याला येतेच. सगळे जण स्वतःच्या डोळ्याने पाहतात, कानाने ऐकतात, मग विनाकारण आपण दुसऱ्यांच्या व्यवहारात ढवळाढवळ करण्याची काय गरज आहे? एक अक्षरही बोलू नका. म्हणूनच आम्ही तुम्हाला हे 'व्यवस्थित शक्ती'चे ज्ञान देत असतो. अव्यवस्थित कधीच घडत नाही. जे अव्यवस्थित वाटते ते सुद्धा व्यवस्थितच आहे. म्हणून हे समजून घेण्याची गरज आहे. जर कधी पतंगाने गटांगळ्या खाल्ल्या तर दोरा ओढायचा. दोरा आता आपल्या हातात आहे. ज्याच्या हातात दोरा नाही त्याची पतंग गटांगळ्या मारेलच, तो मग काय करणार? पतंगाची दोरीच हातात नाही आणि विनाकारण आरडाओरडा करतो की माझ्या पतंगाने गटांगळ्या खाल्ल्या!

घरी एक अक्षरही बोलू नका. 'ज्ञानी' व्यक्तीखेरीज कोणी एक शब्दही बोलू नये. कारण ज्ञानीची वाणी कशी असते? तर परेच्छानुसार असते. दुसऱ्यांच्या इच्छेनुसार ते बोलतात. त्यांना का बोलावे लागते? तर दुसऱ्यांची इच्छा पूर्ण करण्यासाठी ते बोलतात. पण इतर जण जेव्हा बोलतात तेव्हा ऐकणारे अस्वस्थ होतात, भयंकर पाप लागते. इतरांनी मुळीच बोलू नये. थोडे जरी बोलले तरी ती कटकट म्हटली जाते. बोलणे असे असावे की ते सतत ऐकावेसे वाटेल. रागावले तरी ते ऐकायला गोड वाटेल. इथे मात्र तुम्ही थोडे जरी बोलायला सुरुवात केली तर लगेच मुले म्हणतात 'काका आता बस, पुरे तुमची कटकट. विनाकारण ढवळाढवळ करू नका.' रागावणे केव्हा योग्य? पूर्वग्रह

नसेल तेव्हा. पूर्वग्रह म्हणजे मनात पूर्वीच आठवण असतेच की काल हा असा वागला होता, भांडला होता, हा तर असाच आहे. घरात जो भांडतो त्याला भगवंताने मूर्ख म्हटले आहे. कोणाला दु:ख जरी दिले तरीही ती नरकात जाण्याची निशाणी आहे.

## संसार निभावण्याचे संस्कार-कुठे?

मानव जात सोडली तर इतर कोणीही नवरेपणा गाजवत नाही. अरे, हल्ली तर घटस्फोट देखील घेतात ना? वकिलाला सांगतो 'तुला हजार ,दोन हजार रुपये देतो, पण मला घटस्फोट मिळवून दे.' मग वकीलही म्हणेल, 'हो देतो मिळवून' अरे, तू स्वत:च घे ना घटस्फोट, दुसऱ्यांना का घटस्फोट मिळवून देतोस?

जुन्या काळातील एका म्हाताऱ्या आजीची ही गोष्ट आहे ती नवऱ्याची तेरवी करत होती. 'तुझ्या काकांना हे आवडत असे, ते आवडत असे.' असे करत-करत त्या पाटावर वस्तू मांडत होत्या. मी त्यांना म्हणालो, 'काकी! तुम्ही तर काकांशी रोज भांडायच्या. काका पण तुम्हाला पुष्कळदा मारायचे. मग हे आता कशाला?' त्यावर काकी म्हणाल्या, 'पण तुझ्या काकांसारखा नवरा मला पुन्हा मिळणार नाही.' हे आपले हिंदुस्तानी संस्कार!

नवरा कोणाला म्हणतात? संसार निभावून नेतो त्याला. बायको कोणाला म्हणायचे? घर-नाती निभावून नेते तिला. जे संसार उध्वस्त करतात त्यांना आपण नवरा किंवा बायको कसे म्हणू शकतो? ते त्यांचे गुणधर्म (कर्तव्य)च विसरलेत असे म्हणावे लागेल. बायकोचा राग आला म्हणून तुम्ही पाण्याचा माठ फेकायचा का? काही जण तर कप-बशा फोडून टाकतात आणि मग पुन्हा नवीन आणतात. अरे, नवीनच आणायचे होते मग फोडलेत कशाला? रागाने आंधळे होतात आणि हित-अहित याची शुद्धच विसरतात.

हे लोक तर नवरे बनून बसलेत. अरे, नवरा असा असला पाहिजे की बायकोला दिवसभर नवऱ्याकडेच बघत राहावेसे वाटेल.

**प्रश्नकर्ता :** लग्नापूर्वी खूप पाहत असते.

**दादाश्री :** तेव्हा तर ती जाळे टाकत असते. माशाला वाटते हा खूप चांगला आणि दयाळू माणूस आहे. माझी खूप काळजी घेईल. पण एक वेळा जाळे चावून तर पाहा, काटा घुसेल. हे सगळे सापळे आहेत!

## यात प्रेम कुठे उरले?

कुटुंबांबरोबर चांगले चालले आहे असे कधी म्हणता येईल तर जेव्हा त्यांना तुमच्याबद्दल प्रेम वाटेल, तुमच्याशिवाय करमणार नाही, तुम्ही कधी येणार, कधी येणार? असेच त्यांना वाटत राहते.

लोक लग्न करतात पण त्यांच्यात प्रेम नाही. ही तर केवळ विषयासक्ती आहे. प्रेम असेल तर दोघांमध्ये कितीही विरोधाभास (मतभेद) असले तरी प्रेम कमी होत नाही. जिथे प्रेम नाही, तिथे केवळ आसक्ती म्हटली जाईल. आसक्ती म्हणजे संडास! पूर्वी इतके प्रेम असायचे की नवरा परदेशी गेला आणि परत आला नाही तरी आयुष्यभर बायकोचे संपूर्ण चित्त नवऱ्यातच असायचे. दुसऱ्या कोणाची आठवणच यायची नाही. आणि आता तर नवरा दोन वर्ष आला नाही तर दुसरा नवरा करतील! याला काय प्रेम म्हणायचे? हे तर संडास आहे, जसे संडास बदलतात तसे! जे गलन आहे त्याला संडास म्हणतात. प्रेमात तर सर्वस्व अर्पण केले जाते.

प्रेम म्हणजे संपूर्ण दिवस त्यांचीच आठवण आणि त्यांचीच ओढ. लग्नाचा परिणाम दोन प्रकारे होतो. कधी-कधी पूर्ण भरभराट, तर कधी-कधी पूर्ण सत्यानाश होतो. जे प्रेम जास्त उफाळते ते नंतर संपून जाते. जे उफाळते ती आसक्ती आहे. म्हणून जिथे जास्त प्रेमाचा दिखावा असेल त्यापासून दूर राहा. ओढ तर आतून असायला हवी. बाहेरचे खोके (शरीर) खराब झाले, सडले तरीही प्रेम जसेच्या तसेच राहते. इथे तर हात भाजला असेल आणि नवऱ्याला म्हटले की जरा धुवून देता का? तर नवरा म्हणेल 'नाही, मला बघवत नाही.' अरे, इतके दिवस तर हात कुरवाळत होतास आणि आज काय झाले? ही घृणा कशी

चालेल? जिथे प्रेम आहे तिथे तिरस्कार नाही आणि जिथे तिरस्कार आहे तिथे प्रेम नाही. संसारी प्रेम असे हवे की जे एकदम वाढत पण नाही आणि कमी पण होत नाही. नॉर्मालिटीत असले पाहिजे. ज्ञानींचे प्रेम कधीही कमी-जास्त होत नाही. ते प्रेम तर निराळेच असते, त्यास परमात्म प्रेम म्हणतात.

## नॉर्मालिटी, शिकण्यासारखी

**प्रश्नकर्ता :** व्यवहारात 'नॉर्मालिटी' कशी ओळखायची?

**दादाश्री :** सगळेजण तुला म्हणत असतील की, 'तू उशीरा उठतेस, उशीरा उठतेस.' तर तुला हे समजायला नको की आपली 'नॉर्मालिटी' तुटली आहे. रात्री अडीच वाजता उठून तू चकरा मारू लागलीस तर सगळेजण म्हणणारच ना की, 'इतक्या लवकर कशाला उठलीस?' इथे पण 'नॉर्मालिटी' तुटली असे समजून घे. नॉर्मालिटी सगळ्यांना अॅडजस्ट होईल अशी असावी. खाण्यातही नॉर्मालिटी पाहिजे, जर जास्त खाल्ले तर झोप येत राहते. आमची खाण्याची, पिण्याची अशी सगळीच नॉर्मालिटी पाहा. झोपण्याची, उठण्याची अशी आमची सगळीच नॉर्मालिटी असते. आम्ही जेवायला बसलो आणि मागाहून कोणी ताटात मिठाई वाढली तर मी त्यातली थोडीशी मिठाई घेतो पण मग भाजी थोडी कमी करतो. म्हणजे जेवणाचे प्रमाण बदलत नाही. तुम्हाला इतके सर्व करण्याची गरज नाही. तुम्ही उशिरा उठत असाल तर बोलत रहा की माझ्याकडून 'नॉर्मालिटीत' राहिले जात नाही. म्हणजे तुम्ही स्वत:ला सांगत राहिले पाहिजे की, 'मला लवकर उठायला हवे.' असे सांगितल्याने फायदा होईल. यालाच पुरुषार्थ म्हटले आहे. रात्री झोपताना सतत बोलत राहा की 'उद्या लवकर उठायचे आहे, उद्या लवकर उठायचे आहे.' याचा फायदा होईल. पण जबरदस्तीने उठायचा प्रयत्न केलात तर मात्र खूप त्रास होईल.

## शक्ती किती कमी झाल्या

**प्रश्नकर्ता :** 'पती हाच परमेश्वर आहे' असे म्हणणे चुकीचे आहे का?

**दादाश्री :** आजकालच्या नवऱ्यांना परमेश्वर मानले तर ते वेडे होतील!

एक नवरा त्याच्या बायकोला म्हणाला, 'तुझ्या डोक्यावर निखारे ठेव आणि त्याच्यावर भाकरी भाज!' अगोदरच माकड आणि त्याला दारू पाजली तर त्याची काय दशा होईल?

पुरुष तर कसा असतो? पुरुष असा तेजस्वी असतो की, हजारो स्त्रिया त्याच्यापुढे थरथरतील! त्याला पाहता क्षणीच थरथरतील! आजकालचे पुरुष असे आहेत की त्यांच्या बायकोचा हात कोणी पकडला तर त्याला विनंती करतात, 'अरे सोड, सोड माझी बायको आहे, माझी बायको आहे.' अरे गाढवा तू त्याला विनंती करतोस? किती मूर्ख आहेस तू? त्याला मार, त्याचा गळा पकड, चाव त्याला. त्याच्या पाया का पडतोस? आपणहून सोडेल असा तो माणूस नाही. मग हा 'पोलिस, पोलिस, वाचवा, वाचवा' असे ओरडतो. अरे तू नवरा असून पोलिसाला कशाला बोलावतोस? तू जिवंत आहसे की मेला आहेस? पोलिसाचीच मदत घ्यायची असेल तर तू नवरा होऊच नकोस.

घरचा मालक 'हाफ राऊंड' चालतच नाही. तो तर 'ऑल राऊंडच' पाहिजे. त्याला कलम, कडछी, बरछी, तरवू, तांतरवू आणि तस्करवू (लिहिणे-वाचणे, स्वयंपाक करणे, प्रसंगी शस्त्र चालवणे, पोहता येणे, वाद-विवाद संभाषण करता येणे, चोरी करणे). या सहाही कला अवगत पाहिजेत. ज्याला या सहा गोष्टी येत नाहीत तो पुरुष नाही. कितीही निर्लज्ज माणूस समोर आला तर त्याच्याशी कसे वागावे ते जमले पाहिजे. डोके शांत ठेवून, चिडून चालणार नाही.

ज्याचा स्वत:वर विश्वास आहे त्याला या जगात सर्व काही मिळू शकेल. पण हा विश्वासच नाही ना! कित्येकांचा तर, 'आपली बायको आपल्याबरोबर राहील की नाही? हा विश्वासही उडून गेलेला असतो. पाच वर्षे तरी निभावेल की नाही?' असे वाटत असते. 'अरे इतकाही विश्वास नाही? विश्वास तुटला म्हणजे संपले. विश्वासात अनंत शक्ती

आहे. अज्ञानतेत का होईना पण विश्वास हवाच. 'माझे कसे होईल' असे वाटले म्हणजे संपले! या काळात लोक फारच गोंधळलेले आहेत. कोणी धावत–धावत आला आणि त्याला तुम्ही विचारले की तुझे नाव काय आहे? तर तो एकदम गांगरून जाईल.

## चुकांमुळेच चुका करणारे भेटतात

**प्रश्नकर्ता :** मी बायकोबरोबर ॲडजस्ट होण्याचा खूपच प्रयत्न करतो पण मला ॲडजस्ट होता येतच नाही.

**दादाश्री :** सगळे हिशोबानुसार आहे! वाकड्या पेचासाठी वाकडा नट असतो. तिथे नट सरळ फिरवून कसे चालेल? तुम्हाला वाटते की या स्त्रिया अशा का असतात? पण त्या तर तुमच्या काउंटरवेट असतात. जितके तुम्ही वाकडे तितक्या त्या वाकडया. म्हणून तर सगळे 'व्यवस्थित' आहे असे म्हटले ना?

**प्रश्नकर्ता :** सगळेच आम्हाला सरळ करण्यासाठीच आले आहेत असेच वाटते.

**दादाश्री :** तुम्हाला सरळ करायलाच हवे. सरळ झाल्याशिवाय हे जग चालणारच नाही ना? सरळ झाला नाहीस तर बाप कसा बनू शकेल सरळ झालास तर बाप बनायला योग्य.

## शक्ती विकसित करणारे हवेत

म्हणजेच या स्त्रियांचा दोष नाही, स्त्रिया तर देवी समान आहेत. स्त्री आणि पुरुष दोघांमध्ये आत्माच आहे, फक्त देहाचा फरक आहे. 'डिफरन्स ऑफ पॅकिंग!' स्त्री हा एक प्रकारचा इफेक्ट आहे, परिणाम आहे, म्हणून आत्म्यावर स्त्रीचा परिणाम होतो. पण त्याचा परिणाम आपल्यावर होऊ देऊ नये. तसे झाले की बरोबर. स्त्री तर शक्ती आहे. या देशात अनेक स्त्रिया राजनीतीत मोठमोठ्या पदावर पोहोचल्या आहेत. आणि ज्या स्त्रीने धर्मक्षेत्रात प्रवेश केला ती तर कशी (शक्तीमान) असेल?! या क्षेत्रातून तर ती साऱ्या जगाचे कल्याण करू शकते. स्त्रीमध्ये

जगाचे कल्याण करण्याचे सामर्थ्य आहे. तिच्यात स्वत:च्या कल्याणाबरोबर दुसऱ्याचेही कल्याण करण्याची शक्ती आहे.

## प्रतिक्रमणाने सगळे हिशोब मिटतील

**प्रश्नकर्ता :** कित्येक जण स्त्रियांना कंटाळून घर सोडतात हे योग्य आहे का?

**दादाश्री :** नाही. पळून जाण्यात काय अर्थ आहे? आपण परमात्मा आहोत. आपल्याला पळपुटे व्हायची काय गरज? आपण तिचा समभावाने निकाल करावा.

**प्रश्नकर्ता :** निकाल तर करायचा आहे पण कसा करावा? हे सर्व मागील जन्माच्या कर्मामुळे घडत आहे, असा मनात भाव ठेवायचा का?

**दादाश्री :** फक्त एवढ्यानेच भागणार नाही. निकाल म्हणजे समोरच्याला फोन पोहोचला पाहिजे, त्याच्या आत्म्यापर्यंत तुमची भावना पोहोचली पाहिजे. त्या आत्म्याजवळ आपण चूक केली आहे असे कबूल केले पाहिजे. म्हणजेच त्यासाठी मोठे प्रतिक्रमण केले पाहिजे.

**प्रश्नकर्ता :** समोरच्या माणसाने आपला अपमान केला तरीदेखील आपण त्याचे प्रतिक्रमण करायचे?

**दादाश्री :** त्याने अपमान केला तरच प्रतिक्रमण करायचे, तुम्हाला तो मान देतो तेव्हा करायचे नाही. प्रतिक्रमण केलेत तर तुम्हाला समोरच्यावर द्वेषभाव होणारच नाही. एवढेच नाही तर त्याच्यावर तुमचा चांगला प्रभाव पडेल. तुमच्यावर द्वेषभाव होणार नाही ही तर पहिली स्टेप समजायची, पण नंतर तुमची भावनाही त्याच्यापर्यंत पोहोचते.

**प्रश्नकर्ता :** त्याच्या आत्म्यापर्यंत पोहोचते?

**दादाश्री :** हो, निश्चितच पोहोचते. नंतर तो आत्मा त्याच्या पुद्‌गलला पण सांगतो की, 'भाऊ, तुझा फोन आला आहे.' आपले जे प्रतिक्रमण आहे ते अतिक्रमणासाठी आहे, क्रमणासाठी (सामान्य व्यवहारासाठी) नाही.

**प्रश्नकर्ता :** त्यासाठी बरीच प्रतिक्रमणे करावी लागतील का?

**दादाश्री :** जेवढ्या स्पीडमध्ये आपल्याला घर बांधायचे आहे त्यानुसार मजूर वाढवावे लागतील. असे आहे, की या बाहेरच्या लोकांचे प्रतिक्रमण नाही झाले तरी चालेल, पण आपल्या आसपास आणि आपल्या सोबत राहणाऱ्यांची, घरच्या लोकांची जास्त प्रतिक्रमणे करावीत. कुटुंबातील लोकांसाठी भावना करावी की माझ्याबरोबर जन्म घेतला आहे, माझ्यासोबत राहत आहेत, ते पण कधीतरी या मोक्षमार्गावर येवोत.

## ...तेव्हा संसाराचा अस्त होईल

ज्याला ॲडजस्ट होण्याची कला जमली तो संसाराकडून मोक्षाकडे वळला. ॲडजस्टमेंट करता आली, त्याचेच नाव ज्ञान. जो ॲडजस्टमेंट शिकला तो (भवसागरातून) तरून गेला. जे भोगायचे आहे ते तर भोगावेच लागेल पण ॲडजस्टमेंट करता आली तर त्याला त्रास होत नाही, आणि हिशोब संपत जातात. सरळ माणसाबरोबर कुणीही ॲडजस्ट होईल पण वाकड्या-कठीण-कडक प्रकृतीच्या माणसाबरोबर, सगळ्यांबरोबरच ॲडजस्ट होणे जमले तर काम फत्ते झाले समजा. मुख्य गोष्ट ॲडजस्टमेंट आहे. 'हो' म्हटल्याने मुक्ती आहे. आणि आपण 'हो' जरी म्हटले तरीही 'व्यवस्थित'च्या बाहेर काही होणार आहे का? पण 'नाही' म्हटले की मग त्रासच त्रास!

घरात नवरा-बायको दोघांनी निश्चय केला की मला ॲडजस्ट व्हायचे आहे. तर दोघांचेही प्रश्न सुटतील. एकाने जास्त ताणले तर दुसऱ्याने ॲडजस्ट व्हायचे, तर प्रश्न सुटेल. एका व्यक्तीचा हात दुखत होता, त्याने दुसऱ्या कोणाला सांगितले नाही. त्याने स्वतःच्याच दुसऱ्या हाताने हात चेपून, दुसऱ्या हाताने ॲडजस्ट केले! असे ॲडजस्ट होता आले तर समस्या सुटतील. मतभेदाने समस्या सुटत नाही. मतभेद पसंत नसतील, तरी पण होतातच ना? समोरचा जास्त ओढाताण करीत असेल तर तुम्ही आग्रह सोडून द्या आणि पांघरूण घेवून झोपून जा. जर सोडले नाही आणि दोघेही आपल्या मतासाठी भांडतच बसाल तर दोघांनाही झोप लागणार नाही आणि रात्रभर त्रास होत राहील. व्यवहारात,

व्यापारात, भागीदारीत आपण सांभाळून घेतोच ना! मग या संसाराच्या भागीदारीत सांभाळायला नको का? संसार म्हणजे भांडणाचे संग्रहस्थान आहे. कुणाकडे दोन आण्याची कुणाकडे चार आण्याची आणि कुणाकडे सव्वा रुपयापर्यंतही (मर्यादे पलीकडे) भांडणे होतात!

इथे घरात 'ॲडजस्ट' होता येत नाही आणि आत्मज्ञानाचे शास्त्र वाचत बसतात! अरे, ठेवा ते सर्व बाजूला, प्रथम हे शिका. घरात तर ॲडजस्ट होता येत नाही. असे आहे हे जग! म्हणून मोक्षाचे काम करून घेण्यासारखे आहे.

## 'ज्ञानी' सोडवतात संसार जाळ्यातून

**प्रश्नकर्ता :** या संसाराच्या वहीखात्यात सर्वत्र तोटाच दिसतो. तरीदेखील कधी कधी नफा आहे असे का वाटते?

**दादाश्री :** ज्या खात्यात तोटा आहे असे वाटते, तिथे जर कधी नफा दिसला तर ते वजा करून टाका. हा संसार इतर कुठल्याच गोष्टीतून उत्पन्न झालेला नाही, गुणाकारानेच झालेला आहे. मी तुम्हाला जी रक्कम दाखवतो त्याच्याने तुम्ही भागाकार कराल तर काहीच शिल्लक उरणार नाही. हे शिकता आले तर शिका, नाही तर 'मला दादांच्या आज्ञांचे पालन करायचेच आहे, संसाराचा भागाकार करायचाच आहे.' असे ठरवले तेव्हापासून भागाकार झालाच समजा!

नाही तर हे जीवन व्यतीत करणे सुद्धा खूप कठीण झाले आहे. नवरा येईल आणि म्हणेल, 'माझ्या छातीत दुखत आहे.' मुले येतील आणि म्हणतील 'आम्ही नापास झालो.' नवऱ्याच्या छातीत दुखत आहे असे ऐकल्यावर तिच्या मनात विचार येईल की, नवऱ्याचे 'हार्टफेल' झाले तर काय होईल? असे विचार माणसाला चारीबाजूंनी घेरतात, चैनच पडू देत नाहीत.

ज्ञानी पुरुष या संसारच्या जाळ्यापासून सुटण्याचा मार्ग दाखवितात, मोक्षाचा मार्ग दाखवितात. रस्ता चुकला तर परत रस्त्यावर आणतात. मग आपल्यालाही जाणीव होते की, आपण या सर्व संकटातून मुक्त झालो!

## अशा भावनेने सोडवणारे मिळतातच

ही सगळी परसत्ता आहे. खातो, पितो, मुलांची लग्ने लावतो या सगळ्या गोष्टी परसत्तेत आहेत. त्यात आपली सत्ता नाही. आत जे कषाय (क्रोध, मान, माया, लोभ) दडले आहेत, त्यांची सत्ता आहे. ज्ञानी पुरुष 'मी कोण आहे?' याचे ज्ञान देतात तेव्हा या कषायांतून, या सर्व जंजाळातून सुटका होते. हा संसार सोडल्याने किंवा धक्का मारल्याने सुटेल असा नाही. त्यामुळे या संसारातून सुटलो तर खूप बरे होईल अशी भावना मनात बाळगत राहा. अनंत जन्मांपासून सुटण्याची भावना निर्माण झाली पण मार्ग दाखविणारा कोणी जाणकार हवा की नको? मार्ग दाखविणारे 'ज्ञानी पुरुष' हवेत.

जशी चिकटपट्टी जर शरीरावर चिकटवली आणि मग ती ओढली तरी ती सहज निघत नाही. तिच्याबरोबर अंगावरचे केस पण ओढले जातात. तसाच हा संसारसुद्धा चिकट आहे. 'ज्ञानी पुरुष' औषध देतील तेव्हाच संसार सुटू शकेल. हा संसार सोडला तर सुटेल असा नाही. ज्यांनी संसार सोडला आहे, त्याग केला आहे ती त्यांच्या कर्माच्या उदयामुळे घडून आलेली गोष्ट आहे. प्रत्येकाला आपापल्या कर्माच्या आधारावर त्यागधर्म किंवा गृहस्थधर्म मिळत असतो. समकित प्राप्त होते तेव्हापासून सिद्धदशा प्राप्त होते.

हे सर्व तुम्ही चालवत नाही. क्रोध, मान, माया. लोभ, कषायच हे सगळे काही चालवतात. कषायांचेच राज्य आहे! 'मी कोण आहे' याचे जेव्हा भान येते तेव्हा कषाय निघून जातात. क्रोध झाल्यावर पश्चाताप होतो पण जोपर्यंत भगवंतांनी सांगितल्याप्रमाणे प्रतिक्रमण करता येत नाही तोपर्यंत काही उपयोग नाही. प्रतिक्रमण करता आले तर सुटका होईल.

हे कषाय घटकाभर देखील चैन पडू देत नाहीत. मुलाच्या लग्नाच्यावेळी तुम्ही मोहाने घेरलेले असता! तेव्हा मोहात मूर्छित असतात, एरवी मात्र दिवसभर उकळत्या चहासारखी बैचेन अवस्था असते या

माणसांची. तरीही मनात वाटते की, 'मी' तर थोरली जाऊ आहे ना! पण हा तर व्यवहार आहे, फक्त नाटकच करायचे आहे. हा देह सुटला म्हणजे (पुढच्या जन्मी) दुसऱ्या नाटकातील भूमिका निभावायची आहे. ही नाती खरी नाहीत. हे तर संसारी ऋणानुबंध आहेत. हिशोब संपल्यावर मुलगा आई-वडिलांबरोबर जात नाही.

'ह्याने माझा अपमान केला!' अरे, बाबा सोड ना आता. अपमान तर गिळून टाकण्यासारखे आहे. नवरा अपमान करतो तेव्हा लक्षात यायला हवे की हा तर माझ्या कर्माचे उदय आहे. यात नवरा मात्र निमित्तच आहे, निर्दोष आहे. जेव्हा माझ्या कर्माचा उदय बदलतो तेव्हा तोच नवरा मला 'ये,ये' असे म्हणतो. म्हणून मनात समताभाव ठेवून प्रश्न सोडवत राहिले पाहिजे. जर असे मनात आले की 'माझा काहीच दोष नसताना नवरा मला असे का म्हणाला?' मग रात्री तीन-चार तास जागरण होईल आणि मग थकून झोप लागेल.

जे भगवंताचे *उपरी* (वरिष्ठ) झाले, त्यांचे काम झाले. आणि जे बायकोचे *उपरी* झाले (बायकोवर हुकुमत गाजवत बसले) ते मार खाऊन मेले. *उपरी* बनायला गेले ते मार खात गेले. पण भगवंत काय म्हणतात? माझे *उपरी* बनलात तर मला आवडेल. मी खूप दिवस *उपरी*पणा केला, आता तुम्ही माझे *उपरी* झालेत तर उत्तम.

'ज्ञानी पुरुष' जी समज देतात त्या समजेमुळे मुक्ती मिळते. समजेशिवाय काहीच होऊ शकत नाही. वीतराग धर्मच सर्व दुःखांपासून मुक्ती देतो.

घरात सुंदर व्यवहार करता आलाच पाहिजे. बायकोला मनापासून असे वाटले पाहिजे की, असा चांगला नवरा पुन्हा कधीच मिळणार नाही. आणि नवऱ्यालाही असे वाटले पाहिजे की अशी बायकोही कधीच मिळणार नाही!! असा सुंदर हिशोब जुळवून आणला तर समजावे की आपण खरे!!!



# [ 6 ]
# व्यापार, धर्मासकट

## आयुष्य कशासाठी खर्च झाले?

**दादाश्री :** हा व्यापार तुम्ही कशासाठी करता?

**प्रश्नकर्ता :** पैसे कमावण्यासाठी.

**दादाश्री :** पैसे कशासाठी कमावता?

**प्रश्नकर्ता :** माहीत नाही.

**दादाश्री :** ही कशासारखी गोष्ट आहे? एक मनुष्य दिवसभर इंजिनच चालवित राहतो, पण कशासाठी हे? माहीतच नाही. इंजिनला पट्टाच जोडलेला नाही, फक्त फिरवतच राहतो. तर हे असे आहे. जीवन कशासाठी जगायचे असते? फक्त पैसे कमावण्यासाठी? प्रत्येक जीव सुख शोधत असतो. सर्व दु:खांपासून मुक्ती कशी मिळेल हे जाणून घेण्यासाठीच जीवन जगायचे आहे.

## विचार करा, चिंता नाही

**प्रश्नकर्ता :** धंद्याची खूप काळजी वाटते, खूपच अडचणी येतात.

**दादाश्री :** काळजी वाटायची सुरुवात झाली की समजायचे आपले कार्य बिघडणार आहे. जास्त काळजी वाटत नसेल तर समजायचे की कार्य बिघडणार नाही. चिंता-काळजी कार्याला अवरोधक (अडचणकारक)

आहे. चिंतेमुळे धंद्याचे मरण ओढावेल. ज्यात चढ-उतार होतात त्यालाच धंदा म्हणतात. हे *पूरण-गलन* आहे. पुरण झालेले गलन झाल्याशिवाय राहणारच नाही. या *पूरण-गलनात* आपली काहीच संपत्ती नाही, आणि जी आपली संपत्ती आहे त्यातून काहीच *पूरण-गलन* होत नाही! इतका चोख व्यवहार आहे!! हे तुमच्या घरात तुमची बायको-मुले सगळेच तुमचे भागीदार आहेत ना?

**प्रश्नकर्ता :** सुख-दु:खात तर भागीदार आहेत.

**दादाश्री :** तुम्ही तुमच्या बायको-मुलांचे पालक म्हटले जातात. फक्त पालकानेच का म्हणून काळजी करावी? आणि घरची माणसे तर उलट तुम्हाला म्हणतात ना की, आमची काळजी करू नका.

**प्रश्नकर्ता :** चिंतेचे स्वरूप काय आहे? जन्माला आलो तेव्हा तर चिंता नव्हती, मग आता आली कुठून?

**दादाश्री :** जसजशी बुद्धी वाढते तसतसा संतापही वाढत जातो. जन्मले तेव्हा बुद्धी होती का? व्यापार-धंद्यासाठी विचार करण्याची गरज आहे. पण त्यापुढे गेलात तर सगळे बिघडते. व्यापार-धंद्यासाठी दहा-पंधरा मिनिटे विचार करणे ठीक आहे पण त्यापुढे जाऊन सतत विचार चक्र चालूच राहिले तर ते नॉर्मालिटीच्या बाहेर गेले म्हटले जाईल. तेव्हा मग विचार करणे बंद करा. धंद्याचे विचार तर येतील, पण त्या विचारात तन्मयाकार झालात तर त्या विचारांचे ध्यान उत्पन्न होईल आणि त्यामुळे काळजी सुरू होईल. ती मग प्रचंड नुकसान करते.

## कर्जफेडीच्या बाबतीत दानत साफ ठेवा

**प्रश्नकर्ता :** व्यापारात खूप तोटा झाला आहे तर काय करू? व्यापार बंद करू की दुसरा व्यवसाय करू? कर्ज खूप झाले आहे.

**दादाश्री :** कापसाच्या व्यापारातील नुकसान भरपाई किराणा दुकान टाकून निघत नाही. व्यापारातील झालेल्या नुकसानाची भरपाई व्यपारातूनच भरून निघते. नोकरीतून होत नाही. कॉन्ट्रॅक्ट व्यवसायातील नुकसान

पानाच्या टपरीमधून भरून निघेल का? ज्या बाजारात नुकसान झाले त्याच बाजारातून नुकसान भरून निघेल. तिथेच त्याचे औषध असते.

आपण मनात कायम एकच भाव निश्चित करावा की आपल्याकडून कोणत्याही जीवाला किंचितमात्रही दुःख होता कामा नये. संपूर्ण कर्ज फेडले जावे, असा आपला शुद्ध भाव असावा. तुमची दानत साफ असेल तर उशीरा का होई ना संपूर्ण कर्ज फेडू शकाल. लक्ष्मी म्हणजे अकरावा प्राण आहे. म्हणून कुणाचीही लक्ष्मी आपल्याजवळ राहता कामा नये. आपली लक्ष्मी कुणाजवळ राहिली तर हरकत नाही. पण कायम एकच ध्येय ठेवले पाहिजे की मला कर्जाची एक-एक पै चुकती करायचीच आहे. ध्येय लक्षात ठेवूनच खेळ खेळा. खेळ खेळा पण खेळाडू बनू नका. खेळाडू झालात तर तुम्ही संपलेच समजा!

## ...जोखीम ओळखून निर्भय राहावे

प्रत्येक धंद्यात उदय-अस्त (चढ-उतार) असतातच. खूप डास असले तरी रात्रभर झोपू देत नाहीत आणि फक्त दोनच असले तरी रात्रभर झोपू देणार नाहीत! म्हणून तुम्ही म्हणा, 'हे डासमय दुनिया! दोनच, जर झोपू देत नाहीत तर मग सगळेच एकदम या ना.' हा नफा-तोटा हा पण डासांसारखाच आहे.

नियम कसा ठेवावा? समुद्रात शक्यतो उतरायचे नाही! पण उतरायची वेळ आलीच तर घाबरायचे नाही. जोपर्यंत तुम्ही निर्भय, तोपर्यंत अल्लाह तुमच्याजवळ. तुम्ही जर घाबरलात तर अल्लाह म्हणेल, जा त्या अवलियाकडे! देवासाठी तर रेसकोर्स आणि कपड्याचे दुकान दोन्हीही सारखेच. पण तुम्हाला मोक्षाला जायचे असेल तर या जोखिमेत पडूच नका. या समुद्रात प्रवेश केल्यानंतर तिथून बाहेर पडणेच उत्तम.

आम्ही व्यापार कशा पद्धतीने करतो हे माहित आहे का? व्यापाराची बोट समुद्रात सोडताना आधी पूजाविधी करून मग बोटीच्या कानात सांगतो, 'तुला जेव्हा बुडायचे असेल तेव्हा बुड, पण तू बुडावी अशी माझी इच्छा नाही.' मग सहा महिन्यात बुडो की दोन वर्षात बुडो.

तेव्हा आम्ही ॲडजस्टमेंट  करून घेतो. चला सहा महिने तरी टिकली! व्यापार म्हणजे हे टोक किंवा ते टोक. आशेचा महाल निराशा दिल्याशिवाय राहत नाही. संसारात वीतराग राहणे खूप कठीण आहे. पण आमची ज्ञानकला आणि बुद्धीकला जबरदस्त असते त्यामुळे संसारात वीतराग राहता येते.

## ग्राहकांचे पण नियम आहेत

**प्रश्नकर्ता :** दुकानात जास्त ग्राहक येवोत म्हणून मी दुकान लवकर उघडतो आणि उशीरा बंद करतो, हे बरोबर आहे ना?

**दादाश्री :** ग्राहकांना आकर्षित करणारे तुम्ही कोण? लोक ज्या टाईमाला दुकान उघडत असतील त्याच टाईमाला तुम्ही पण उघडा. लोक सात वाजता उघडतात आणि तुम्ही साडे नऊ वाजता उघडलेत तर तेही चुकीचे म्हटले जाईल. लोक जेव्हा दुकान बंद करतात तेव्हा तुम्हीही बंद करून घरी जावे. व्यवहार काय सांगतो की, लोक काय करतात ते तुम्ही पाहा. लोक झोपतात त्यावेळी तुम्ही पण झोपा. रात्री दोन वाजेपर्यंत धुमाकूळ घालता, ही कशासारखी गोष्ट आहे! जेवल्यानंतर विचार करता का की हे कसे पचेल? त्याचे फळ सकाळी मिळूनच जाते ना? तसेच व्यापाराचे सुद्धा आहे.

**प्रश्नकर्ता :** दादा, सध्या दुकानात बिलकूल ग्राहक नसतात, मग मी काय करू?

**दादाश्री :** ही लाइट गेली तर, 'लाइट केव्हा येईल, केव्हा येईल' असे केल्याने ती लवकर येते का? तेव्हा तुम्ही काय करता?

**प्रश्नकर्ता :** एक-दोन वेळा फोन करतो किंवा स्वत: सांगायला जातो.

**दादाश्री :** शंभर वेळा फोन करता का?

**प्रश्नकर्ता :** नाही.

**दादाश्री :** आताच ही लाइट गेली तेव्हा आपण आरामशीर गात होतो आणि मग ती आपोआपच आली ना?

**प्रश्नकर्ता :** म्हणजे आपण नि:स्पृह व्हायला हवे का?

**दादाश्री :** नि:स्पृह होणे हाही गुन्हा आहे आणि सस्पृह होणे हाही गुन्हा आहे. 'लाइट आली तर चांगले होईल' एवढा भाव ठेवावा. सस्पृह-निस्पृह राहण्याचे सांगितले आहे. 'ग्राहक आले तर बरे होईल' असा भाव मनात बाळगा. पण विनाकारण उपद्व्याप करू नका. रेग्युलॅरिटी असावी, आणि भाव बिघडवू नये हा रिलेटिव्ह पुरुषार्थ आहे. गिऱ्हाईक आले नाहीत तरी व्याकूल व्हायचे नाही आणि एखाद्या दिवशी गिऱ्हाईकांच्या झुंडी आल्या तरी सगळ्यांचे समाधान होईल असे त्यांच्याशी वागा. इथे तर एखाद्या दिवशी गिऱ्हाईक आले नाही तर लगेच शेठजी नोकरावर खेकसतात! नोकराच्या जागी तुम्ही असाल तर तुम्हाला कसे वाटेल? तो बिचारा नोकरी करायला येतो आणि तुम्ही त्याच्यावर सतत खेकसतच राहिलात तर नोकर असल्याकारणाने तो सहन तर करेल पण मनात वैर बांधेल. नोकराला रागावू नका. तो पण माणूसच आहे. त्याला घरी पण दु:खे आणि इथेही तुम्ही शेठ असल्यामुळे दडपणात ठेवाल, तर बिचारा कुठे जाईल? त्या बिचाऱ्यावर थोडा तरी दयाभाव ठेवा.

ग्राहक आला तर शांतपणे आणि प्रेमाने त्याला माल द्या. दुकानात ग्राहक नसतील तेव्हा देवाचे नाव घेत राहा. पण तुम्ही तर सारखे इकडे-तिकडे डोकावून कोणी येत आहे का तेच पाहत राहता. मनातल्या मनात व्याकूल होता, 'आजचा दिवस तोट्यात गेला. आजचा सगळा खर्च अंगावर येईल.' असे विचारचक्र चालू ठेवता. स्वत:ही चिडता आणि नोकरावरही रागावता. असे आर्तध्यान आणि रौद्रध्यान करत राहता! जे कोणी गिऱ्हाईक येतात ते 'व्यवस्थित शक्ती'च्या हिशोबाने येणार असतात तेच येतात. त्यामुळे त्यात ढवळाढवळ करू नका. दुकानात गिऱ्हाईक आले तर देणेघेणे करायचे पण कषाय करू नका. त्यांच्याशी सौजन्याने व्यवहार करावा. दगडाखाली हात अडकला असेल तर आपण दगडावर हातोडा मारतो का? नाही ना? उलट तिथून तर हळूच हात काढून घेतो. त्यात कषायाचा वापर केला तर वैर बांधले जाईल, आणि एका वैरामधून अनंत वैर निर्माण होतील. या वैरामुळेच हे जग उभे झाले आहे, हेच मूळ कारण आहे.

## प्रामाणिकता, देवाचे लायसन्स

**प्रश्नकर्ता :** आजकाल प्रामाणिकपणे धंदा करायला गेलो तर जास्त अडचणी येतात, असे का?

**दादाश्री :** प्रामाणिकपणे काम केले तर एकच अडचण येईल, पण अप्रामाणिकपणे काम कराल तर दोन प्रकारच्या अडचणी येतील. प्रामाणिकपणाच्या अडचणीतून सुटता येईल परंतु अप्रामाणिकपणाच्या अडचणीतून सुटका करून घेणे अवघड आहे. प्रामाणिकपणा म्हणजे परमेश्वराचे मोठे लायसन्स आहे, त्याच्यावर कोणीच आरोप करू शकत नाही. तुम्हाला हे लायसन्स फाडून टाकावेसे वाटते का?

## ...नफा-तोट्यात, हर्ष-शोक कशासाठी?

व्यापार मन बिघडवून केलात तरी नफा 66,616 रुपयेच होणार आणि मन न बिघडवता केलात तरीही 66,616 रुपयेच होणार, मग कुठला व्यापार करावा?

आमचे मोठमोठे व्यापार चालतात पण व्यापाराचे पत्र 'आमच्या' वर येत नाही. कारण व्यापारातील नफा आणि व्यापारातील तोटा हे आम्ही व्यापारातच ठेवतो. जर मी नोकरी केली असती तर मला जो पगार मिळाला असता तेवढाच पैसा मी घरी घेऊन जातो. उरलेला नफाही व्यापाराचा आणि तोटाही व्यापाराच्याच.

पैशांचे ओझे ठेवण्यासारखे नाही. बँकेत जमा झाले की आनंद, गेले की दुःख, या जगात काहीच हुश्श... करून बसण्यासारखे नाही. कारण सगळे टेम्पररी (तात्पुरते) आहे.

## व्यापारात हिताहित

कोणता व्यापार चांगला? तर ज्या व्यापारात हिंसा नसेल असा व्यापार चांगला, कुणालाही आपल्या व्यापारामुळे दुःख होत नसेल. धान्याचा व्यापार असेल तर धान्य मोजताना मापातून थोडे काढून घेतात. हल्ली तर भेसळ करायचे शिकले आहेत. त्यातही जे खाण्याच्या वस्तूंमध्ये

भेसळ करतात ते तिर्यंच (जनावर) गतीत चार पायात जातील. चार पाय असले म्हणजे पडणार तर नाहीत ना? व्यापारात धर्म असू द्या, नाही तर अधर्म शिरेल.

**प्रश्नकर्ता :** व्यापार किती वाढवावा?

**दादाश्री :** व्यापार इतका करावा की रात्री शांतपणे झोपू शकाल. आपल्याला जेव्हा बदलायचा असेल तेव्हा बदलू शकू. स्वत:हून उपाधीला आमंत्रण देऊ नये.

## व्याज घेण्यात काही हरकत?

**प्रश्नकर्ता :** शास्त्रात व्याज घेण्यास मनाई केलेली नाही ना?

**दादाश्री :** आपल्या शास्त्रात व्याज घेण्यास हरकत घेतलेली नाही. पण व्याजखाऊ होणे हानिकारक आहे. समोरच्याला दु:ख होत नाही तोपर्यंत व्याज घेण्यास हरकत नाही.

## काटकसर तर नोबल असावी

घरात काटकसर कशी असावी? बाहेरून खराब दिसणार नाही अशी काटकसर असावी. स्वयंपाकघरात काटकसर घुसता कामा नये. काटकसरीत उदारपणा असावा. स्वयंपाकघरात काटकसर घुसली तर मनोभाव बिघडतात. मग कोणी पाहुणे आले तरी भाव बिघडतील की तांदूळ वापरले जातील! एखादा खूप उधळा असेल तर आम्ही त्याला 'नोबल' काटकसर करण्यास सांगतो.



## [ 7 ]
# वरिष्ठांचा व्यवहार

## अंडरहॅन्डचे तर रक्षण करावे

**प्रश्नकर्ता :** दादा, शेठजी माझ्याकडून खूप काम करून घेतात, पगार खूप कमी देतात, आणि सतत दटावताततही.

**दादाश्री :** हे हिंदुस्तानातील शेठजी तर पत्नीला देखील धोका देतात. पण शेवटी जेव्हा अंत्ययात्रा निघते तेव्हा तर स्वतःच धोका खातात. हे हिंदुस्तानातील शेठ लोक नोकरांना पिळून काढतात, धड दोन घास खाऊ पण देत नाहीत, नोकरीच्या पगारातून सुद्धा काटछाट करतात. इन्कमटॅक्सवाले पैसे कापून घेतात तेव्हा तिथे सरळ होतात, पण आजकाल तर इन्कमटॅक्सवाल्यांचेही हे लोक कापून घेतात! (कर भरत नाहीत.)

जगात सर्व अंडरहॅन्ड (हाताखालची माणसे, नोकर)ला धमकावत असतात. अरे, साहेबांना धमकावून दाखव ना, ते जमले तर तुझा खरा विजय! जगाचा व्यवहारच हा असा आहे. पण भगवंताने तर एकच व्यवहार सांगितला होता की, तुमच्या हाताखाली जी पण माणसे आहेत त्यांचे रक्षण करा. आणि ज्यांनी रक्षण केले ते देव बनलेत. मी लहानपणापासून अंडरहॅन्डचे रक्षण करत आलो.

आता इथे कोणी नोकर चहा घेऊन आला आणि त्याच्या हातून चहाचा ट्रे पडला, तर लगेच शेठ त्याच्यावर ओरडतील, 'तुझे हात

तुटलेत का? तुला दिसत नाही?' तो तर बिचारा नोकर आहे. वास्तवात नोकर कधी काही फोडत नाही, आपल्या रॉंग बिलिफ (चुकीच्या मान्यते) मुळे असे वाटते की, हे नोकराने फोडले. वास्तवात फोडणारा दुसरा कोणी आहे. इथे तर निर्दोष व्यक्तीला दोषी ठरवले जाते, मग नोकर पण त्या वागणुकीचे फळ देतो, कुठल्या तरी जन्मात.

**प्रश्नकर्ता :** मग त्यावेळी फोडणारा कोण असतो?

**दादाश्री :** आम्ही जेव्हा ज्ञान देतो तेव्हा ज्ञानविधीत या बद्दल सविस्तर सांगत असतो. फोडणारा कोण? जग चालवणारा कोण? त्या सर्व प्रश्नांची उत्तरे सांगत असतो. खरे तर अशा परिस्थितीत आपण काय केले पाहिजे? भ्रांतीच्या अवस्थेत सुद्धा कुठला आधार घेतला पाहिजे? नोकर तर सिन्सियर आहे, तो मुद्दाम फोडणाऱ्या पैकी नाही.

**प्रश्नकर्ता :** तो कितीही सिन्सियर असला पण त्याच्या हातून चहाचा ट्रे पडला, म्हणून तो अप्रत्यक्षपणे जबाबदार नाही का?

**दादाश्री :** जबाबदार आहे! पण त्याची जबाबदारी किती ते आपण समजून घेतले पाहिजे. सर्व प्रथम त्याला विचारले पाहिजे की, 'तुला भाजले तर नाही ना?' भाजले असेल तर औषध लावले पाहिजे. मग हळूवार सांगावे की यापुढे अशी घाई करू नकोस, जपून चालत जा.

## सत्तेचा दुरुपयोग

सत्ताधारी असणारी व्यक्ती सत्तेचा उपयोग आपल्या कनिष्ठांना तुडवण्यासाठी करते. जो सत्तेचा दुरुपयोग करतो त्याची सत्ता त्याच्या हातून निघून जाते, शिवाय पुन्हा मनुष्य जन्मही मिळत नाही. एकच तास जर आपण आपल्या हाताखालच्या माणसाला त्रास दिला तरी आयुष्यभराची कर्मे बांधली जातात. विरोध करणाऱ्यांना धमकावले तर गोष्ट वेगळी आहे.

**प्रश्नकर्ता :** समोरचा आगाऊ असेल तर त्याच्याशी जशास तसे नको का वागायला?

**दादाश्री :** समोरच्या व्यक्तीची वागणूक आपण पाहायची नाही, ती त्याची जबाबदारी आहे, समोरून जर दरोडेखोर येत असेल तर तुम्ही दोन हात केलेत तर ठीक आहे, पण तेव्हा तर तुम्ही सगळे देऊन टाकता ना? निर्बळ व्यक्तीवर तुम्ही अधिकार गाजवता त्यात काय विशेष? हातात अधिकार असून देखील तुम्ही निर्बळ व्यक्तीशी नम्रतेने वागलात तर बरोबर.

हे ऑफिसर लोक घरी बायकोशी भांडून येतात आणि ऑफिसमध्ये असिस्टन्ट लोकांचे तेल काढतात (छळतात)! अरे, असिस्टन्टने जर चुकीच्या कागदावर तुमची सही घेतली तर तुझी काय दैना होईल? असिस्टन्टची तर खूपच गरज आहे।

आम्ही असिस्टन्टची खूप काळजी घेतो. कारण त्याच्यामुळे तर आपले काम चालते. काहीजण शेठला खुश करण्यासाठी स्वत:ची हुशारी दाखवतात. शेठने सांगितले 'वीस टक्के घ्या.' तेव्हा स्वत:ची हुशारी सिद्ध करण्यासाठी पंचवीस टक्के घेतो. अहो, असे करून पापाचे गाठोडे का बांधता?



# [ 8 ]
# आपण सर्व निसर्गाचे 'गेस्ट'

## निसर्ग, जन्मापासूनच हितकारक

या संसारात जितकेही जीव आहेत ते सर्वच निसर्गाचे 'गेस्ट' (पाहुणे) आहेत. तुम्हाला लागणारी प्रत्येक गोष्ट निसर्ग तुमच्यासाठी तयार करून पाठवितो. योग्य समज नसल्यामुळे तुम्हाला सतत क्लेश-बेचैनी-चिंता वाटत राहते कारण तुम्हाला असे वाटते की हे 'मीच करत आहे.' हीच भ्रांती आहे. खरे तर कुणाकडून काहीही होऊ शकत नाही.

इथे जन्म होण्यापूर्वीच, आपण या संसारात येण्याआधीच लोक सगळीच तयारी करून ठेवतात. भगवंतांची स्वारी येत आहे! जन्म होण्याआधी बाळाला काळजी करावी लागते का की बाहेर आल्यानंतर माझ्या दुधाचे काय होईल? इथे तर दुधाच्या कुंड्या वगैरे आधीच तयार असतात! डॉक्टर, सुईण सगळेच तयार असतात? आणि सुईण नसेल तर न्हावीण तरी असतेच. पण कसली ना कसली तयारी असतेच. मग जसा 'गेस्ट' असेल तशी तयारी! 'गेस्ट' फर्स्ट क्लास असेल त्याची तयारी वेगळी, सेकंड क्लासची वेगळी आणि थर्ड क्लासची वेगळी, सगळे क्लास असतात ना? म्हणजे सगळ्याच तयारीनिशी तुम्ही आला आहात. मग एवढी चिंता-बेचैनी कशासाठी करता?

आपण ज्यांचे पाहुणे असू त्यांच्याबरोबर आपला विनय कसा असला पाहिजे? मी तुमच्या घरी पाहुणा म्हणून आलो तर मला पाहुणा म्हणून विनय नको का ठेवायला? तुम्ही सांगाल की, 'इथे झोपू नका,

तिथे झोपा,' तर तुम्ही सांगितल्याप्रमाणे मला तिथे झोपायला हवे. दोन वाजता जेवायला वाढले तरी शांतपणे जेवायचे. ताटात जे वाढतील ते मुकाट्याने खाल्ले पाहिजे. तिथे तक्रार करता कामा नये. कारण 'गेस्ट' आहोत. आता जर पाहुणा स्वयंपाकघरात जाऊन कढीत चमचा ढवळू लागला तर ते योग्य होईल का? घरात ढवळाढवळ करू लागलात तर तुम्हाला घरात कोण ठेवून घेईल? जेवणात बासुंदी असेल तर खाऊन घ्यावी तिथे असे सांगू नये की 'आम्ही गोड खात नाही.' जेवढे वाढले तेवढे आरामात खायचे. खारट वाढले तर खारट खावे. जास्त आवडत नसेल तर कमी खायचे, पण खायचेच! पाहुण्याचे सगळेच नियम पाळा. पाहुण्याने राग-द्वेष करून चालणार नाही. पाहुणा राग-द्वेष करू शकतो का? तो तर विनयपूर्वकच राहतो ना?

आम्ही तर 'गेस्ट' प्रमाणेच राहतो. आमच्यासाठी सगळ्याच वस्तू येतात. आपण ज्यांच्या घरी 'गेस्ट' म्हणून गेलो असू त्यांना त्रास द्यायचा नाही. आमच्यासाठी सगळ्याच वस्तू घरबसल्या येतात. आठवण झाली की लगेच हजर होतात आणि समजा नाही मिळाल्या तरीही मला काही हरकत नाही. कारण आपण त्यांच्या घरी 'गेस्ट' आहोत. कुणाच्या घरी? तर निसर्गाच्या घरी! निसर्गाची मर्जी नसेल तर आपण समजावे की हे माझ्या हितासाठी आहे. आणि निसर्गाची मर्जी असेल तरीही समजावे की, हे पण माझ्या हितासाठीच आहे. आपल्या हातात करण्याची सत्ता असती तर एका बाजूला दाढी उगवली आणि दुसऱ्या बाजूला नाही उगवली तर आपण काय केले असते? आपल्या हातात करायची सत्ता असती तर सगळा गोंधळ करून ठेवला असता. पण हे सर्व निसर्गाच्या हातात आहे. निसर्गाची कुठेही चूक होत नाही. सगळे पद्धतशीर असते. पाहा ना, चावण्याचे दात वेगळे, सोलण्याचे दात वेगळे, चघळण्याचे वेगळे, पाहा तरी! किती सुंदर व्यवस्था आहे! जन्मतःच पूर्ण शरीर मिळते. हात, पाय, नाक, कान, डोळे सगळे मिळते पण तोंडात हात घातले तर दात नसतात, मग यात निसर्गाची काही चूक झाली असेल का? नाही, निसर्गाला माहित आहे की जन्माला आल्यावर लगेच दूध प्यायचे आहे, दुसरा आहार पचणार नाही, आईचे दूध प्यायचे आहे, दात दिले तर

तो चावून घेईल! पाहा किती सुंदर रचना केली आहे! जसजशी गरज भासेल तसतसे दात येत जातील. प्रथम चार येतील, मग हळूहळू आणखी दुसरे येतील, आणि या म्हाताऱ्यांचे दात पडले तर परत येत नाहीत!

निसर्ग सर्व प्रकारे रक्षण करतो. राजासारखे ठेवतो. पण या अभाग्याला हे समजत नाही त्यास काय करणार?

## पण ढवळाढवळ करून दुःख निर्माण केले

रात्री पुरणपोळी खाऊन झोपून जातो ना? मग घोरत राहतो! अरे बाबा, आत काय चालू आहे त्याचा तपास तरी कर! तेव्हा म्हणेल 'त्यात मी काय करू?' आणि निसर्गाची कार्यपद्धती कशी आहे? पोटात पाचक रस निर्माण होतात, बाईल (पित्त) वगैरे सर्व निर्माण होतात. सकाळी रक्त रक्ताच्या जागी, लघवी लघवीच्या जागी, संडास संडासच्या जागी अगदी बरोबर पोहोचते. कशी पद्धतशीर सुंदर व्यवस्था केलेली आहे! आत निसर्ग केवढे मोठे काम करत आहे! जर डॉक्टरला एक दिवस आतील अन्न पचवायचे काम सोपवले तर तो मनुष्याला मारून टाकेल! आतील पाचकरस टाकायचे, बाईल टाकायचे, असे सर्व काम डॉक्टरवर सोपवले असेल तर डॉक्टर काय करेल? भूक लागत नाही म्हणून आज पाचक रस जरा जास्त टाकू दे. आता निसर्गाचा नियम कसा आहे की, मरेपर्यंत पुरेल अशा तऱ्हेने तो पाचकरसाची व्यवस्था करतो. डॉक्टरकडे ही व्यवस्था सोपवली तर तो रविवारी पाचकरस जास्त टाकतो, म्हणून बुधवारी काही पचणारच नाही, कारण बुधवारचा हिस्सा पण रविवारीच टाकला.

निसर्गाच्या हातात कशी सुंदर बाजी आहे! आणि तुमच्या हातात व्यापार आहे. खरे म्हणजे व्यापार देखील तुमच्या हातात नाहीच. तुम्ही फक्त मानता की मी व्यापार करतो. आणि म्हणूनच विनाकारण हायहाय करीत बसता! दादरहून बॉम्बे सेन्ट्रल जायला टॅक्सी केली की मनात धडक लागेल, धडक लागेल, अशी धास्ती वाटत राहते. अरे, कोणीच धडकणार नाही. तू आपला समोर बघून चाल. तुझे कर्तव्य किती? तर फक्त समोर बघून चालायचे एवढेच. खऱ्या अर्थाने तर तेही तुझे कर्तव्य

नाही. निसर्गच ते तुझ्याकडून करवून घेत आहे. पण समोर पाहत नाही आणि विनाकारण ढवळाढवळ करीत राहतो. निसर्ग तर इतका चांगला आहे! अरे शरीरात इतका सुंदर कारखाना चालू आहे तर बाहेर का नाही चालणार? बाहेर काहीच चालवायची गरज नाही. बाहेर काय चालवायचे आहे?

**प्रश्नकर्ता :** कोणी चुकीचे वागत असेल तर ती सत्ता देखील त्याच्या हातात नाही?

**दादाश्री :** नाही, ती सत्ता नाही, आणि चुकीचे होईल असेही नाही, पण त्याने बरे-वाईट भाव केले म्हणून हे असे चुकीचे घडले. स्वतःच निसर्गाच्या संचालनात ढवळाढवळ केली आहे, नाही तर हे कावळे, कुत्रे या जनावरांचे कसे (जीवन) आहे? दवाखाना नको, कोर्ट नको, हे प्राणी त्यांची भांडणे कशी मिटवतात? दोन बैल भांडतात, खूप भांडतात पण सुटल्यानंतर ते काय कोर्ट शोधायला जातात का? दुसऱ्या दिवशी पाहिले तर दोघेही मजेत हिंडत असतात! आणि या मूर्खांचे दवाखाने असतात, कोर्टस् असतात आणि तरीही सदा दुःखीच! या लोकांची नेहमीच रडारड सुरू असते. अशा लोकांना अकर्मी म्हणावे की सकर्मी म्हणावे? या चिमण्या, कबुतरे, कुत्रे सगळे किती सुंदर दिसतात! ते काय हिवाळ्यात (आयुर्वेदिक जडीबुटी टाकलेले) हिवाळीपाक खातात का? आणि हे लोक तर हिवाळीपाक खाऊनही रूपवान दिसत नाहीत. कुरूपच दिसतात. या अहंकारामुळे सुंदर मनुष्य सुद्धा कुरूप दिसतो. म्हणजे आपले कुठे तरी चुकत असावे, असा विचार करायला नको का?

## ...तरीही निसर्ग सदैव तुमच्या मदतीसाठी तयार

**प्रश्नकर्ता :** शुभ मार्गी जाण्याचे विचार येतात पण ते टिकत नाहीत आणि पुन्हा अशुभ विचार मनात येतात, हे असे का?

**दादाश्री :** विचार म्हणजे काय? पुढे जायचे असेल तरी विचार काम करतात आणि मागे वळायचे असेल तरीही विचार काम करतात.

परमेश्वराकडे जाणाऱ्या वाटेने पाऊल उचलतात आणि पुन्हा मागे वळतात, हे अशाप्रकारे होत आहे. एक मैल पुढे जातात आणि एक मैल मागे वळतात, एकाच प्रकारचे विचार करणे उत्तम. मागे यायचे ठरवले म्हणजे मागेच यायचे आणि पुढे जायचे ठरवले की मग पुढेच जायचे. ज्याला पुढे जायचे असेल त्यालाही निसर्ग मदत करतो आणि ज्याला मागे यायचे असेल त्यालाही निसर्ग मदत करतो. निसर्ग काय म्हणतो? 'आय विल हेल्प यु.' (मी तुम्हाला मदत करीन.) तुला जे काम करायचे असेल, मग चोरी करायची असेल तरीही 'आय विल हेल्प यु.' निसर्गाची तर खूप मोठी मदत आहे, निसर्गाच्या मदतीनेच तर हे सगळे चालत आहे! पण तू ठरवतच नाहीस की तुला काय करायचे आहे? जर तू ठरवलेस तर निसर्ग तुला मदत करण्यासाठी तयारच आहे. प्रथम हे ठरवा की मला असे असे करायचे आहे, मग तो निश्चय रोज सकाळी आठवा. तुमच्या निश्चयाशी तुम्ही 'सिन्सियर' राहिले पाहिजे, तर निसर्ग तुम्हाला मदत करेल. तुम्ही निसर्गाचे 'पाहुणे' आहात.

म्हणून गोष्ट नीट समजून घ्या. निसर्ग तर नेहमीच म्हणतो 'आय विल हेल्प यु.' देव तुम्हाला मदत करीत नाही. देव तसा रिकामाही नाही. ही सगळी निसर्गाचीच रचना आहे. आणि ती फक्त भगवंताच्या हजेरीमुळेच निर्माण झाली आहे.

**प्रश्नकर्ता :** आपण निसर्गाचे 'गेस्ट' आहोत की 'पार्ट ऑफ नेचर' (निसर्गाचा भाग) आहोत?

**दादाश्री :** 'पार्ट ऑफ नेचर' पण आहात आणि 'गेस्ट' पण आहात. आम्ही पण 'गेस्ट' बनून राहणे पसंत करतो. तुम्ही कुठेही बसलात तरी तुम्हाला हवा मिळत राहील, पाणी मिळत राहील आणि ते सुद्धा 'फ्री ऑफ कॉस्ट' (फुकट)! जे जास्त मौल्यवान आहे ते फुकट मिळत राहते. निसर्गाला ज्याची किंमत आहे त्याची किंमत मनुष्याला वाटत नाही. आणि निसर्गाला ज्याची किंमत नाही (जसे की हिरे, मोती) त्याची मनुष्याला खूप किंमत आहे.



# [ ९ ]
# मनुष्यपणाची किंमत

## किंमत तर सिन्सियारिटी व मोरॅलिटीची

साऱ्या जगाचा 'बेसमेंट' (पाया) सिन्सियारिटी व मोरॅलिटी याच दोन गोष्टी आहेत. या दोन्ही गोष्टी बिघडल्या तर सगळे कोसळून पडते. या काळात सिन्सियारिटी आणि मोरॅलिटी असेल तर ती खूप मोठी संपत्ती आहे. हिंदुस्तानात या गोष्टी खूप मुबलक प्रमाणात होत्या पण हिंदुस्तानातील लोकांनी या गोष्टींची परदेशात निर्यात केली आहे. आणि त्याच्या बदल्यात परदेशातून काय आयात केले हे माहीत आहे का तुम्हाला? तर ही एटीकेटची भुते (शिष्टाचाराचा वेडेपणा)! त्यामुळे या बिचाऱ्यांना चैन पडत नाही. आपल्याला या एटीकेटच्या भुतांची काय गरज आहे? ज्यांच्यात नूर नाही त्यांच्यासाठी गरज आहे. आपण तर तीर्थंकरी नूर असणारे लोक आहोत, ऋषीमुनींची संताने आहोत! तुमचे कपडे फाटले असतील तरी तुमच्या चेहऱ्यावरचे तेजच सांगेल की 'तुम्ही कोण आहात?'

**प्रश्नकर्ता :** 'सिन्सियारिटी' आणि 'मोरॅलिटी' चा नेमका अर्थ काय? ते समजावा.

**दादाश्री :** 'मोरॅलिटी'चा अर्थ काय? की स्वत:च्या हक्काचे आणि सहज मिळत असेल ते उपभोगण्याची सूट. हा 'मोरॅलिटी' चा अगदी अंतिम अर्थ आहे. 'मोरॅलिटी' तर अतिशय खोल गोष्ट आहे.

त्यावर तर अनेक शास्त्र लिहिता येतील. पण या अंतिम अर्थावरून तुम्ही समजून घ्या.

आणि 'सिन्सियारिटी' म्हणजे जो माणूस दुसऱ्याशी 'सिन्सियर' राहत नाही, तो स्वत:शी देखील 'सिन्सियर' राहत नाही. कोणालाशी थोडे देखील 'इनसिन्सियर' असता कामा नये, त्यामुळे आपलीच 'सिन्सियारिटी' मोडते.

'सिन्सियारिटी' आणि 'मोरॅलिटी', या काळात हे दोन गुण असतील तर खूप झाले. अरे, यापैकी एक गुण जरी असेल तरीही तो तुम्हाला थेट मोक्षापर्यंत घेऊन जाईल! पण तुम्ही या गुणांना घट्ट धरून राहिले पाहिजे. आणि जेव्हा-जेव्हा तुम्हाला अडचण येईल तेव्हा ज्ञानी पुरुषांची भेट घेऊन स्पष्टता करून घेतली पाहिजे की ही 'मोरॅलिटी' आहे आणि ही मोरॅलिटी नाही.

ज्ञानी पुरुषांचा *राजीपो* (गुरुजनांची कृपा आणि प्रसन्नता) आणि 'सिन्सियारीटी' या दोन्हींच्या गुणाकाराने सर्व कार्ये सफळ होतील!

## 'इनसिन्सियारिटी' ने सुद्धा मोक्ष

एखादा वीस टक्के सिन्सियर आणि ऐंशी टक्के इनसिन्सियर माणूस जर माझ्याजवळ आला आणि त्याने मला विचारले की, 'मला मोक्ष हवा आहे आणि माझ्यात तर असा माल (दुर्गुण) भरलेला आहे तर मी काय केले पाहिजे?' तेव्हा मी त्याला सांगेल शंभर टक्के 'इनसिन्सियर' होऊन जा, मग मी तुला मोक्षाला जाण्याचा दुसरा मार्ग दाखवीन. या ऐंशी टक्याच्या कर्जाची भरपाई तो कशी करणार? त्यापेक्षा एकदम दिवाळेच काढ. 'ज्ञानी पुरुषां'चे फक्त एक वाक्य जरी पकडून चाललात तरीही मोक्ष प्राप्त कराल. संपूर्ण जगाशी 'इनसिन्सियर' राहिलास तरी देखील माझी हरकत नाही पण फक्त इथे (ज्ञानी पुरुषांशी) सिन्सियर राहिलास तर ते तुला मोक्षाला घेऊन जातील. शंभर टक्के 'इनसिन्सियारिटी' हा पण एक फार मोठा गुण आहे, तो मोक्षाला घेऊन जाईल. कारण भगवंताच्या संपूर्ण विरोधात गेला. भगवंताच्या संपूर्ण विरोधकाला मोक्षाला

घेऊन जाण्याशिवाय गत्यंतरच नाही! एक तर भगवंताचा भक्त मोक्षाला जातो किंवा भगवंताचा संपूर्ण विरोधी मोक्षाला जातो!! म्हणून जो नादार आहे त्याला मी सांगतो की शंभर टक्के 'इनसिन्सियर' हो, मग मी तुला दुसरा मार्ग दाखवेन, जो तुला थेट मोक्षाला घेऊन जाईल. केवळ शंभर टक्के 'इनसिन्सियर' राहून भागणार नाही, त्याला दुसरा मार्ग दाखवावाच लागेल, तेव्हाच काम होईल.



# [ 10 ]
# आदर्श व्यवहार

## अखेर, व्यवहार आदर्श हवाच

आदर्श व्यवहाराशिवाय कुणीही मोक्षाला गेलेला नाही. जैन व्यवहार म्हणजे आदर्श व्यवहार नाही. वैष्णव व्यवहार म्हणजे आदर्श व्यवहार नाही. मोक्षाला जाण्यासाठी आदर्श व्यवहार पाहिजे.

आदर्श व्यवहार म्हणजे आपल्याकडून कोणत्याही जीवाला किंचितमात्र दुःख होऊ नये असे वर्तन. घरातील, बाहेरील, शेजारी-पाजारी असे कुणालाही दुःख होणार नाही असे वर्तन म्हणजे आदर्श व्यवहार.

जैन व्यवहाराचा *अभिनिवेश* (आपलेच मत बरोबर आहे असे मानणे) करणे योग्य नाही. तसेच वैष्णव व्यवहाराचाही *अभिनिवेश* करणे योग्य नाही. हा सगळा *अभिनिवेश* व्यवहार आहे. महावीर भगवंताचा आदर्श व्यवहार असायचा. आदर्श व्यवहार असला तर शत्रूला देखील दुःख होणार नाही. आदर्श व्यवहार म्हणजे मोक्षाला जाण्याची निशाणी. जैन किंवा वैष्णव संप्रदायातून मोक्ष मिळत नाही. आमच्या आज्ञा तुम्हाला आदर्श व्यवहाराकडे घेऊन जातात. त्या तुम्हाला संपूर्ण समाधी अवस्थेत ठेवू शकतील अशा आहेत. आधी-व्याधी-उपाधी अशा तीनही अवस्थेत समाधीत ठेवू शकतील अशा आहेत. सारा बाह्य व्यवहार हा रिलेटिव्ह आहे, आणि हे तर 'सायन्स' आहे. सायन्स म्हणजे रियल!

आदर्श व्यवहारामुळे आपल्याकडून कुणालाही दुःख होत नाही.

आपल्याकडून कुणालाही दु:ख होऊ नये एवढेच पाहायचे आहे. तरीदेखील आपल्याकडून कुणाला दु:ख झालेच तर त्वरित प्रतिक्रमण करून घ्यावे. लोक आपल्याशी जसे वागतात तसे आपण वागायचे नाही. व्यवहारात पैशांची देवाण-घेवाण होते ती होणार, तो तर सामान्य व्यवहार आहे, सामान्य रिवाज आहे, त्यास आम्ही व्यवहार म्हणत नाही. आपण फक्त आपल्याकडून कुणाला दु:ख होत नाही एवढेच जपायचे, आणि कदाचित कोणाला दु:ख झालेच तर ताबडतोब प्रतिक्रमण करायचे यालाच आदर्श व्यवहार म्हणतात!

आमचा व्यवहार आदर्श असतो. आमच्याकडून कधी कुणाला दु:ख होईल असे घडत नाही. कोणाच्याच खात्यात माझ्या नावावर त्रास दिला अशी नोंद होत नाही. आम्हाला कोणी त्रास दिला आणि त्याबदल्यात आम्ही पण त्रास दिला तर आमच्यात आणि तुमच्यात काय फरक? आम्ही सरळ असतो, समोरच्याला ओटीत घालून आम्ही सरळ असतो. म्हणून समोरच्याला वाटते की दादा कच्चे (भोळे) आहेत. हो, कच्चे बनून सुटून जाणे चांगले पण पक्के बनून त्याच्या तुरुंगात जाणे हे चुकीचे. असे करण्याची काय गरज? एकदा आम्हाला आमचा भागीदार म्हणाला होता की, 'तुम्ही खूप भोळे आहात.' तेव्हा मी म्हणालो, 'मला भोळे म्हणणारा तो स्वत:च भोळा आहे.' त्यावर तो म्हणाला, 'तुम्हाला खूप जण फसवून जातात.' तेव्हा मी त्याला म्हणालो आम्ही जाणूनबुजून फसवून घेतो.'

आमचा व्यवहार संपूर्ण आदर्श व्यवहार असतो. ज्याच्या व्यवहारात थोडी देखील कमतरता असेल तो मोक्षासाठी लायक म्हटला जाणार नाही.

**प्रश्नकर्ता :** ज्ञानींच्या व्यवहारात दोन व्यक्तींमध्ये भेदभाव केला जातो का?

**दादाश्री :** त्यांच्या दृष्टीत भेदभाव नसतोच, वीतरागताच असते. त्यांच्या व्यवहारात (वागण्यात) फरक असतो. एक मिल मालक आणि त्याचा ड्रायव्हर इथे आले तर शेठला समोर बसवेल आणि ड्रायव्हरला माझ्याजवळ बसवेल, म्हणजे शेठचा पारा (घमंड) उतरून जाईल! आणि

जर पंतप्रधान आले तर मी उठून त्यांचे स्वागत करेल आणि त्यांना आसन ग्रहण करायला सांगेल, त्यांच्या सोबतचा व्यवहार चुकणार नाही. त्यांना तर विनयपूर्वक उच्च आसनावर बसवीन, आणि त्यांना जर माझ्याकडून ज्ञान ग्रहण करायचे असेल तर त्यांना माझ्या समोर खाली बसवीन, आणि तसे नसेल तर वर बसवीन. लोकमान्य असेल त्यास व्यवहार म्हटले आहे आणि जे मोक्षमान्य असेल त्यास निश्चय म्हटले आहे, म्हणून सर्वसामान्यांशी वागताना सर्व सामान्य व्यवहारानेच वागावे लागते. पंतप्रधान आले आणि मी उठलो नाही तर तो त्यांचा अपमान होईल. त्यांना दु:ख होईल आणि त्याची जबाबदारी आमच्यावर येईल.

**प्रश्नकर्ता :** जे मोठे आहेत त्यांना पूज्य मानले पाहिजे?

**दादाश्री :** मोठे म्हणजे वयाने मोठे असे नाही, तरीदेखील जर आजीबाई मोठ्या असतील तर त्यांच्याशी विनयपूर्वक वागावे आणि जे ज्ञानवृद्ध (ज्ञानाने मोठे) असतील त्यांना पूज्य मानावे.

सत्संगातून आम्ही घरी वेळेवर जातो. जर मी रात्री बारा वाजता दरवाजा ठोठावला तर ते कसे दिसेल? घरचे लोक तोंडावर सांगतील की, 'तुम्ही कधीही या, चालेल.' पण त्यांचे मन त्यांना सोडणार नाही ना? मन तर वेगवेगळ्या गोष्टी दाखवत राहील. आपण त्यांना किंचितही दु:ख कसे देऊ शकतो? हा तर नियम म्हटला जातो आणि नियम तर पाळायलाच हवा. पण रात्री दोन वाजता उठून जर कोणी रियलची (आत्म्याची) भक्ती केली तर कोणी काही बोलेल का? नाही, कोणीच विचारणार नाही.

## शुद्ध व्यवहार : सद्व्यवहार

**प्रश्नकर्ता :** शुद्ध व्यवहार कशास म्हणावे? सद्व्यवहार कशास म्हणावे?

**दादाश्री :** स्वरूपाचे ज्ञान प्राप्त झाल्यानंतर शुद्ध व्यवहाराची सुरुवात होते, तोपर्यंत सद्व्यवहार चालू असतो.

**प्रश्नकर्ता :** शुद्ध व्यवहार आणि सद्व्यवहार यात काय फरक आहे?

**दादाश्री :** सद्व्यवहार अहंकारासहित असतो आणि शुद्ध व्यवहारात अहंकार नसतो, निरहंकारी असतो. शुद्ध व्यवहारात संपूर्ण धर्मध्यान असते आणि सद्व्यवहारात अत्यंत अल्प प्रमाणात धर्मध्यान असते.

जितका शुद्ध व्यवहार असेल तितका शुद्ध उपयोग राहतो. शुद्ध उपयोग म्हणजे 'स्वतः' ज्ञाता-द्रष्टा असतो, पण पाहायचे काय? तर शुद्ध व्यवहाराला पाहा. शुद्ध व्यवहारात निश्चय शुद्ध उपयोग असतो.

कृपाळू देवांनी म्हटले आहे: 'गच्छ्मतनी जे कल्पना ते नही सद्व्यवहार.'

(पंथाची, संप्रदायांची मते किंवा कल्पना म्हणजे सद्व्यवहार नव्हे.)

हे सगळे संप्रदाय म्हणजे कल्पित गोष्टी आहेत. त्यात तर सद्व्यवहारही नाही, मग तिथे शुद्ध व्यवहाराविषयी काय बोलावे? शुद्ध व्यवहार हे निरहंकारी पद आहे, शुद्ध व्यवहार हे स्पर्धारहित आहे. आपण जर स्पर्धेत उतरलो तर राग-द्वेष होतीलच. आम्ही तर सगळ्यांना सांगतो की, तुम्ही जिथे आहात तिथेच ठीक आहात. आणि त्यात तुम्हाला जर काही उणीव भासत असेल तर आमच्याजवळ या. आमच्याकडे तर प्रेमाचाच वर्षाव असतो. कोणी द्वेषाने जरी आला तरीही त्याला प्रेमच मिळेल.

क्रमिक मार्ग म्हणजे प्रथम शुद्ध व्यवहार करा, आणि शुद्ध व्यवहारवाले बनून मग शुद्धात्मा बना आणि अक्रम मार्ग म्हणजे प्रथम शुद्धात्मा बना, मग शुद्ध व्यवहार करा. शुद्ध व्यवहारात व्यवहार सगळाच असतो पण त्यात वीतरागता असते. एक-दोन जन्मात मोक्षाला जाणार असाल तेव्हापासून शुद्ध व्यवहाराची सुरुवात होते.

शुद्ध व्यवहार स्पर्शत नाही त्याचे नाव निश्चय! व्यवहार अशा

पद्धतीने पूर्ण करावा की, निश्चयाला स्पर्श करू शकणार नाही, मग तो कुठल्याही प्रकारचा व्यवहार असो.

चोख व्यवहार आणि शुद्ध व्यवहारात फरक आहे. व्यवहार चोख ठेवणे म्हणजे मानवधर्म आणि शुद्ध व्यवहार तर थेट मोक्षाला घेऊन जातो. घरात किंवा बाहेर भांडण-तंटे न करणे म्हणजे चोख व्यवहार. आणि आदर्श व्यवहार कशास म्हणतात? स्वत:चा सुगंध सर्वत्र पसरवणे म्हणजे आदर्श व्यवहार.

आदर्श व्यवहार आणि निर्विकल्प पद, या दोन्ही गोष्टी प्राप्त झाल्यानंतर आणखी काय पाहिजे. यात तर पूर्ण ब्रह्मांडाला बदलण्याची शक्ती आहे.

## आदर्श व्यवहाराने मोक्ष प्राप्ती

**दादाश्री :** तू व्यवहार कसा करू इच्छितोस?

**प्रश्नकर्ता :** संपूर्ण आदर्श.

**दादाश्री :** म्हातारे झाल्यानंतर आदर्श व्यवहार केला तर त्याचा काय उपयोग? आदर्श व्यवहार तर जीवनाच्या सुरुवातीपासूनच असायला हवा?

जगात एक माणूस जरी आदर्श व्यवहार करणारा असेल तर त्यामुळे संपूर्ण जग बदलू शकते.

**प्रश्नकर्ता :** आदर्श व्यवहार कशाप्रकारे होऊ शकतो?

**दादाश्री :** तुम्हाला (महात्म्यांना) जे निर्विकल्प पद प्राप्त झाले आहे, त्यात राहिल्याने आदर्श व्यवहार आपोआप येईल. निर्विकल्प पद प्राप्त झाल्यानंतर काही हस्तक्षेप होत नाही, तरी पण तुमच्याकडून हस्तक्षेप झाला तर तुम्ही माझ्या आज्ञेत नाही. आमच्या पाच आज्ञा तुम्हाला महावीर भगवंताच्या स्थितीत ठेवतील अशा आहेत. (दैनंदिन) व्यवहारात आमच्या आज्ञा तुम्हाला बाधक नाहीत, त्या तुम्हाला आदर्श व्यवहारात ठेवतील अशा आहेत. हे 'ज्ञान' तर व्यवहाराला संपूर्ण आदर्श करू शकेल असे आहे. मोक्ष कोणाला मिळेल? ज्याचा व्यवहार आदर्श

आहे त्याला. आणि 'दादां'ची आज्ञा व्यवहाराला आदर्श बनवते. थोडी जरी चूक झाली तरी तो व्यवहार आदर्श नाही. मोक्ष म्हणजे नुसती थापेबाजी नाही, ते वास्तविक स्वरूप आहे. मोक्ष म्हणजे वकिलांनी शोधून काढलेला शोध नाही! ते हकीगत आहे. वकील तर गप्पांमधूनही शोधून काढतील, तसे हे नाही.

एक भाऊ मला एका मोठ्या आश्रमात भेटले. मी त्यांना विचारले की, 'तुम्ही इथे कसे?' तेव्हा ते म्हणाले, 'मी या आश्रमात गेल्या दहा वर्षांपासून राहत आहे.' तेव्हा मी त्यांना म्हणालो, 'तुमचे आई-वडील तर अत्यंत हलाखीच्या अवस्थेत गावात म्हातारपण घालवत आहेत, खूप दु:खी आहेत.' त्यावर तो म्हणाला, 'त्यात मी काय करू? मी त्यांचे करीत बसलो तर माझे धर्मकार्य करण्याचे राहून जाईल.' याला धर्म कसे म्हणू शकतो? धर्म तर त्यास म्हणतात की, ज्यात आई-वडिलांना विचारतात, भावाला विचारतात. सगळ्यांनाच धरून चालतात. व्यवहार आदर्श असायला हवा. जो व्यवहार स्वत:च्या धर्माचा तिरस्कार करतो, आई-वडिलांच्या नात्याचाही तिरस्कार करतो अशा व्यवहाराला धर्म कसे म्हणता येईल? अरे, मनातल्या मनात दिलेली शिवी किंवा अंधारात गुप्तपणे केलेली कृत्ये, या गोष्टी म्हणजे भयंकर अपराध आहेत! त्याला वाटते की, 'मला कोण पाहणारा आहे? आणि कोणाला हे कळणार आहे?' अरे, ही काही अंधेर नगरी नाही! हा तर खूप मोठा अपराध आहे! या सगळ्यांना अंधारातील चुकाच त्रास देतात!

व्यवहार आदर्श असायला हवा. या व्यवहारात जास्त खोलवर गेलात तर कषाय निर्माण होतात. हा संसार तर एक होडीसारखा आहे, या होडीत चहा-नाश्ता वगैरे सर्व करायचे पण हे मात्र लक्षात ठेवायचे की, होडीतून आपल्याला किनाऱ्यावर पोहोचायचे आहे.

म्हणून या गोष्टी नीट समजून घ्या. 'ज्ञानी पुरुषां'कडून हे सर्व फक्त समजूनच घ्यायचे आहे. करायचे काहीच नाही! आणि जो समजून सामावला तो झाला वीतराग!!

– **जय सच्चिदानंद**

# मूळ गुजराती शब्दांचे समानार्थी शब्द

*आरा* : कालचक्राचा बारावा भाग

*शाता* : सुख परिणाम

*अशाता* : दु:ख परिणाम

*कल्प* : कालच्रक

*तायफा* : फजिती

*तरंग* : शेखचिल्लीसारखी कल्पना

*लागणी* : संवेदना, जिव्हाळा

*निकाल* : निपटारा

*राजीपा* : गुरुजनांची कृपा आणि प्रसन्नता

*उपरी* : मालक, वरिष्ठ

*पोतापणुं* : मी आहे आणि माझे आहे असे आरोपण, माझेपण

*पुद्‌गल* : जे पूरण आणि गलन होते

*कल्पांत* : खूप आकांत

*गेड बसणे* : पूर्णपणे नीट समजणे

*अभिनिवेश* : आपलेच मत बरोबर आहे असे मानणे

*पूरण-गलन* : चार्ज करणे-डिस्चार्ज करणे

*संवरपूर्वक निर्जरा* : नवीन कर्मबीज न पडता जुनी कर्मफळे पूर्ण होणे

# दादा भगवान फाउन्डेशनची प्रकाशित मराठी पुस्तकें

1. भोगतो त्याची चूक
2. एडजस्ट एवरीव्हेर
3. जे घडले तोच न्याय
4. संघर्ष टाळा
5. मी कोण आहे ?
6. क्रोध
7. चिंता
8. प्रतिक्रमण (सं)
9. भावना सुधारे जन्मोजन्म
10. कर्माचे विज्ञान
11. पाप-पुण्य
12. आई-वडील आणि मुलांचा व्यवहार (सं)
13. पति-पत्नीचा दिव्य व्यवहार (सं)
14. समजपूर्वक प्राप्त ब्रह्मचर्य (सं)
15. मानव धर्म
16. मृत्युवेळी, आधी आणि नंतर
17. सेवा-परोपकार
18. दान
19. त्रिमंत्र
20. वर्तमान तीर्थंकर श्री सीमंधर स्वामी
21. चमत्कार
22. सत्य-असत्याचे रहस्य
23. वाणी, व्यवहारात (सं)
24. पैशांचा व्यवहार (सं)
25. क्लेश रहित जीवन
26. निजदोष दर्शनाने... निर्दोष!
27. प्रेम
28. गुरू-शिष्य
29. अहिंसा
30. आप्तवाणी-1, 2, 3

## हिन्दी

1. आत्मसाक्षात्कार
2. ज्ञानी पुरुष की पहचान
3. सर्व दु:खों से मुक्ति
4. कर्म का सिद्धांत
5. आत्मबोध
6. मैं कौन हूँ ?
7. पाप-पुण्य
8. भुगते उसी की भूल
9. एडजस्ट एवरीव्हेयर
10. टकराव टालिए
11. हुआ सो न्याय
12. चिंता
13. क्रोध
14. प्रतिक्रमण (सं, ग्रं)
16. दादा भगवान कौन ?
17. पैसों का व्यवहार (सं, ग्रं)
19. अंत:करण का स्वरूप
20. जगत कर्ता कौन ?
21. त्रिमंत्र
22. भावना से सुधरे जन्मोंजन्म
23. चमत्कार
24. प्रेम
25. समझ से प्राप्त ब्रह्मचर्य (सं, पू, उ)
28. दान
29. मानव धर्म
30. सेवा-परोपकार
31. मृत्यु समय, पहले और पश्चात्
32. निजदोष दर्शन से... निर्दोष
33. पति-पत्नी का दिव्य व्यवहार (सं)
34. क्लेश रहित जीवन
35. गुरु-शिष्य
36. अहिंसा
37. सत्य-असत्य के रहस्य
38. वर्तमान तीर्थकर श्री सीमंधर स्वामी
39. माता-पिता और बच्चों का व्यवहार (सं)
40. वाणी, व्यवहार में... (सं)
41. कर्म का विज्ञान
42. सहजता
43. आप्तवाणी - 1 से 9
52. आप्तवाणी - 13 (पूर्वार्ध व उत्तरार्ध)
54. आप्तवाणी - 14 (भाग-1, 2)
56. ज्ञानी पुरुष (भाग-1)

**( सं - संक्षिप्त, ग्रं - ग्रंथ, पू - पूर्वार्ध, उ - उत्तरार्ध )**

★ दादा भगवान फाउन्डेशन द्वारे गुजराती आणि इंग्रजी भाषेत सुद्धा बरीच पुस्तके प्रकाशित झाली आहे। वेबसाइट **www.dadabhagwan.org** वर सुद्धा आपण ही सगळी पुस्तके प्राप्त करू शकता।

★ प्रत्येक महिन्यात हिन्दी, गुजराती आणि अंग्रेजी भाषेत दादावाणी मेगेझीन प्रकाशित करीत आहे।

## संपर्क सूत्र

### दादा भगवान परिवार


**अडालज** : **त्रिमंदिर**, सीमंधर सिटी, अहमदाबाद-कलोल हाईवे,
पोस्ट : अडालज, जि.-गांधीनगर, गुजरात - 382421
**फोन** : 9328661166, 9328661177
E-mail : info@dadabhagwan.org

**मुंबई** : **त्रिमंदिर,** ऋषिवन, काजुपाडा, बोरिवली (E)
फोन : 9323528901

| | | | |
|---|---|---|---|
| **दिल्ली** | : 9810098564 | **बेंगलूर** | : 9590979099 |
| **कोलकता** | : 9830080820 | **हैदराबाद** | : 9885058771 |
| **चेन्नई** | : 7200740000 | **पूणे** | : 7218473468 |
| **जयपुर** | : 8890357990 | **जलंधर** | : 9814063043 |
| **भोपाल** | : 6354602399 | **चंडीगढ** | : 9780732237 |
| **इन्दौर** | : 6354602400 | **कानपुर** | : 9452525981 |
| **रायपुर** | : 9329644433 | **सांगली** | : 9423870798 |
| **पटना** | : 7352723132 | **भुवनेश्वर** | : 8763073111 |
| **अमरावती** | : 9422915064 | **वाराणसी** | : 9795228541 |

**U.S.A.** : **DBVI Tel. :** +1 877-505-DADA (3232),
**Email :** info@us.dadabhagwan.org

**U.K.** : +44 330-111-DADA (3232)

**Kenya** : +254 722 722 063

**UAE** : +971 557316937

**Dubai** : +971 501364530

**Australia** : +61 421127947

**New Zealand** : +64 21 0376434

**Singapore** : +65 81129229

**www.dadabhagwan.org**

## आप्तवाणीने घडविले युग परिवर्तन

''हे तर युग परिवर्तन होत आहे. धर्माचे युग परिवर्तन होत आहे. ही पुस्तके त्या विषयीच आहेत. आणि ही आप्तवाणी-3 तर अशी झाली आहे की अहाहा...! शास्त्रांत इतर सर्व वर्णन केलेले आहे, म्हणून पहिल्या आणि दुसऱ्या आप्तवाणीत आपण जगाचे वर्णन केले आहे. जग काय आहे? आपले त्याच्याशी काय देणेघेणे? हे सर्व त्यात सांगितले आहे. आणि तिसऱ्या आप्तवाणीत आत्म्यासंबंधी स्पष्टीकरण केले आहे. अजून बाकी सर्व आप्तवाणी येतील त्या तर काही औरच असतील. म्हणून तर सर्वत्र याचाच बोलबाला आहे ना!''

– दादाश्री

आत्मविज्ञानी 'ए.एम.पटेल' यांच्या आत प्रकट झालेल्या

# दादा भगवानना असीम जय जयकार हो



dadabhagwan.org



Printed in India

Price ₹150